हें एका स्फूर्तिदायक स्त्रीचें चरित्र

माझ्या मातोश्री

सौ. **यमुनाबाई भागवत**

यांना

प्रेमपूर्वक समर्पण

# प्रस्तावना

—+*+—

डॉ. बेझंट यांच्या चरित्रापासून प्रस्तुत चरित्रकाराला व्यक्तिशः अतिशय स्फूर्ति मिळालेली आहे. तेव्हां हें चरित्र लिहून व डॉ. बेझंट यांच्या आयुष्याचा विश्वसनीय वृत्तान्त महाराष्ट्रासमोर ठेवून त्यांच्याविषयींचे गैरसमज कमी करण्याचें श्रेय त्या चरित्रकाराला मिळालें तर त्याला आनंद वाटेल. चरित्र छोटें आहे, चरित्रकार महाराष्ट्रीय आहे व महाराष्ट्रीय वाचकांकरितां तें त्यानें लिहिलें आहे हें वाचकांनीं मेहेरबानीनें लक्षांत ठेवावें.

चरित्र लिहितांना अनेक ग्रंथांची मदत झालेली आहे. आरंभींच्या प्रकरणांतील बरीच माहिती डॉ. बेझंट-कृत आत्मचरित्रांतून घेतलेली आहे. इतर ग्रंथांचीं नांवें टिपांत दिलेलीं आहेत. त्या सर्व ग्रंथकारांचे आभार मानणें अवश्य आहे. त्याखेरीज अकोल्याचे रा. वासुदेवराव चिपळूणकर, काशीचे रा. माधवराव कानिटकर व द्वारकानाथपंत तेलंग, मुंबईचे मि. बी. पी. वाडीया व मि. के. जे. बी. वाडीया, ठाण्याचे रा. दत्तात्रय महादेव सुतार यांचीहि निरनिराळ्या प्रकारची मदत झाली असल्यामुळें त्या सर्वांचे प्रस्तुत चरित्रकार आभार मानीत आहे.

ठाणें,
६ जानेवारी १९३३ } **राजाराम सखाराम भागवत**

# अनुक्रमणिका



## प्रस्तुत ग्रंथकाराचीं पुस्तकें

आत्मविद्येचीं मूलतत्त्वें (भाषान्तरित)

योगशास्त्रप्रवेश ( ,, )

---

मेस्मेरिझम्

मरणोत्तर स्थिति व परलोकविद्या

आत्मविद्या म्हणजे काय?

---

लौकरच बाहेर पडतील

मनुष्याला पुनर्जन्म असतो कीं नाहीं?

धर्मांतील अंत:संप्रदाय व मनुष्याची उन्नति

# बेझंट-चरित्र

## प्रकरण पहिलें

### लहानपण व शिक्षण

डॉक्टर ॲनी बेझंट ह्या आज पंच्याऐशीं वर्षांच्या आहेत. त्या १८४७ सालीं लंडन शहरांत जन्मल्या व आज १९३२ सालीं मद्रासजवळ अड्यार गांवीं बरींच वर्षे स्थायिक रहात आहेत. त्या ख्रिस्ती धर्मांत जन्मल्या, पण आज त्या स्वतःला ख्रिश्चन म्हणवूं शकणार नाहींत अशी त्यांची स्थिति आहे. एके वेळीं त्यांनीं नास्तिक-वादाचा पुरस्कार करून ख्रिस्ती धर्मोपदेशकांना त्राहि भगवन् करून सोडलें होतें. आज त्यांची सर्व धर्मांवर जिवंत व जाज्वल्य अशी श्रद्धा असून जग त्यांना श्रद्धाळू माणसांत गणीत आहे. त्या जातीनें युरोपियन आहेत, पण त्यांनीं १९१७ सालीं हिंदुस्थानांत स्वराज्याची फारच मोठी चळवळ

केल्याबद्दल माबाप इंग्रज सरकारनें त्यांना चौकशीशिवाय तीन महिने अटकेंत ठेवून उटकमंडची थंड हवा दाखविली होती. हिंदु-धर्मांतील अगदीं जुन्या मताचे लोक व ख्रिस्ती धर्माचे धर्मोपाध्याय हे एक होण्याचा कपिलाषष्ठीचा योग कधींच यावयाचा नाहीं. पण डॉ. बेझंट यांना नाक मुरडण्याच्या कामीं त्या दोघांचें ऐकमत्य झालेलें आहे. डॉ. बेझंट या आपल्या मुलीला धर्मशिक्षण देत नाहींत, म्हणून इंग्रजी कायद्यानुसार १८७८ सालीं त्यांची मुलगी त्यांच्या इच्छेच्या विरुद्ध कोर्टानें त्यांचेपासून काढून दुसरीकडे ठेविली. तर १९१२ सालच्या सुमारास एका मद्रासी ब्राह्मणानें बाईवर फिर्याद केली होती कीं, त्या माझ्या मुलाला फाजील धर्मभोळेपणा शिकवीत आहेत, तेव्हां तो मुलगा त्यांच्या प्रभावळींत असूं नये! असे अनेक विचित्र प्रसंग डॉ. बेझंट यांच्या चरित्रांत आलेले आहेत; त्यांची माहिती पुष्कळ लोकांच्या कानांवर पडलेली आहे; व ती ऐकून डॉ. बेझंट हें काय प्रकरण आहे असा आश्चर्योद्गार अनेकांच्या, विशेषतः तरुणांच्या तोंडून निघालेला कधीं कधीं ऐकूं येत असतो. डॉ. बेझंट यांच्या सार्वजनिक आयुष्यक्रमास पन्नास वर्षें पुरीं झाल्याचा उत्सव होऊन गेल्यालाहि बरींच वर्षें झालीं आहेत. इतकें मोठें जें त्यांचें सार्वजनिक चरित्र त्याची माहिती आजच्या तरुण पिढीला फारशी नाहीं. ती त्यांच्यासमोर संक्षेपानें ठेवावी अशा बुद्धीनें आम्ही हें चरित्र लिहीत आहों.

डॉ. बेझंट यांच्या चरित्रांत इतकीं स्थित्यन्तरें व भानगडी आहेत कीं त्यांच्या चरित्राकडे नुसतें वरवर जो पाहील त्याला तें चरित्र नीट समजण्याजोगें नाहीं. त्यांनीं आपल्या चरित्रांत इतके उद्योग केलेले आहेत कीं, वरवर पहाणाराला त्या खटाटोपाच्या धुमश्चक्रींत त्यांच्या स्वभावाची मूळ बैठक दिसेनाशी होते व त्यामुळें त्याच्या मनांत गैरसमजुती उत्पन्न होतात. महाराष्ट्रांत असें अनेकदां झालेलें दिसून येतें.

डॉ. बेझंट ही बाई लबाड आहे, व हिंदुस्थानांत येऊन रहाण्यांत तिचा कांहीं आंतला डाव आहे, असें पुष्कळ महाराष्ट्रीयांस पूर्वी वाटे व आजहि कांहींजणांस वाटतें. पण जर त्यांच्या पोटांत असा कांहीं लपलेला डाव असता, तर वयास पंच्याऐशीं वर्षे झाल्यावर तरी तो बाहेर यावयास पाहिजे ना? पंच्याऐशीं वर्षांचें माणूस, म्हणजे त्याच्या गोंवऱ्या ओंकारेश्वराला गेल्या असेंच समजलें पाहिजे. इतक्या वयांतहि जर त्यांच्या पोटांतील लबाडी बाहेर पडत नाहीं तर ती आतां यापुढें केव्हां बाहेर पडणार! महाराष्ट्रांतील संशयी माणसें कधीं कधीं त्यांना दोन गोष्टी पूर्वी चिकटवीत असत असें दिसून येतें. हिंदुधर्म बुडवावा व युक्तीनें हिंदूंना खिस्ती करावें असा त्यांच्या मनाचा डाव आहे असें कांहींकांना वाटे! पण जगांतील बहुतेक सर्व देशांतले खिस्ती उपाध्याय व विशेषत: हिंदुस्थानांतले मिशनरी त्यांना पाण्यांत पहातात, ही गोष्ट जगजाहीर आहे. तेव्हां खिस्ती करण्याचा डाव त्यांच्या पोटांत आहे असें मानणें युक्तीस पटणार नाहीं. हिंदुस्थानचें लक्ष राजकारणावरून उडवून हिंदी लोकांस धार्मिक भोळे-पणाची कांस धरण्यास शिकवावें, व अशा रीतीनें इंग्रजी नोकरशाहीचें राज्य हिंदुस्थानांत चिरकाल टिकवावें, असाहि डाव त्यांच्या मनांत आहे ही कित्येकांची पूर्वी शंका असे. पण जेव्हां स्वराज्य हा शब्द उच्चा-रण्याचीहि हिंदुस्थानांत चोरी होती, त्या वेळीं लो. टिळकांशीं संगन-मत करून डॉ. बेझंट यांनीं स्वराज्याची प्रचंड चळवळ सर्व हिंदु-स्थानभर केली; व त्यामुळें सरकारनें संतापून त्यांस अटकेंत ठेविलें, ही गोष्ट लक्षांत घेतली असतां हाहि संशय सयुक्तिक वाटण्याजोगा नाहीं. डॉ. बेझंट यांच्या चरित्राविषयीं आमूलाग्र संशय घेणारीं जशीं कांहीं माणसें आढळतात, तशीं त्यांचेविषयीं निस्सीम प्रेम असणारींहि कांहीं माणसें आढळतात, हें मोठें आश्चर्य आहे. थिऑसॉफिकल सोसा-

यटी आज सर्व जगभर पसरलेली संस्था असून तींत नाना धर्मांचे, नाना देशचे व नाना जातींचे हजारों सुशिक्षित लोक आहेत. या सोसायटीच्या अध्यक्षपदावर कोणी बसावें हें सोसायटींतल्या सभासदांच्या मतावर अवलंबून असतें. ही अध्यक्षाची निवडणूक गेल्या पंचवीस वर्षांत चारदां झाली, व दर वेळीं डॉ. बेझंट यांस सुमारें शेंकडा पंचाण्णवच्या वर मतें मिळालीं होतीं हें पाहिलें म्हणजे महाराष्ट्रांतील लोकांस मोठें आश्चर्य वाटतें. जगांतील पस्तीस–चाळीस हजार सुशिक्षित माणसांस डॉ. बेझंट यांचेविषयीं इतका आदर कां वाटावा, अशी कोणती मोहनी बाईपाशीं आहे, हें कोडें महाराष्ट्रीयांस उलगडत नाहीं. डॉ. बेझंट ह्या मोठ्या अभिमानी व महत्त्वाकांक्षी आहेत, आपण स्वतः पुढें यावें अशी त्यांची सदा इच्छा असते, असाहि आक्षेप त्यांच्यावर घेण्यांत येत असतो. पण पंडित मालवीयांनीं जेव्हां काशीस हिंदुविश्वविद्यालय स्थापण्याचा संकल्प १९१५ च्या सुमारास कृतींत उतरविला त्या वेळीं आपण स्वतः पुढाकार घेऊन मोठ्या श्रमानें स्थापलेलें व मोठ्या हौसेनें सोळासतरा वर्षें चालविलेलें सेंट्रल हिंदु कॉलेज त्यांनीं अत्यंत निरपेक्षपणानें मालवीयजींच्या हवालीं केलें, ही गोष्ट पाहिली म्हणजे त्यांना अभिमानी व महत्त्वाकांक्षी म्हणणें कठीण होतें. महाराष्ट्रांत अनेक कॉलेजें आहेत व कांहीं कॉलेजांच्या इतिहासांत त्या कॉलेजांतील कित्येक पुढाऱ्यांना नाइलाजास्तव कॉलेज सोडावें लागल्याचे प्रसंगहि आहेत. असल्या प्रसंगीं किती कटकटी व किती तक्रारी होत असतात तें महाराष्ट्राला माहीत आहे. तेव्हां आपल्या कॉलेजचें बरें व्हावें म्हणून कोणतीहि तक्रार न करतां, बाईंनीं मन मोठें करून तें कॉलेज आनंदानें दुसऱ्याच्या हवालीं केलें, हें पाहून महाराष्ट्रीयांना तरी बाईंना महत्त्वाकांक्षी म्हणण्याचा अधिकार पोहोंचत नाहीं असें प्रस्तुत लेखकाच्या अल्पबुद्धीला वाटतें.

बाईंच्या चरित्रांत असे अनेक प्रसंग आहेत, कीं महाराष्ट्रीय लोकांच्या मनाला त्यांचा समाधानकारक उलगडा झालेला नाहीं. याचें खरें कारण डॉ. बेझंट यांच्या मनाची बैठक कशावर बसविलेली आहे याकडे त्यांचें पुरेसें लक्ष गेलेलें नाहीं हें होय. त्यांच्या चरित्राच्या शाखा व उपशाखा महाराष्ट्रीयांनीं पाहिलेल्या आहेत, पण त्या शाखांना कोणत्या मुळापासून जीवन मिळतें तें त्यांनीं पाहिलेलें नसल्यामुळें त्यांचा सहजच गैरसमज होतो, व त्या चरित्रांतील अनेक प्रसंगांमध्यें विरोध दिसूं लागतो. त्या गैरसमजांचें व विरोधांचें निराकरण व्हावें, व डॉ. बेझंट यांच्या चरित्रांतील नाना प्रसंगांची वाचकांना नीट संगति लावतां यावी अशा धोरणानें आम्हीं हें चरित्र लिहीत आहों. बाईंच्या चरित्रांतील सर्व लहानमोठे प्रसंग या छोट्या पुस्तकांत रंगवून सांगण्यास अवकाश नाहीं. फक्त त्या चरित्रांतील मुख्य मुख्य गोष्टी व त्या सर्वांत अनुस्यूत असलेला धागा वाचकांस दाखवून द्यावा इतकाच प्रस्तुत लेखकाचा मनोदय आहे.

डॉ. बेझंट या १८४७ सालीं ऑक्टोबरच्या पहिल्या तारखेस लंडन येथें जन्मल्या. त्यांचें माहेरचें आडनांव वूड असें होतें. त्यांची आई जातीनें आयरिश होती. आईची आईहि आयरिशच होती. त्यांच्या बापाची आईहि आयरिश होती. तेव्हां डॉ. बेझंट यांची जात आयरिश आहे असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. पण त्यांना शुद्ध आयरिश असें मात्र म्हणतां येणार नाहीं. कारण त्यांचा आजोबा—बापाचा बाप हा डेव्हनशायरमधील वूड घराण्यांतला, अर्थात् इंग्लिश होता. डॉ. बेझंट यांची आई गरीब घराण्यांतली होती. तिचा स्वभाव उत्कृष्ट असे. आपल्या शीलाबद्दल कोणीहि ब्र काढूं नये असें तिचें वर्तन असे. आपणाला कितीहि दुःख भोगावें लागलें, कितीहि विपत्ति आली, तरी तोंड सदा गोड ठेवावें व लोकांनीं नांव ठेवण्यास आपण कदापि जागा देऊं

नये असें तिला वाटे. ती आपल्या लौकिकास अष्टौप्रहर जपत असे. डॉ. बेझंट यांचा लहानपणीं आपल्या आईवर सारा जीव असे. सासरीं जाईपर्यंत आई म्हणजे त्यांचें परमप्रेमाचें व परमादराचें स्थान होतें. ती अत्यंत शुद्ध चारित्र्याची, स्वभावानें प्रेमळ व गोड पण मनांतून मानी अशी स्त्री होती. धार्मिक बाबतींत ती इतर स्त्रियांसारखी, म्हणजे भाविक व श्रद्धाळू होती.

डॉ. बेझंट यांचा बाप डॉक्टर होता; पण तो डॉक्टरीचा धंदा करीत असे असें मात्र वाटत नाहीं. तो अत्यंत बुद्धिमान् होता. गणित विषयाची त्याला आवड असे. फ्रेंच, जर्मन, इटॅलियन, स्पॅनिश व पोर्चुगीज या भाषा त्याला उत्तम येत असत; व हिब्रु, गेलिक या भाषांचाहि त्याला थोडासा परिचय असे. त्याला व्यापार वगैरेंत पैसे चांगले मिळत. तेव्हां कुटुंबाला सांपत्तिकदृष्टया कोणतीच अडचण नसे. निरनिराळ्या भाषांतील सुंदर सुंदर ग्रंथ आणावे, व बायको घरीं काम करीत असतांना ते तिला वाचून दाखवावे ह्याचा त्याला हव्यास होता. तत्त्वज्ञानाचाहि त्यानें चांगला अभ्यास केलेला होता. पण त्याची ख्रिस्ती धर्मावर श्रद्धा नव्हती. बायकोच्याजवळ ग्रंथाचें वाचन करीत असतांना तो कधीं कधीं धर्माची इतकी थट्टा करी कीं, हा पाखंडीपणा आपल्या कानांवर पडावयास नको म्हणून ती भाविक माउली तेथून एखाद वेळेस उठूनहि जात असे. पण ह्या धार्मिक विरोधामुळें त्या जोडप्याच्या प्रेमांत यत्किंचितहि अंतर पडलें नाहीं. पुरुषांनीं वाटेल ते ग्रंथ वाचावे व हवा तितका पाखंडीपणा करावा; पुरुषच ते! त्यांनीं कांहीं केलें तरी चालेल; पण बायकांनीं मात्र धर्म सोडतां कामा नये असें तिला सदा वाटे. त्यामुळें जरी नवरा पाखंडी व बायको श्रद्धाळू असली तरी त्या दोघांच्या प्रेमांत कधींच किंतु येऊं शकला नाहीं.

ह्या कुटुंबांत त्या वेळीं हें जोडपें व तीन मुलें होतीं. मुलांत सर्वांत वडील होता तो मुलगा होता. हा पुढें विश्वविद्यालयांत जाऊन शिकून विद्यासंपन्न झाला व पुष्कळ वर्षें जगलावांचला. त्याच्याहून लहान जी मुलगी होती तिचें नांव ॲनी. तिचेंच चरित्र आम्ही वाचकांस सादर करीत आहों. सर्वांत धाकटा असा आणखी एक मुलगा त्या जोडप्याला होता, पण तो अगदीं लहानपणींच वारला. ॲनी अगदीं लहान असतांना कुटुंब सुखी होतें; पण तिच्या पांचव्या वर्षापासून कुटुंबाला वाईट दिवस येण्याची सुरवात झाली. त्या वर्षी बाप वारला. डॉक्टर या नात्यानें एका हॉस्पिटलमध्यें तो प्रेताची चिरफाड करीत असतांना, प्रेताच्या हाडास त्याचें बोट लागून बोटास बारिकशी जखम झाली. त्याच्या मित्रमंडळीपैकीं कांहीं डॉक्टरांनीं तें बोट अजी कापून टाकावें असें त्यास सांगितलें, पण दुसरी डॉक्टर मंडळी भित्रेपणानें असें बोट कापण्याच्या कल्पनेची थट्टा करूं लागली. तेव्हां जखम आपोआप बरी होईल अशा भावनेनें बोट कापण्याचा विचार त्यानें सोडून दिला. पण पुढें कांहीं दिवसांनीं तें विष अंगांत भिनून त्याला झटपट क्षयाची ( Golloping Pthisis ) भावना झाली, व एकदोन महिन्यांतच त्यास मृत्यु आला. बापाच्या मागें कुटुंबास विपत्ति आली. आईपाशीं द्रव्याची माया सांठविलेली नव्हती, व पुढें कसें होईल ही विवंचना आईला लागली. बापाचे दोन नातलग मोठे व्यापारी होते. ते म्हणाले, वडील मुलाला सध्यां शाळेंत घालून आपण शिकवूं, आणि शाळा संपल्यावर मग त्याला आम्ही व्यापारधंद्यांत कोठें तरी लावून देऊं. पण आईला आपला मुलगा विश्वविद्यालयाचा पदवीधर व्हावा अशी महत्त्वाकांक्षा होती; व बापाचीहि मरणापूर्वीं तशीच इच्छा होती. मुलाला धर्मोपाध्याय करावा अशी आईची कल्पना, त्याला बॅरिस्टर करावा अशी बापाची भावना; पण दोघांनाहि तो विश्वविद्यालयांत

जावा असें वाटत होतें. बाप मरून विपत्ति आल्यावरहि त्या अभिमानी आईनें तोच निश्चय कायम ठेवला; व आपल्या व्यापारी नातलगांस नकार देऊन त्याला हॅरो येथील सुप्रसिद्ध शाळेंत घातलें. पण पैसे कोठून आणावयाचे ही विवंचना तिच्यामागें होती. उत्तम शाळा व ऑक्स्फर्ड–केम्ब्रिजचीं विश्वविद्यालयें हीं दुरून जरी सुंदर दिसत असलीं तरी पैशाशिवाय त्यांत मुलाला कसा प्रवेश मिळावा? या वेळीं त्या बाईला एक युक्ति सुचली, व तिनें हॅरो येथील हायस्कूलच्या हेडमास्तरच्या संमतीनें जवळच एक घर घेऊन त्या शाळेंत जाणाऱ्या कांहीं विद्यार्थ्यांची रहाण्याची व जेवणाखाण्याची तेथें सोय केली. त्या मुलांच्याकडून पैसे घ्यावे, व खर्चवेंच भागवून जी शिल्लक राहील त्यांतून स्वत:चा व मुलाबाळांचा आणि त्यांच्या शिक्षणाचा खर्च चालवावा, अशी ती योजना होती. अकरा वर्षें असला उद्योग त्या बाईनें केला व आपल्या मुलाचें हॅरो येथील शिक्षण संपवून केम्ब्रिजच्या विश्वविद्यालयांत त्याची रवानगी केली.

ॲनी हिला लहानपणीं आईचा फार लळा होता. समर्थांनीं म्हटल्याप्रमाणें 'क्षणभरी मातेस न देखे। तरी आक्रंदे रुदन करी दु:खें। ते समयीं मातेसारखें। आणीक कांहींच नाहीं ॥' अशी ह्या मुलीची स्थिति असे. आईहि मुलीला अत्यंत ममतेनें वागवी, व घरांत मुलीला पूर्ण स्वतंत्रता देई. आई घरांत काम करीत असतांना मुलगी सदा तिला बिलगून असावयाची, व आई घरांत जिकडे जिकडे हिंडेल तिकडे तिकडे मुलीनेंहि तिच्या पाठोपाठ जावयाचें, अशी लहानपणीं स्थिति असे. एक दिवस आई विनोदानें मुलीला म्हणाली, "मुली, मी एक दोरी आणणार आहें व त्या दोरीनें तुला माझ्या पदराला बांधून ठेवणार आहें. म्हणजे आपोआपच तूं माझ्याबरोबर घरभर हिंडशील." यांतला विनोदाचा भाग त्या मुलीच्या ध्यानांत आला नाहीं; व ती भोळेपणानें म्हणाली,

" खरेंच गडे, दोरी घेऊन ये, पण घट्ट गांठ बांधशील ना ? " मुलगी मोठी झाल्यावर ही तिची लहानपणची गोष्ट सांगून तिचे इष्टमित्र तिची थट्टा करीत असत, इतकें मुलीला आईचें वेड होतें. मुलीला घरीं पूर्ण स्वतंत्रता असल्यामुळें घरासभोंवतीं जीं झाडें असत त्या सर्वांवर ती आळीपाळीनें चढून बसे. मिल्टन कवीचें 'स्वर्गच्युति' ( Paradise Lost ) नांवाचें जें महाकाव्य आहे त्याची मुलीला फार आवड असे; व ती त्या झाडांवर बसून त्या काव्यांतील निरनिराळ्या देवदूतांचीं व सेटनचीं वीररसपूर्ण भाषणें मोठ्या उत्साहानें पाठ म्हणण्यांत तासचे तास घालवी.

ॲनी आठ वर्षांची असतांना एकदां एका शेजाऱ्याच्या घरीं गेली होती. तेथें कॅप्टन मॅरियट या सुप्रसिद्ध कादंबरीकाराच्या बहिणीनें त्या मुलीला पाहिलें, व तिचेबद्दल तिच्या मनांत सहजासहजीं चांगला ग्रह झाला. तिनें मुलीला मांडीवर बसवून कुरवाळलें व तिच्याशीं ती दोन गोड शब्द बोलली. ही मॅरियटबाई श्रीमान्, सुशिक्षित व सुसंस्कृत अशी स्त्री होती. तिची एक अल्पवयी पुतणी हॅरो येथें होती. त्या मुलीचें शिक्षण आपण आपल्या अंगावर घेऊन तडीस न्यावें अशा उद्देशानें मॅरियटबाई हॅरो येथें आली होती. मॅरियटबाईला ॲनीकडे बघून सहज वाटलें कीं, आपण आपल्या एकट्या मुलीचें शिक्षण न करतां या मुलीचेंहि शिक्षण तिच्याबरोबरच करावें. त्या हेतूनें दोन दिवसांनीं मॅरियटबाई ॲनीच्या आईकडे आली, व शिक्षणाकरितां तुमची मुलगी माझ्या स्वाधीन करा, अशी तिनें आईला विनंति केली. प्रथम आईला रुकार द्यावासा वाटला नाहीं; पण मॅरियटबाई फार थोर आहे, बुद्धिवान् आहे, शिक्षणासाठीं ती मुलीकडून बराच प्रवास करवील, व त्यानें मुलीच्या अंगीं शहाणपण येईल, हें शिक्षण सारें फुकट मिळेल, व कितीहि पैसे खर्च केले तरी इतक्या चांगल्या प्रकारचें खासगी शिक्षण

आपल्या मुलीला इतरत्र मिळण्याजोगें नाहीं वगैरे अनेक गोष्टींचा विचार करून आईनें मॅरियटबाईला 'हो' म्हटलें. पुढें कित्येक वर्षे ॲनीचें मॅरियटबाईनें शिक्षण केलें. तें शिक्षण चालू असतांना मधून मधून सुटी म्हणून मुलगी आईकडे रहावयास येत असे; पण इतर सारा वेळ मॅरियटबाईच्या गांवीं किंवा इतर देशीं मॅरियटबाईसमवेत ॲनी प्रवास करीत असे. तिनें शिक्षणासाठीं आणखीहि कांहीं मुलें आपणासभोंवतीं जमविलेलीं होतीं. तीं सारीं सुसंस्कृत कुटुंबांतील मुलें असून, ज्या आईबापांस मुलांच्या शिक्षणार्थ पुष्कळ पैसा खर्चण्याचें सामर्थ्य नाहीं अशांचींच मुलें तिनें ह्या शिक्षणाकरितां मुद्दाम निवडलेलीं होतीं. मॅरियटबाईची शिक्षणपद्धति विशेष प्रकारची होती. मुलांना साऱ्या गोष्टी ती आपणच शिकवी. फक्त गायन-वादन शिकविण्याकरितां तिनें एक दुसरा शिक्षक ठेविला होता. सर्व शिक्षण हंसून खेळून होत असे. लहान मुलाला स्पेलिंग आणि व्याकरण न शिकवितां ती भाषाविषय शिकवी. मुलांना फिरावयास न्यावयाचें, त्या वेळीं त्यांनीं जें पाहिलें असेल तें पत्ररूपानें त्यांस लिहावयास सांगावयाचें, सर्व मुलांस बरोबर घेऊन हीं पत्रें मोठ्यानें वाचावयाचीं, व तीं अशीं वाचावयाचीं कीं भाषेचे दोष मुलांच्या आपोआप ध्यानांत यावे, असें ती करी. सारख्या उच्चारांचे अनेक शब्द आठवून आठवून लिहा असें मुलांना सांगे, व मग स्पेलिंगची त्यांना कल्पना देई. फ्रेंच व जर्मन भाषाहि तिनें मुलांना मुख्यतः वाचनाच्या द्वारानें शिकविल्या. वाङ्मयांतील सुंदर सुंदर वेंचे ती निवडी, व ते मुलांना पाठ म्हणावयास सांगे. इतिहास शिकवायचा म्हणजे एका मुलानें इतिहासाचें पुस्तक मोठ्यानें वाचायचें व दुसऱ्या मुलांनीं तें ऐकावयाचें अशी तिची पद्धत असे. भूगोल शिकविण्यासाठीं निरनिराळ्या प्रान्तांचे नकाशे कापून ते ती मुलांना जुळवायला सांगे. नाचणें-बागडणें, वनभोजनास जाणें या गोष्टीहि तिच्या

शिक्षणांत येत. आदितवारच्या शाळामध्यें गरीबांच्या मुलांना बायबल शिकविण्यासाठीं ती आपल्या लहान शिष्यांना पाठवी व त्यांच्याकडून अगोदर भरपूर तयारी करून घेई. बायबलमधल्या गोष्टी सांगणें व सांगविणें, त्यांतील कांहीं भाग पाठ करविणें, बायबलमधील वर्णनावरून मुलांना ते ते प्रसंग ओळखावयास लावणें वगैरे युक्तिप्रयुक्तीनें ती मुलांना धर्मशिक्षण देई. आपल्या खाण्यांतील एखादा पदार्थ कमी करावयाचा व जे पैसे वांचतील त्यांचा दानधर्म करावयाचा, हा धडा मुलांना शिकवून ती परोपकार व आत्मसंयमन यांची बरोबरीनेंच वाढ करी. अशा प्रकारच्या मॅरियटबाईच्या शिक्षणछत्राखालीं ॲनी अनेक वर्षे होती; व देशोदेशीं शिक्षणाप्रीत्यर्थ मॅरियटबाईनें तिला प्रवासासहि नेलें होतें. ॲनी सोळा वर्षांची झाल्यावर हें शिक्षण संपलें. या शिक्षणाचा मुलीला अत्यंत उपयोग झाला, व स्वतःच्या पायांवर उभें राहून वाटेल त्या विषयाचा स्वतंत्रपणानें खोल अभ्यास करण्याचें सामर्थ्य ॲनीला या शिक्षणामुळेंच इतक्या लवकर आलें.

मॅरियटबाईनें दिलेलें शिक्षण व आईचें गृहशिक्षण या दोहींचा परिणाम ॲनीच्या मनावर होऊन ती लहानपणीं भाविक वृत्तीची बनली. स्त्रियांत सहज आढळणारा धर्मभोळेपणा ॲनीच्या वृत्तींत फारच मोठ्या प्रमाणांत होता. तो भाविकपणा ज्ञानाच्या पायावर उभारलेला नसला तरी मोठा जाज्वल्य होता. प्रणयकथा वाचणें, नाटकें पहाणें वगैरे गोष्टी करण्याला आईची बंदी असे. ॲनीच्या स्वभावांत मिळमिळीतपणा बिलकुल नव्हता. कोणतीहि गोष्ट उचलली तरी ती हौसेनें उचलावयाची व नेटानें चालवावयाची, अशी तिची तऱ्हा असे. त्या लहान वयांत या वृत्तीला धार्मिक वळण मिळालें. ख्राइस्टविषयीं ॲनीला जिव्हाळ्याची भक्ति व आपलेपणा वाटे. ख्रिस्ती धर्मासाठीं आपण कोणतें तरी महत्कार्य करावें, त्यासाठीं स्वतःची आहुती द्यावी, असे विचार लहानपणीं तिच्या मनांत

जोरजोरानें येत. या मिळमिळीत युगांत आपण कशासाठीं जन्मलों, जर जुन्या कालीं ख्राइस्टच्या समवेत जन्मण्याची आपणांस संधि मिळती तर किती तरी बरें झालें असतें. आपण त्या वेळीं वीरवृत्तीनें ख्रिस्ती धर्माचा प्रसार करून शत्रूंचा निःपात केला असता, धर्मासाठीं मोठाले पराक्रम करून स्वतःचा जीव हौसेनें धोक्यांत घातला असता, अशीं सुखस्वप्नें त्या वयांत तिला वारंवार पडून ती निराश होत असे. 'धर्मासाठीं मरावें' याचा तिला उत्साह वाटे, व तें हल्लींच्या युगांत शक्य नाहीं म्हणून तिचें मन खिन्न होई. चारचौघांसारखा औपचारिकरीत्या धर्म पाळून समाधान होईल अशी तिची वृत्ति नव्हती, तर तिच्या धर्माची बैठक वीरवृत्तीच्या व आत्मयज्ञाच्या पायावर उभारलेली होती. अगदीं लहानपणीं Pilgrim's Progress व Paradise Lost हीं पुस्तकें तिनें वाचलीं व त्यांनीं तिला वेड लाविलें. पुष्कळदां त्या पुस्तकांतील नाना प्रसंगांत आपण स्वतः कोणती तरी भूमिका घेतली आहे अशी कल्पना करून ती तींतच दंग होऊन जाई.

मॅरियटबाईच्या हाताखालचें शिक्षण संपल्यानंतर कांहीं वर्षें ॲनी हॅरो येथें आईपाशीं येऊन राहिली; व तीं तिचीं वर्षें अत्यानंदांत गेलीं. आईची सांपत्तिक स्थिति त्या वेळीं चांगली नव्हती. पुष्कळ वेळां तिला लोकांचीं देणीं द्यावीं लागत व त्यासाठीं पैशाची मोठी विवंचना असे. पण त्या माउलीनें आपल्या संसाराच्या काळजीविषयीं आपल्या मुलीजवळ कधीं चकारशब्दहि काढूं नये. मुलाचा कॉलेजचा खर्च भागवितां भागवितां तिची त्रेधा उडे, पण आपल्या मुलीच्या हृदयास दुःखाग्नीचा यत्किंचितहि स्पर्श होऊं नये यासाठीं ती आपलीं सारीं दुःखें आपल्या हृदयकपाटांत बंद करून ठेवी. सर्व दुःखें आपणासाठीं व सर्व सुखें आपल्या मुलीसाठीं, असा तिचा हिशेब असे. मुलीला घरचें कांहीं काम करूं द्यावयाचें नाहीं, तिचीं सर्व कामें आपण स्वतः करावयाचीं

हें तिनें धोरण ठेविलें होतें. मुलगी बाहेर जावयाची झाली कीं वेळेवर तिचे सारे कपडे व जिनसा बिनचूक आईनें तिजसमोर आणून ठेवायच्या, तिची वेणीफणी व इतर गोष्टी आईनें आपल्या हातानें करावयाच्या. मुलीनें आपण होऊन कांहीं काम करतें म्हणून म्हटलें तर 'नको, तूं आपली खेळ जा, नाहीं तर पुस्तकें वाच' असें आई सांगावयाची. अशा तऱ्हेचें शिक्षण बरें कीं वाईट हा मोठा प्रश्न आहे. प्रत्येक मुलीच्या पूर्ववयांत असले अल्लडपणाच्या आनंदाचे दिवस असले तर पुढें तिला त्यांची आठवण होऊन मन उल्लासित होतें हें खरें आहे, पण असल्या शिक्षणानें मूल आपल्या पायांवर उभें रहाण्यास शिकत नाहीं. जगांत भलींबुरीं माणसें असतात हें त्यांस समजत नाहीं, आणि जगांतील कर्तव्यांची कठोर जबाबदारी पेलण्यास तें समर्थ होत नाहीं; उलट भलत्या कल्पना मनांत धरून तें मूल जगाच्या बाजारांत व्यवहार करूं लागतें. ह्या शिक्षणाचा असा हा दोष आहे, व तो ह्या मुलीला पुढें पुष्कळच भोंवला. पण या वेळीं तिचा सारा वेळ आनंदांत गेला हें मात्र खरें. हवें तितकें खेळावें, हवीं तितकीं पुस्तकें वाचावीं, फिरायला जावें, घोड्यावर रपेट करावी, तिरंदाजी करावी, असल्या बहिरंगदृष्टीच्या उद्योगांत तिचा सारा वेळ जाई. अंतरंगांत दुसरा एक प्रवाह असे. मुलीच्या वाचनांत बहुतेक सारे भाविक धर्मग्रंथ असत. त्या वाचनानें अगोदरच जिव्हाळ्याच्या असलेल्या तिच्या भावना अधिकच तीव्र झाल्या, व ख्राइस्टची मूर्ति अंतर्यामीं कोरली जाऊन हृदयकमलाच्या पाकळ्या त्या मूर्तीच्या चरणीं रोज पडूं लागल्या. ध्यान करावें, उपास करावे, स्वतःस देहदंड करावा असेहि उद्योग ती करी. अशा प्रकारची शिस्त तिच्या अंतर्यामांतील झरा तिला आंतून लावीत होता. असें करीत असतां, ख्राइस्टला क्रॉसवर चढविण्यापूर्वीचे जे दिवस बायबलांत वर्णिलेले आहेत

त्या दिवसांचा इतिहास आपण तपशीलवार टिपून काढावा व मनानें त्या त्या दिवसांची स्वतःच्या चरित्रांत पुनरावृत्ति करावी, असें मुलीनें ठरवून टिपण करण्यास आरंभ केला. बायबलमध्यें ख्राइस्ट-चरित्र अनेक संतांनीं वर्णिलें आहे. तीं वर्णनें बारकाईनें वाचून मुलीनें प्रत्येक संतानें दिलेल्या तपशिलाचा तुलनात्मक तक्ता तयार केला. हेतु असा कीं, प्रत्येक दिवशीं घडलेल्या सर्व गोष्टी आपणास एकत्र सांपडाव्या, व आपण स्वतःच्या अंतर्यामीं त्या त्या दिवशीं त्या त्या सर्व गोष्टी मनानें अनुभवाव्या. पण हें करीत असतां बायबलमधील वर्णनें सुसंगत नाहींत, निरनिराळ्या संतांच्या वचनांत विरोध आहेत, हें सहजासहजीं तिच्या ध्यानांत आलें व तिच्या मनाला त्याचा जबरदस्त धक्का बसला! बायबल हा ईश्वरप्रणीत ग्रंथ आहे, त्यांत विरोध सांपडणें शक्य नाहीं अशी मुलीच्या मनाची दृढ भावना होती. पण जेव्हां प्रत्यक्ष विरोध दृष्टीस पडले तेव्हां तिच्या मनाचा घोंटाळा झाला. धर्मग्रंथाविषयीं संशय घेणें हें महत्पाप होय, अशी मुलीची त्या वेळची समजूत होती. तिनें ते सारे संशय आपल्या मनाबाहेर जोरानें झटकून टाकले, पापक्षालनार्थ उपास केले व अशा रीतीनें कसेंबसें मनाचें समाधान प्राप्त करून घेतलें!

अशा प्रकारें वयास एकोणीस वर्षे होईतोंपर्यंत मुलीचा काळ बहिरंगदृष्ट्या आनंदांत व अंतरंगदृष्ट्या धर्मनिष्ठेंत गेला. तिच्या चरित्राचा आनंदप्रवाह अशा रीतीनें सरळ चालला असतांना लवकरच एकाएकीं तो दुःखाच्या खडकावर आपटला, आणि जे धर्मसंशय मनाबाहेर श्रद्धेच्या बळावर तिनें झटकले होते ते पुनः अंतर्यामीं उत्पन्न होऊन त्या संशयपिशाचिकेनें तिला ग्रासून टाकलें हा कथाभाग आपण पुढील प्रकरणांत पाहूं.

---

# प्रकरण दुसरें

## लग्न व संशयाचें काहूर

डॉ. बेझंट यांची चरित्रनौका एकोणीस-वीस वर्षेपर्यंत आईच्या सन्निध निवाऱ्याच्या जागीं, जणुं बंदरांत ठेवल्यासारखी कशी होती तें आपण येथवर पाहिलें. १८६७ सालच्या डिसेंबर महिन्यांत त्यांचा रेव्हरंड मि. फ्रॅंक बेझंट यांच्याशीं विवाह होऊन ती चरित्रनौका उघड्या संसारसागरावर आली, व तेथें येते न येते तोंच वादळ सुटून लाटा खालवर हेलावूं लागल्या. तो कथाभाग आपणाला या प्रकरणांत पहावयाचा आहे.

डॉ. बेझंट यांची एका देवालयांतील उत्सवासंबंधींच्या कार्यांत त्यांच्या भावी पतीशीं गांठ पडली. ते केम्ब्रिजचे पदवीधर असून त्या देवालयांत धर्मोपाध्यायाची नोकरी करीत होते. युरोपियन पद्धतीप्रमाणें लग्न ठरावयाचें म्हणजे भावी जोडप्याची प्रथम बरीच ओळख व सलगी असावयाची, व लग्न मुख्यतः त्या दोघांनीं ठरवावयाचें. पण डॉ. बेझंट यांची व त्यांच्या भावी पतीची लग्नाच्या अगोदर तितकी जास्त ओळख नव्हती. देवालयांतील उत्सवाच्या निमित्तानें त्या दोघांची गांठ पडल्यानंतर आणखी एकदां अनेक मित्रमंडळी परगांवीं सहल करावयास गेली असतां तीं दोघें त्या पार्टीमध्यें होतीं, व तेथें आठ दिवस त्यांची ओळख झाली. पुढें ती सहल संपून घरोघरीं मंडळी जाण्याच्या वेळीं 'माझ्याशीं विवाह करा' असें मि. बेझंट यांनीं बाईला सुचविलें. त्यांच्याशीं लग्न करण्याचा विचार बाईंच्या मनास बिलकुल शिवलेला

नव्हता. तेव्हां त्यांचा तो अचानक संकल्प ऐकून बाईस आश्चर्य वाटलें. मात्र मानी स्वभावामुळें त्या क्षणीं त्या कांहींच बोलल्या नाहींत. त्यांचा निमूट रहाण्याचा अर्थ मि. बेझंट यांनीं काय केला असेल तें देव जाणे, पण त्यांस लगेच घाईघाईनें आगगाडी पकडावयाची होती; तेव्हां ते बाईंना म्हणाले, "तुम्ही ही माझी विनंति गुप्त ठेवा. मी तुमच्या आईस जाऊन भेटेन व त्यांची संमति घेईन." आईस विचारतां ती म्हणाली, 'मुलगी लहान व मुग्ध आहे; तेव्हां सध्यांच लग्नाचा वाङ्निश्चय नको.' अशा रीतीनें कांहीं महिने गेले. बाईंचा बाह्य उद्योग म्हणजे हवें तितकें खेळणें, हवीं तितकीं पुस्तकें वाचणें व सुखानें घरीं दिवस घालविणें असा होता. अंतरंगांत त्यांना धार्मिक वृत्तीची तळमळ लागली होती, व आपल्या धर्मासाठीं आपण कांहीं तरी कार्य करावें अशी ओढ त्यांचें मन घेत होतें. मि. बेझंट यांचेवर बाईंचें प्रेम होतें असें नाहीं, पण आपण धर्मोपाध्यायाची पत्नी झाल्यास आपल्या मनांतील देवाधर्माच्या कार्यास पुष्कळ वाव मिळेल असें त्यांचें मन त्यांस सांगूं लागलें, व आईच्या संमतीनें त्यांनीं कांहीं महिन्यांनीं मि. बेझंट यांस होकार दिला; प्रथम गांठ पडल्यानंतर पावणेदोन वर्षांनीं त्या दोघांचा विवाह घडून आला.

रेव्हरंड मि. बेझंट हे एक सामान्य प्रकारचे चारचौघांसारखे सद्गृहस्थ होते. भिक्षुकाची नोकरी करून इतरांसारखा आपण संसार थाटावा, जनरूढीप्रमाणें वागावें व लौकिक शिष्टाचार पाळून लोकांकडून बरें म्हणवून घ्यावें, अशी त्यांची वृत्ति असे. डॉ. बेझंट या विवाहाच्या वेळीं जगाविषयीं पूर्ण अज्ञानी होत्या. जगांतील दुःखांची झळ मुलीस बिलकूल लागूं नये म्हणून आईनें सदा आपल्या प्रेमछत्राखालीं मुलीला ठेवलेलें होतें. बाह्य जगांतील दुःखांची, काळज्यांची व बरेवाईटपणाची गंधवार्ताहि आईनें त्या मुलीला लागूं दिलेली नव्हती. स्त्रीपुरुष-

विवाह व विवाहित स्थिति म्हणजे काय, त्याच्या जबाबदाऱ्या व कर्तव्यें कोणतीं याची कल्पनाहि त्या मुलीच्या निर्मळ व निष्कपट मनाला आलेली नव्हती. असली मुलींची मुग्धता कवींनीं वर्णिली तर तें वर्णन वाचतांना वाचकांना गुदगुल्या वाटत असतील; पण जगाच्या व्यवहारांत ती मुग्धता साक्षात् भेटली तर भयावह होते. मुलगे शाळा-कॉलेजांत जातात आणि शिकतात, जगांतील नाना तऱ्हा व बऱ्यावाईट गोष्टी डोळ्यांनीं पहातात, जगाच्या विस्तृत मैदानावर मोकळेपणानें फिरण्याची त्यांना मुभा असते; आणि म्हणून ज्या गोष्टी त्यांना समजलेल्या असतात त्या सर्व मुलींनाहि समजलेल्या असतील असें पुरुष उगीचच्या उगीच धरून चालतात. पण मुलीला निष्कलंक ठेवण्यासाठीं मुद्दाम बांधलेल्या आवारांत तें ज्ञान कधीं कधीं मुळींच प्रवेश करूं शकत नाहीं असा अनुभव आहे. अशी मुलगी नवऱ्याच्या घरीं गेली म्हणजे आईचा आसरा एकदम तुटतो, ज्या आधारांवर इतके दिवस भार टाकला होता ते सारे माहेरीं राहिलेले अतएव दूर झालेले असतात; आणि तिच्या निष्पाप व हळव्या मनावर वैवाहिक जीवनाचे अनपेक्षित आघात होऊं लागले म्हणजे तिला औचित्यभंग वाटतो. आपल्या भीडमर्यादेवर आणि स्वाभिमानावर भयंकर घाला पडत आहे, व आपण त्या स्थितीला तोंड देण्यास असहाय आहों असें वाटून ती भयानें गांगरून जाते. ॲनी ही मुलगी अशा प्रकारची होती. ती ध्येयांच्या लतामंडपांत सुखस्वप्नांच्या फुलांचा आस्वाद घेत इतकीं वर्षें राहिली होती. ती एकदम वैवाहिक जीवनाच्या बाजारांत येतांच तिला कसेंसेंच वाटूं लागलें.

संसारांतलीं गृहकृत्यें उत्कृष्ट प्रकारें करून आपण आपल्या पतीला आनंदवावें अशी डॉ. बेझंट यांची इच्छा होती. पण त्यांस त्या गृहकृत्यांचा सराव नव्हता; कोणत्या जिनसेला किती पैसा पडतो, काढ-

कसर कशी व कोठें करावी यांचें त्यांस बिलकुल ज्ञान नव्हतें. आपलें घरांतील काम चटचट उरकावें, बारीक गोष्टींत उगीच वेळ दवडूं नये, व पुस्तकें वाचीत, ध्येयांचा विचार करीत, आणि जगाची चिंता वहात आपला इतर सारा वेळ घालवावा ही त्यांची मनची हौस. मि. बेझंट यांची वृत्ति अगदीं वेगळी होती. मी घराचा मालक व यजमान, तेव्हां माझ्या बायकोनें सदा माझ्या अर्ध्या वचनांत असावें, अशी त्यांची अपेक्षा. जगांतील बहुतेक नवऱ्यांची अपेक्षा अशीच असते, व तींत वावगें असें कोणाला कांहीं वाटत नाहीं. पण डॉ. बेझंट यांची वृत्ति व त्यांचें पूर्वशिक्षण या अपेक्षेला मुळींच जुळण्याजोगें नव्हतें. त्यांना स्वतंत्रतेची संवय होती, स्वभावांत मानीपणा होता, भावना उत्कट होत्या, कोणाकडूनहि कठोर शब्द ऐकण्याचा त्यांच्या मनाला सराव नव्हता. 'तूं अमूक कर' अशीं आज्ञार्थी वाक्यें त्यांनीं पूर्वीं कधीं ऐकलेलीं नव्हतीं. त्यांचा नवरा संसारांतल्या बारीक गोष्टींत सदा लक्ष घालणारा, व्यवस्थित, हिशोबी व मेजकेपणानें वागणारा होता. संसाराच्या गोष्टी तंतोतंत त्याच्या म्हणण्याप्रमाणें न झाल्या तर रागवावें, व एकदां राग आल्यावर मन लवकर शान्त होऊं नये असा त्याचा स्वभाव. त्याची कांटेतोल शिस्त आपल्यावर लादलेली पहातांच डॉ. बेझंट या प्रथम आश्चर्यमूढ झाल्या, पुढें डोळ्यांत गंगायमुना लोटूं लागल्या, आणि शेवटीं दगडासारखें मन घट्ट करून रहावें अशी त्यांची स्थिति आली. मोकळ्या वृत्तीची ही आनंदी मुलगी लग्न झाल्यावर लवकरच मनाची स्थिति आपल्या मनांत कुलुपबंद ठेवणारी आंतल्या गांठीची स्त्री झाली; तिच्या मनांतलीं सर्व सुखस्वप्नें पार नाहींशीं झालीं. मन आईकडे ओढ घेई, पण मि. बेझंट यांस तें आवडेना. इतर ज्या शेजारच्या स्त्रिया त्यांस भेटावयास येत, त्या सभोंवतालच्या लोकांच्या कुटाळक्या करून त्यासंबंधानेंच सदा बोलत; कोणाच्या मोलकरणीचें मन कोणत्या पुरुषावर

आहे, कोणाचा आचारी किती जिनसा फुकट घालवितो, कोणास किती मुलें आहेत वगैरे गोष्टींखेरीज त्यांचें बोलणें नसे; व डॉ. बेझंट यांस त्याचा अगदीं कंटाळा वाटे. धर्माचे मूलग्राही प्रश्न, ईश्वरभक्ति, जनहिताच्या सार्वजनिक गोष्टी यांचा डॉ. बेझंट यांना हव्यास. तेव्हां त्यांची करमणूक वरच्यासारख्या चकाट्या पिटणाऱ्या बायकांकडून कशी व्हावी! खरोखरी आपल्या अंतर्यामांतील खोल भावनांचा ठाव वेळींच घेऊन डॉ. बेझंट यांनीं लग्नच करावयाचें नव्हतें. पण त्या लहान वयांत त्यांना स्वत:च्या अंतर्यामाचा ठाव लागणें शक्य नव्हतें. अर्थात् जनरूढीप्रमाणें त्यांनीं लग्न केलें, पण जनरूढीच्या विरुद्ध त्यांची मनोरचना असल्यामुळें त्यांस त्याचें भरपूर प्रायश्चित्त भोगावें लागलें. हा दोष त्यांचा नव्हे, त्यांच्या पतीचाहि नव्हे; तो अंशत: जनरूढीचा व अंशत: विवाहसंस्थेचा आहे. त्याला कोण काय करणार?

लग्न झाल्यावर वरील कारणांमुळें डॉ. बेझंट यांची प्रकृति बरीच खालावली. १८६९ सालीं त्यांना मुलगा झाला. मुलाच्या जन्मापूर्वी त्या कित्येक महिने आजारी होत्या. मुलास घेण्याकरितां बाई ठेवणें त्या कुटुंबाला परवडण्याजोगें नव्हतें. अर्थात् त्या तान्ह्या मुलाच्या सर्व गोष्टी त्यांना स्वत:लाच कराव्या लागत. पण त्या मुलाचा सांभाळ करण्यांत त्यांचा काळ आनंदांत जाई, व स्वत:च्या दु:खाचा त्यांना थोडाफार विसर पडे. मुलगा झाल्यावर त्याच्या सेवेंत राहिल्यानें त्यांचा आईकडचा ओढा सहजच थोडा कमी झाला. मुलाची प्रकृति बरी होती. मुलाच्या जन्मानंतर दीड-दोन वर्षांनीं त्यांना मुलगी झाली. पुरे दिवस भरण्याच्या जरा अगोदर ती जन्मल्यामुळें ती जन्मत:च नाजुक प्रकृतीची होती. लवकरच त्या दोघां मुलांना डांग्या खोकला लागला, व त्या खोकल्यानें मुलीची प्राणान्तिक अवस्था केली. डॉक्टरनें तिची आशा सोडली होती. तिची सारी शुश्रूषा बाईंना एकट्यानें करावी लागे. रात्रंदिवस

तिला मांडीवर घेऊन त्या एकाकी बसलेल्या असत. दुधाचा थेंब ज़री मुलीच्या जिभेवर घातला तरी तिला खोकल्याची उबळ येई, व शेवटीं थकून ती इतकी निश्चेष्ट पडे कीं तिच्या हृदयांत धुगधुगी आहे कीं नाहीं हें ओळखण्याचीहि मारामार पडे. पण या आजारांतून ती दैव-योगानें कशीबशी निभावली. ती जरा बरी होते न होते तों डॉ. बेझंट यांची प्रकृति एकदम ढांसळली व त्यांनींच स्वत: अंथरूण धरलें. त्या आजारांत त्यांस देहाचे व मनाचे दारुण क्लेश भोगावे लागले.

या आजारांत असतांना प्रथम त्यांना एका मोठ्या संशयानें घेरलें. जर ख्राइस्ट प्रभु प्रेममय आहे, तर माझ्या ह्या निष्पाप सात महिन्यांच्या मुलीवर त्यानें आजार कां आणावा? हा संशय त्यांच्या मनानें प्रथम या वेळीं घेतला. त्यांची ईश्वरभक्ति जिव्हाळ्याची व उत्कट होती. तितक्याच उत्कटपणानें हा संशय त्यांच्या मनासमोर उभा राहिला. ख्राइस्ट हा खराखुरा जिवंत पुरुष आहे, तो जीवांना तारतो, अशी बाईंची अगोदरची निष्ठा होती; व ती जितकी जाज्वल्य होती तितक्याच जोराचा संशय त्यांच्या मनांत येऊन त्यानें त्यांच्या अतर्यामीं ठाणें दिलें. बाईंनीं पूर्वी गरीब व अनाथ लोकांस मदत करण्याचें कार्य केलेलें होतें, व त्यांचीं दु:खें त्यांनीं पाहिलेलीं होतीं. त्यांच्या आईला एका वकिलानें साफ फसवून त्यांचेवर एक कर्जाचा बोजाहि उत्पन्न केला होता, व त्यामुळें तिच्या मानी स्वभावास परम दु:ख झालेलें होतें. बाईंचें स्वत:चें पूर्वीचें आनंदपूर्ण चरित्र विवाहानंतर एकदम दु:खपूर्ण झालेलें होतें. याहि गोष्टी त्यांच्या मनांत येऊन त्यांचा संशय बळावत गेला. माझ्या तान्ह्या मुलावर परमदयाळ ईश्वरानें भयंकर आजार आणून त्याचे त्यानें हालहाल कां करावे? ही त्यांच्या संशयाची मुहूर्तमेढ होती व तीस ह्या इतर गोष्टींचा दुजोरा मिळालेला होता. ह्या संशयांचा आघात

जवळ दुभंगून जाण्याची पाळी आली. स्वत:च्या आजारांत त्यांच्या त्या संशयपिशाच्चिकेस सुरवात झाली, व ही अंतरंगांतील क्षोभाची मन:-स्थिति पुढें कित्येक वर्षें टिकली. ज्याच्या हृदयांत ईश्वराविषयीं जिव्हाळ्याची भक्ति नसेल त्याला असल्या संशयानें माणसाचें मन कसें हादरून जातें, त्याचे सारे आधार सुटून गेल्यामुळें तें कसें कोलमडूं लागतें याची कल्पना होणार नाहीं. एक वेळ नरकयातना बऱ्या पण हे क्लेश नकोत, इतका मनस्ताप बाईंना त्या काळीं या संशयाच्या काहूरापासून झाला. धरणीकंप होऊन आपल्या जीवाचा पायाच्च अजी खचत आहे, स्वत:ची नौका उघड्या समुद्रावर साफ उलटत आहे, अंतर्यामींची ज्योत साफ विझून नैराश्यानें सर्व जग भरलेलें दिसत आहे अशी त्यांची अवस्था झाली. दयाघन ईश्वरानें ( ख्राइस्टनें ) जग खरोखरीच निर्माण केलें असेल तर त्या जगांत दु:ख कां, आणि तें निरपराधी माणसांवर त्यानें लादावें कां? हे संशय त्यांचा पिच्छा सोडीनात.

हिंदुधर्मांत या प्रश्नांस समाधानकारक उत्तरें आहेत; पण ख्रिस्ती धर्मांत तीं नाहींत, निदान सध्यांच्या ख्रिस्ती लोकांस तरी तीं अवगत नाहींत. ख्रिस्ती धर्म हा भक्तिप्रधान धर्म आहे. त्याच्या प्रचलित स्वरूपांत जिज्ञासूचें पूर्ण समाधान करणारी सामग्री नाहीं. मनुष्य हा जीवात्मा आहे, तो ईश्वरांश असल्यामुळें ईश्वरी स्वातंत्र्याचा अंश त्याच्यामध्यें आहे, त्या स्वातंत्र्याच्या बळावर जी योग्य दिसेल ती क्रिया तो करील, पण त्या क्रियेचे परिणाम त्याला अवश्यमेव भोगावे लागतील, माणसाला अनेक जन्म असतात व एका जन्मांतल्या क्रियांचे परिणाम त्याच जन्मांत त्यानें भोगले नसल्यास ते पुढील जन्मांत त्यास भोगणें प्राप्त होतें, ईश्वर दयाळू असला तरी कर्माचे परिणाम ज्याचे त्यानें भोगले पाहिजेत या न्यायनिष्ठुर दिसणाऱ्या पण परिणामीं हितकर असणाऱ्या नियमांत तो ढवळाढवळ करीत नाहीं, भोळ्या आईची वेडी माया दाख-

वून माणसाच्या वाईट वर्तनाला उत्तेजन देण्यासाठीं त्यानें जग निर्मिलेलें नाहीं, जगांतील दुःख माणसांनीं केलेलें आहे, तीं माणसें अज्ञ असल्यामुळें अनुचित गोष्टी करतात व त्याचा परिणाम म्हणून जगांत दुःख येतें, दुःख भोगून माणूस योग्यायोग्य—कर्तव्याकर्तव्य शिकतो, अर्थात् त्या दुःखांत शिक्षण असतें वगैरे सिद्धान्त खिस्ती धर्मांत नाहींत. उलट माणसाच्या पापाची क्षमा खाइस्ट करतो, त्याचेवर श्रद्धा नसल्यास माणसाला यावच्चंद्र दिवाकरौ नरकांत पडावें लागतें वगैरे भक्तिभावाच्या अनेक भोळया कल्पना त्यांत आहेत. डॉ. बेझंट यांची खिस्ती धर्मावरील श्रद्धा भोळी होती. ती कितीहि जिवंत असली, जिव्हाळ्याची असली, तीव्र असली तरी ती ज्ञानमूलक नव्हती. अर्थात् संशयाला तोंड देण्याचें सामर्थ्य तींत नव्हतें. आणि बाई मनानें प्रामाणिक व उत्कट असल्यामुळें त्या संशयांचें काहूर त्यांच्या हृदयांत उठल्याबरोबर त्यांचा तो खिस्ती धर्म लटपटूं लागला.

बायबलमध्यें परस्पर-विरोधी वचनें आहेत हें पाहून, बायबल हा विश्वसनीय ग्रंथ आहे का, हा संशय बाईंच्या मनांत लग्नापूर्वीच आलेला होता. त्यानेंहि याच वेळीं आपलें डोकें वर काढलें. मेल्यावर खाइस्ट ज्या नरकयातनांत माणसाला घालतो त्या अक्षय टिकणाऱ्या असतात का? शब्दप्रमाण म्हणून बायबलचा शंभर नंबरी कस लागेल का? बायबलला जर प्रमाण मानावयाचें तर त्यांत दोष व अनीतिकारक गोष्टी कशा व कां आल्या? ईश्वरानें जगाच्या पापांबद्दल खाइस्टचा बळी घेऊन सर्व माणसांचीं पापें पुसून टाकलीं, हा सिद्धान्त न्यायतः बरोबर आहे का? असले अनेक नवीन प्रश्न मग त्यांच्या मनास टोंचूं लागले. निरनिराळे ग्रंथ वाचावे, उपाध्यायमंडळींना विचारून पहावें, हे उपाय त्यांनीं त्या वेळीं केले, पण प्रश्नांचीं उत्तरें कोठेंच मिळेनात. त्यामुळें त्यांचें डोकें भणभणूं लागलें. एकदां त्यांस या स्थितीचा इतका कंटाळा आला कीं,

आपल्या आयुष्याचा एकदांचा शेवट करून त्यांतून आपण सुटावें असा विचार त्यांच्या मनांत आला. लगेच त्यांनीं क्लोरोफार्मची बाटली आपल्या खोलींतून आणली व बूच काढून ती तोंडास लावण्यासाठीं उचलणार तोंच ' कोण हा नामर्दपणा, कोण हा भित्रेपणा ! धर्मासाठीं प्राणाची आहुति देण्याच्या गोष्टी बोलत होतीस, आणि दु:खाचीं चारदोन वर्षेंहि तुला सोसवत नाहींत !' असे शब्द त्यांच्या कानांवर पडले. कोणी तरी ते शब्द आपणाला बोलला, असा त्यांना भास झाला वत्यांनीं ती बाटली भिरकावून दिली. असल्या अस्वस्थ स्थितींत पुष्कळ दिवस राहिल्यानें त्यांची प्रकृति पुन:पुन: बिघडे, व पुन:पुन: त्या अंथरुणास खिळत. कधीं कधीं डोकें इतकें दुखे कीं तें सहन होईना, अंथरुणावरून उठवेना, उजेड सोसेना व झोंपहि येईना. डॉक्टरनें हरप्रयत्न केले, पण त्याच्या औषधाचा गुणच येईना.

आधींच त्यांचें व त्यांच्या नवऱ्याचें पटत नव्हतें. त्यांत या साऱ्या गोष्टींची भर पडली; तेव्हां गृहसौख्य पार नाहींसें झालें यांत नवल नाहीं. स्वयंपाक करणें, नवऱ्याचे पाय चेपणें, त्याच्या डोक्यास तूप लावणें, मुलास न्हाऊं-खाऊं घालणें हें बायकोचें काम; तें सोडून इहपरलोकींच्या धार्मिक, बौद्धिक व नैतिक प्रश्नांनीं जी स्त्री स्वत:चें डोकें पिकवून घेईल आणि असल्या शुष्क व पोकळ गोष्टींपायीं स्वत:ची प्रकृति खराब करील, जे प्रश्न मोठ्या तत्त्ववेत्त्यांसहि सुटले नाहींत त्या प्रश्नांच्या नादीं लागून आपल्या कुटुंबसौख्याचें मातेरें करील, तिला सगळे लोक नांवें ठेवूं लागावयाचे हें उघड आहे. मि. बेझंट यांना हें बिलकुल खपेना. मनाचे संशय फिटण्यासाठीं बाईंनीं ख्रिस्ती धर्मावर अनेक मोठमोठे ग्रंथ वाचले. त्यांच्या सर्व प्रश्नांच्या मुळाशीं, ईश्वराच्या घरीं न्याय आहे काय? हा मुद्दा होता. पण ग्रंथ जितके अधिक वाचावे तितके त्यांचे संशय अधिकाधिक बळावत गेले. ख्रिस्ती धर्माची तरफदारी कर-

णारे ग्रंथकार मुद्दयाच्या गोष्टी टाळून रिकामी वकिली करीत आहेत असें त्यांस दिसून आलें. ईश्वराला जर जगांतील दुःख नाहींसें करतां येत नसेल तर तो सर्वसमर्थ नाहीं, व तें नाहींसें करण्याची शक्ति असूनहि जर तो तें मुद्दाम नाहींसें करीत नसेल तर तो परमदयाळ नाहीं, हा पेंच त्यांना सोडवितां येईना. त्यांचा नवरा या साऱ्या प्रकाराला विटून गेला.

अशा मनःस्थितींत असतांना सत्य सांपडावें म्हणून बाईनीं नाना ग्रंथांचें वाचन चालू ठेविलें होतें. त्यांचा कित्येक धर्मोपाध्यायांशीं विचार-विनिमयहि मधून मधून चालू असे. डॉ. पूसे नांवाचे एक नामांकित धर्मोपाध्याय त्या वेळीं ऑक्स्फर्ड येथें होते. धर्माच्या क्षेत्रांत त्यांची योग्यता इतकी होती कीं, माणसाच्या संशयास कोणी उत्तर देण्याजोगा पुरुष असेल तर तो हाच होय असें लोक म्हणत. त्यांच्याशीं बाईनीं पत्र-व्यवहार सुरू केला व त्यांनीं बोलावल्यावरून त्या त्यांच्या भेटीस गेल्या. योग्य उत्तरें देऊन कोणी तरी माझ्या हृदयाचें समाधान करावें, अशी आस त्या वेळीं बाईच्या हृदयाला लागली होती. पण त्याबरोबरच सत्य काय आहे तें शोधण्याचा त्यांचा निर्धार होता. डॉ. पूसे यांनीं बाईंना निक्षून सांगितलें कीं, नास्तिकपणाचे संशय घेणें हें महत्पाप आहे, सत्य शोधणें हें तुमचें काम नाहीं, तुम्ही पुस्तकें वाचण्याचें बंद करा, देवाची प्रार्थना करा व धर्मावर श्रद्धा ठेवा. तुम्हीं स्वतःचे संशय इतरांस सांगून इतरांच्या डोक्यांत पाखंड घालाल तर तें माझ्या कामास पडावयाचें नाहीं, असेंहि बाईंना कठोर वाणीनें ते बोलले. हें 'शेषम् कोपेन पूरयेत्'चें पाखंड-रोगावरचें औषध बाईंना अर्थातच गोड वाटलें नाहीं व त्या निराशेनें त्यांच्या घरून परत आल्या.

त्या वेळीं त्यांस इतर अनेक धर्मोपाध्याय भेटले. त्यांपैकीं कांहींची ख्रिस्ती धर्मावर सर्वसामान्य श्रद्धा असली तरी, त्या धर्मांतील अनेक

आकुंचित गोष्टींवरून ती उडालेली आहे असा त्यांस अनुभव आला. त्यांस या वेळीं पाखंडमताचींहि अनेक विद्वान् माणसें भेटलीं. डॉ. टॉमस स्कॉट नांवाचे एक ज्ञानसंपन्न व वयोवृद्ध पुरुष त्या वेळीं विलायतेंत प्रसिद्ध होते. ते पाखंडी मताचे असत; व त्याविषयीं लहान लहान पण सुंदर पुस्तकें ते प्रसिद्ध करीत असत. त्यांच्या घरीं पुष्कळ बुद्धिमान् माणसें येत, व त्या सर्वांची मोठमोठ्या व गहन सिद्धान्तांबद्दल पुष्कळ चर्चा चाले. एकदां बाईच्या मनांत धर्माविषयींचे संशय दृढमूल झाल्यावर हळूहळू त्यांची मनोदेवता त्यांना नास्तिकवादाकडे ओढूं लागली. पुढें ग्रंथांचें वाचन, धर्ममतांचें मनन व चिंतन, निरनिराळ्या बुद्धिमान् माणसांशीं चर्चा या गोष्टींची भर पडून त्यांचा ओढा नास्तिक-वादाकडे बळावत चालला आणि कालगत्या ख्रिस्ती धर्मांतील अनेक सिद्धान्त खोटे आहेत, अशी त्यांच्या मनाची ठाम समजूत झाली.

नवरा धर्मोपाध्याय व बायको नास्तिक यांचें जमावें कसें? आस्तिक असतांना बाई जशा उत्कट वृत्तीच्या होत्या तशा नास्तिक झाल्यावर त्या तितक्याच उत्कट वृत्तीच्या झाल्या. 'धर्मासाठीं मरावें' ही पूर्वीची वृत्ति असे हें आपण पाहिलेंच आहे. अर्थात् विश्वास उडाल्यावर बाई जुन्या मतानुसार चालतील, आपणाला खोटे वाटणारे धर्मविधि निमूटपणें करतील, विश्वास नसला तरी भोंदूपणानें धर्माचे शिष्टाचार पाळतील हें शक्यच नव्हतें. नवऱ्याचे जे मित्र होते त्यांनीं त्याला भय घातलें कीं जर बायकोचा नास्तिकपणा तूं चालूं दिलास तर तुझी धर्मोपाध्यायाची नोकरी जाईल. नवरा देवळामध्यें 'होली कम्यूनियन'चा धर्मविधि करी; पण बाई पुढें त्यांत भाग घेईनाशा झाल्या. त्या धर्मविधीमध्यें तीर्थ म्हणून मद्य, व प्रसाद म्हणून पिठाची वडी सर्व धर्मोपाध्याय समंत्रक रीतीनें प्रत्येकाच्या तोंडांत घालतात. मद्य हें ख्राइस्टचें रक्त आहे व ती वडी हें ख्राइस्टचें मांस आहे असें ख्रिस्ती

धर्माचें मत आहे. छातीवर क्रॉसची खूण करून देवळांत असलेला भक्त धर्मोपाध्यायाजवळ गुढघे टेंकून उभा रहातो व विशिष्ट मंत्र म्हणून त्यानें ती पिठाची वडी आपल्या जिभेवर घ्यावयाची असते. या विधीवरील विश्वास उडून ख्रिस्ती धर्मांतल्या या विधीसंबंधाच्या कल्पना साफ चूक आहेत असा बाईचा निश्चय झाल्यावर त्या ह्या समारंभांत भाग घेईनाशा झाल्या. त्यानें लोकांत टीका सुरू झाली. बायकोचें हें करणें रुढिप्रिय नवऱ्याला अर्थातच पसंत पडलें नाहीं. लोक आपल्याला नांवें ठेवतील व कदाचित् आपली नोकरी जाईल असेंहि त्याला भय वाटलें असावें. तेव्हां त्यानें बायकोला ताकीद केली कीं, 'समारंभांत हजर राहून भाग घेतला पाहिजे.' बाई कबूल होईनात. तेव्हां नवऱ्यानें निर्वाणाचा संदेश सांगितला कीं, 'माझ्या घरीं रहावयाचें असेल तर माझें ऐकलें पाहिजे, नाहींपेक्षां माझ्या घरांत पाऊल ठेवूं देणार नाहीं. खुशाल दुसरें घर पहा.' भोंदूपणा करावयाचा नाहीं हा बाईचा निर्धार होता. अर्थात् त्यांस नवऱ्याचें घर सोडण्याविना गत्यंतर नव्हतें. तें सोडण्याचा प्रसंग त्यांचेवर १८७३ च्या जुलै-ऑगस्ट महिन्यांत म्हणजे लग्न झाल्यावर सुमारें सहा वर्षांनीं अशा प्रकारें आला.

विवाहोत्तरच्या ह्या सहा वर्षांत बाईची प्रकृति वारंवार नादुरुस्त होत असे. त्यांच्या मुलीच्या जिवावरचेंहि एक दुखणें या काळीं येऊन गेलें होतें. त्यांच्या हृदयांत धर्माच्या सत्यासत्यतेचे संशयकल्लोळ सारखे उठत असल्यामुळें त्यांचें मन या काळीं सदा दुःखीकष्टी असे; पण अशा अडचणींत त्या सांपडलेल्या असतांनाहि त्यांचें ग्रंथांचें वाचन व धर्मतत्त्वांचा शोध चालू होता. सत्यशोधनाच्या ह्या उद्योगांत असतांना त्या मोठमोठ्या विद्वान् माणसांशीं विचारविनिमय करीत असत हें सर्व वर आलेंच आहे. पण त्याखेरीजहि त्यांचे इतर उद्योग सुरू होते. त्या अनेक लेख लिहीत व ते ठिकठिकाणीं प्रसिद्धहि होत. त्या

वेळीं त्यांनीं एकदोन पुस्तकेंहि लिहिलीं आहेत. त्यांच्या नवऱ्याच्या ताब्यांतील देऊळ जेथें असे त्या गांवच्या गरीब लोकांत हिंडणें, त्यांची गरिबीची स्थिति प्रत्यक्ष अवलोकन करणें, त्यांना हरतऱ्हेची मदत करणें, आजारीपणांत त्यांची शुश्रुषा करणें वगैरे गोष्टी त्या वारंवार करीत असत; व त्यांच्या दु:खीकष्टी मनाला हे उद्योग समाधानहि देत असत. आजाऱ्यांची शुश्रुषा करण्याच्या कलेंत बाई अत्यंत निपुण होत्या, व तें काम त्यांना मनापासून आवडे. शेतकऱ्यांची कंगाल स्थिति कशी असते, त्यांच्या अडचणी कोणत्या असतात या गोष्टींचा प्रत्यक्ष अनुभव त्यांना या वेळीं मिळाला व त्यांच्याविषयींचे प्रश्न कसे सुटतील ह्याचा विचार ठरविण्यास त्यांना पुष्कळच संधि मिळाली. गरीब लोकांविषयीं प्रेम व सहानुभूति या भावनांचें बीजारोपण त्यांच्या हृदयांत याच काळीं झालें. आयर्लंडांतल्या राजकीय चळवळींचे कांहीं प्रतिध्वनी या वेळीं इंग्लंडांत उठून इंग्लंडांत कांहीं ठिकाणीं मारामाऱ्या झाल्या होत्या; व डॉ. बेझंट यांच्या कांहीं मित्रमंडळींचा त्या प्रकरणाशीं संबंध असल्यामुळें, सार्वजनिक प्रश्नांचा विचार करणें, लोकांच्या दंगलींत निर्भयपणें जाऊन त्यांस साहाय्य करणें, जनतेच्या स्वातंत्र्यासाठीं बोलणें व लिहिणें, आणि अन्यायाच्या विरुद्ध लोकमत जागृत करणें वगैरे गोष्टींचा ओनामाहि बाई या सहा वर्षांच्या विवाहित स्थितींतच शिकल्या. या सर्व धड्यांचा त्यांना पुढील आयुष्यांत फार उपयोग झाला हें पुढें दिसेलच.

एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत जगांत जे मोठमोठे वक्ते होऊन गेले त्यांत बाईंचें नांव पुष्कळच वर लागतें हें आमच्या वाचकांस माहीत आहेच. ही अलौकिक वक्तृत्वशक्ति त्यांना जन्मत:च प्राप्त झालेली आहे. पण लहानपणीं त्यांना स्वत:लाच आपल्या ठायीं असलेल्या ह्या शक्तीचा मागमूस नव्हता. ह्या शक्तीची ओळ-

खहि त्यांना ह्याच काळांत पटली. त्यांचा नवरा ज्या देवळांत धर्मोपाध्याय होता त्या देवळांत एकदां पियानो वाजविण्याचा अभ्यास करण्याकरितां त्या गेल्या होत्या. तें देऊळ त्या वेळीं बंद होतें, व त्या एकट्याच काय त्या तेथें होत्या. सभामंडपांतील सर्व खुर्च्या अर्थातच रिकाम्या होत्या. त्या वेळीं सहजासहजीं त्यांच्या मनांत विचार आला कीं आपण व्यासपीठावर उभें राहून भाषण करावें. त्या लगेच त्या उच्चासनावर विराजमान झाल्या; व शुकशुकाट असलेल्या त्या सभामंडपामध्यें भाषण करूं लागल्या! तें त्यांचें भाषण त्यांना स्वत:ला उत्कृष्ट वाटलें; आपल्या जिवंत वाणीचा अखंड शब्दप्रवाह वेगानें चाललेला ऐकून आणि आपले ओजस्वी विचार आपोआपच सुंदर वाक्यांच्या सांच्यांत ओतले गेलेले पाहून त्यांना स्वत:ला फार आनंद झाला व जगाला हालवूं शकणारी एक प्रचंड शक्ति आपल्या अंगीं उपजतच आहे, याचा त्यांना या वेळीं प्रत्यय आला. मात्र या वक्तृत्वशक्तीचा उपयोग करण्याची आपल्या आयुष्यांत आपणाला संधि मिळेल कीं नाहीं याविषयीं त्यांचें मन तेव्हां साशंक होतें! नवखंड पृथ्वीवर एकसारखी व्याख्यानें देत आपली भवितव्यता आपणाला पुढें साऱ्या देशांतून एकसारखी वणवण हिंडवणार आहे, याची कल्पना त्या खेडवळ उपाध्यायाच्या बायकोला तेव्हां कशी यावी?

---

## प्रकरण तिसरें



### डॉ. बेझंट यांचा नास्तिकवाद व जडवाद

डॉ. बेझंट यांची धर्मावरील श्रद्धा साफ उडून त्या नास्तिक झाल्या, ख्रिस्ती धर्मांतले विधीहि त्या करीनाशा झाल्या, त्यामुळें नवऱ्यानें त्यांस घराबाहेर घालविलें या गोष्टी पाहून त्यांच्या आईच्या मनाला जबरदस्त धक्का बसला. त्यांची आई भाविक व श्रद्धाळू होती; पण त्या श्रद्धेंत खरी सत्यजिज्ञासा नव्हती. तेव्हां सत्य शोधण्यासाठीं मुलीनें लौकिक चालीरीतींच्या उलट वागावें हें आईस बिलकुल आवडण्याजोगें नव्हतें. चारचौघांप्रमाणें आपल्या मुलीनेंहि धर्माचे शिष्टाचार पाळावे असें तिचें मत होतें. पंचवीस वर्षांची तरुण स्त्री नवऱ्यास सोडून वेगळी राहूं लागली म्हणजे लोक तिची किती निंदा करतील, तिच्या शीलावर नाहीं नाहीं ते आरोप कसे करतील ह्याचीहि तिला पूर्ण कल्पना होती. अर्थात् तिनें डॉ. बेझंट यांस मोडता घालण्याची शर्थ केली. मायलेकींचें परस्परांवर अत्यंत जिव्हाळ्याचें प्रेम होतें, आणि त्यामुळें आईचें मन मोडणें मुलीला अगदीं जिवावर आलें. कठोर माणसाला तोडणें सोपें असतें. ज्ञानेश्वरांनीं म्हटलें आहे कीं, कठीण लांकडाला सहज भोंक पाडणारा भ्रमर जर कमळांत अडकून बसला तर त्याला कमळाच्या त्या नाजुक पाकळ्या तोडून बाहेर येणें दुर्घट होतें. बाईंची तशीच स्थिती झाली. आपणाला सत्य शोधावयाचें आहे व प्राण गेला तरी भोंदूपणा करावयाचा नाहीं असा बाईंचा कृतनिश्चय होता. उलट, मुलगी प्रामाणिक आहे, तिच्या मनांत यत्किंचितहि दुर्बुद्धि नाहीं

याविषयीं आईची बालंबाल खात्री होती. तेव्हां बाईनीं आईची कशी-बशी समजूत केली, व जरी त्यांस मुलीचें करणें गोड वाटलें नसलें तरी कोणताहि किंतु मनांत न येतां दोघींचें प्रेम पूर्वीप्रमाणेंच कायम राहिलें हें पुढील हकीकतीवरून दिसून येईलच.

नवऱ्याचें घर सोडल्यावर कोठें रहावयाचें आणि आपला व मुलीचा चरितार्थ कसा चालवावयाचा हा डॉ. बेझंट यांच्यासमोर प्रश्न आला. बाईचा भाऊ* त्यांना आपल्या घरीं ठेवण्यास तयार होता; पण तुम्ही तोंडास खीळ घातली पाहिजे, व पाखंडी मताच्या लोकांशीं कोणताहि संबंध ठेवतां कामा नये अशी त्याची अट होती. आपणांला सत्य शोधण्यास संपूर्ण मुभा पाहिजे, व मतस्वातंत्र्यहि पाहिजे ही ज्या बाईची तळमळ ती असली अट कबूल करील हें शक्य नव्हतें. आईला दुःख देऊन व स्वतः दुःख सोसून, ज्या स्त्रीनें एक बेडी तोडली, व ती तोडतांना जिनें स्वतःच्या सर्वस्वावर तुळशीपत्र ठेवलें ती स्त्री आपला पाय पुनः दुसऱ्या खोड्यांत कसा अडकवील? अर्थातच बाई भावाकडे जाऊन राहिल्या नाहींत. बाईनीं नवऱ्याचें घर सोडल्यावर पतिपत्नींनीं वेगळें रहावें, व मुलगी आईच्या ताब्यांत असावी असें ठरविणारा एक कायदेशीर दस्तऐवज करण्यांत आला, व नवऱ्यानें एक अल्पशी रक्कम दरमहा बाईस पोटगीदाखल द्यावी, अशी अट त्या कागदांत नमूद करण्यांत आली. तदनुसार बाई निराळ्या राहूं लागल्यावर त्यांची समाजांत छी थू झाली, त्यांचेकडे पाहून सर्व लोक नाक मुरडूं लागले, व जुन्या मित्रांनीं आपले संबंधहि

*या भावाचा व डॉ. बेझंट यांचा संबंध येथपासून अजी तुटल्यासारखा दिसतो. बाईच्या पडत्या काळांत त्यानें त्यांना बिलकुल साहाय्य केलेलें दिसत नाहीं हें आश्चर्य आहे. त्याचें नांव हेन्री ट्रूमन वूड असें असून तो १८९० सालीं 'सर' झाला होता. १९२९ सालीं तो वारला.

तोडले; हें येथें मुद्दाम न सांगतांहि वाचकांस समजण्याजोगें आहे. पुढें आपलें व मुलीचें पोट कसें भरावें याची त्यांस विवंचना लागली. कांहीं काम मिळावें म्हणून त्यांनीं खटपट केली, कामाची माहिती देणाऱ्या जाहिराती वाचून त्या दिशेनें पैसेहि खर्च करून पाहिले. पण त्यांना त्यांच्याजोगतें कोणतेंहि काम मिळेना. नंतर लवकरच त्यांस अत्यंत विपन्न दशा आली. कालगत्या एका गृहस्थाला आपलीं मुलें सांभाळण्यास बाई पाहिजे होती तें काम करण्याचें बाईंनीं पत्करलें व त्याच्या घरीं त्या आपल्या लहान मुलीला घेऊन राहिल्या. बाईंनीं व त्यांच्या मुलीनें त्या घरीं जेऊनखाऊन फुकट रहावयाचें व त्याबद्दल त्या गृहस्थाचीं मुलें सांभाळावयाचीं, तीं सांभाळण्याबद्दल निराळें कांहीं वेतन त्यांना मिळावयाचें नाहीं, असें ठरलें होतें. अशा रीतीनें त्या दोघींचें पोट फुकट बाहेर पडे व नवऱ्याकडून बाईंना मिळणारे पैसे शिल्लक पडत. कित्येक दिवस त्यांना अशीं अनेक हलकीं कामें करावीं लागलीं. हातांत पोळपाट-लाटणें घेऊन स्वयंपाकीणबाई म्हणून रहाणें, दाई म्हणून रहाणें, झाडसारव वगैरे घरकाम करणें हे उद्योग त्यांच्या वांटयास आले. या वेळीं बाई पुस्तकाच्या सहाय्यानें स्वयंपाक करीत असत! स्वयंपाकीण म्हणूनहि त्यांचा लौकिक चांगला होता. पण अंगांतील स्नायु सकस नसल्यामुळें त्यांना झाडसारव करणें तितकें चांगलें साधत नसे. ज्या गृहस्थाच्या घरीं त्या नोकर म्हणून राहिल्या होत्या त्याचा मुलगा पुढें एकदां घटसर्पाच्या रोगानें आजारी पडला. तेव्हां बाईंना रुग्णशुश्रुषेचें काम करावें लागल्यामुळें त्यांच्या हातचें पोळपाट-लाटणें सुटलें. एक मुलगा बरा होतो न होतो तों दुसरा तापानें आजारी झाला. त्या तापाची सांथ दुसऱ्या कोणाला घरांत बाधूं नये म्हणून बाई त्या आजारी मुलास घेऊन घराच्या पोट-माळ्यावर एकटया रहात असत. बाईंचें जेवण खालच्या मजल्यावरून

रोज वर पोंचविलें जात असे. अशा रीतीनें त्यांनीं स्वत:चा जीव धोक्यांत घालून मुलाची शुश्रुषा केली; व दैवयोगानें तो बरा झाल्यावर त्यांनीं मोठ्या अभिमानानें मुलगा आईबापां या स्वाधीन केला. अर्थात् ज्याच्या घरीं बाई या वेळीं नोकर राहिल्या होत्या त्यास या बाईमध्यें कांहीं विशेष गुण आहेत असें जाणवल्याशिवाय राहिलें नसेलच.

अशा रीतीनें थोडे पैसे सांचल्यावर डॉ. बेझंट व त्यांची आई ह्यांनीं एकत्र रहावें असा मायलेकींचा बेत ठरला होता. पण त्या दोघींचा हा बेत जेथच्या तेथेंच राहिला. 'मी फार आजारी आहें, ताबडतोब भेटण्यास यावें' अशी डॉ. बेझंट यांना आईची तार आली; व त्या लगेच आगगाडीनें आईकडे निघून आल्या. आई हृदयाच्या विकारानें खरोखरीच फार आजारी झाली होती. ती थोड्याच दिवसांची सोबतीण आहे, असें डॉ. बेझंट यांना डॉक्टरनें आपलें मत सांगितलें. अर्थात् त्या वेळीं रात्रंदिवस डॉ. बेझंट यांनीं आपल्या आईची मनोभावानें सेवाचाकरी व शुश्रुषा केली. ख्रिस्ती लोकांत होली कम्यूनियनचा जो विधि आहे त्याची माहिती आम्हीं वर दिली आहेच. भाविक ख्रिस्ती लोकांची त्या विधीवर फार श्रद्धा असते. त्या विधीनें माणसाला मुक्ति मिळते असें त्यांस वाटत असतें. आपण मरण्याच्या अगोदर तो विधि करून प्रसाद घ्यावा अशी आईची फार इच्छा होती. पण आपण एकट्यानें प्रसाद घेण्याची तिची तयारी नव्हती. जर या संस्कारानें माणसाला मुक्ति मिळणार आहे, तर ती मुक्ति मला एकटीला नको; जर मी एकटीच मुक्ति मिळविणार व माझी मुलगी नरकांत पडणार अशी स्थिती असेल, तर ती मुक्ति घेऊन मला काय करावयाचें आहे; त्यापेक्षां माझ्या मुलीबरोबर मी नरकांत पडलें तरी पुरवलें असें ती हट्टानें म्हणूं लागली. तेव्हां बाई कित्येक उपाध्यायांकडे गेल्या, पण तुम्ही पाखंडी मताच्या असल्यामुळें आम्ही तुमच्यासाठीं हा विधि करणार नाहीं असें त्यांस

उत्तर मिळालें. आपल्या आईला सुखानें मरण यावें अशी बाईंची उत्कट इच्छा. पण आई एकट्यानें तो विधि करून घेण्यास तयार नव्हती. मी व माझी मुलगी या दोघींनीं त्या विधींत भाग घेतला पाहिजे हा तिचा आग्रह सुटेना, व मुलगी पाखंड मताची म्हणून उपाध्याय तो विधि करीनात. अर्थात् बाईंस इकडे आड व तिकडे विहीर असें झालें. डीन स्टॅन्ले नांवाचे एक ख्रिस्ती धर्मोपाध्याय त्या वेळीं विद्यमान होते. ते नामांकित ग्रंथकार असून त्यांचीं मतें उदार होतीं. त्यांस जाऊन विचारावें असा बाईंच्या मनांत विचार आला. तेहि बहुतकरून नकारच देतील अशी बाइच्या मनांत भीति होती; पण मृत्यूच्या द्वारीं आई बसली असतांना तिच्या समाधानासाठीं कोणती मातृभक्त मुलगी शक्य ते सारे उपाय केल्या-शिवाय राहील? तेव्हां बाई कोणासहि न कळवितां डीन स्टॅन्ले यांचेकडे गेल्या; व मी धर्मानें ख्रिस्ती नाहीं, मी नास्तिक मताची आहें, माझी आई मृत्युशय्येवर आहे,होली कम्यूनियनचाविधि करून प्रसाद घेण्याची तिची शेवटची इच्छा आहे; तो विधि एकट्यानें करून घेण्यास ती तयार नाहीं, आम्हीं दोघींनीं तो करावा असा तिचा आग्रह आहे; इतर उपाध्यायांनीं मला नाहीं म्हटलेलें आहे, पण माझी आई मरणोन्मुख असल्यामुळें मी आपणाला तशी विनंति करावयास आलेली आहें, वगैरे गोष्टी त्यांनीं त्यांस इत्थंभूत निवेदन केल्या. हें ऐकून स्टॅन्ले यांचें अंतःकरण कळव-ळलें. ते म्हणाले, " मी तुमच्या घरीं येऊन आईला भेटतों; तुमच्या धर्म-विषयक मतांबद्दलहि मी तुम्हाला प्रश्न विचारीन, आणि या अडचणीं-तून आपण कांहीं तरी मार्ग काढूं." हें ऐकून बाईंचें अंतःकरण कृतज्ञ-तेनें भरून आलें. मग ते बाईंच्या घरीं आले व त्यांच्याशीं धर्मविषयक चर्चा करून शेवटीं म्हणाले कीं, " जग कांहीं म्हणो; जो माणूस वर्तनानें थोर, स्वार्थत्यागी व निष्कलंक आहे त्याला मी ख्रिस्ती धर्माचा मानतों. तुम्हाला त्या विधींत भाग घेऊं देण्याला माझी मुळींच हरकत

नाहीं." नंतर त्यांनीं तो विधि केला व थोड्या दिवसांनीं बाईंची आई इहलोक सोडून गेली. मरतेवेळीं आई लेकीला म्हणाली, "मुली, तूं आतां उघडी पडणार!" आणि खरेंच तसें झालें.

आईच्या मृत्यूनें डॉ. बेझंट यांस इतकें दु:ख झालें कीं तें शब्दांनीं वर्णन करणें कठीण. त्यानंतरचे कित्येक महिने त्यांना अत्यंत वाईट गेले. पण आपल्या लहान मुलीकडे पाहून बाई आपलें दु:ख हळूहळू गिळावयास शिकल्या. ह्या विपन्न स्थितींत त्यांना मि. स्कॉट व त्यांची बायको यांचें फार साहाय्य झालें. त्यांना या वेळीं पोटभर अन्नहि खावयास रोज मिळत नसे. मुलीबरोबर त्या घरीं जेवत, व घराबाहेर जातांना मुलीला सांगत, कीं मी संध्याकाळीं खाणावळींत जेऊन येईन. मग त्या ब्रिटिश म्यूझियममध्यें ग्रंथवाचन करावयास जात; व रिकाम्या पोटींच घरीं येऊन झोंपत. मधून मधून मि. स्कॉट यांची बायको त्यांच्या घरीं येई व आग्रहानें त्यांस आपल्या घरीं नेऊन जेवावयास घाली. बाईंनीं लिहिलें आहे कीं, या विपन्न स्थितींत मी स्वत:च सांपडल्यामुळें, ज्यांस खावयास पुरेसें अन्न मिळत नाहीं अशा लोकांस कसे क्लेश भोगावे लागतात याचा मला अनुभव आला, व त्यानें माझें अंत:करण मृदु झालें. 'मला भूक लागली आहे, माझ्या पोटांत अन्न नाहीं,' असे शब्द मीं कोणाच्याहि तोंडांतून ऐकले कीं मला त्या माणसाचा कळवळा येतो, व त्याची क्षुधा निवारण्याचा मी यत्न करतें.

बाईंना आतां आपलें असें कोणी राहिलेलें नव्हतें, व आईच्या मृत्यूमुळें त्यांना अतीशय क्लेश होत होते. तेव्हां मुलीकडे पाहून त्या आपल्या मनाचें कसेंबसें समाधान करून घेऊं लागल्या. मुलगीहि स्वभावानें फार आनंदी असे. बाई तासांचे तास जरी काम करीत असल्या तरी त्यांच्या तोंडचे एकदोन शब्द ऐकून मुलगी त्यांत समाधान मानी, व एकटीच हौसेनें त्यांच्या सन्निध, त्यांस कोणताहि उपद्रव न देतां

खेळत राही. बाईनीं स्वतःच्या पोटाला जरी कितीहि चिमटा घेतला असला तरी मुलीला त्यांनीं कधींच कांहीं उणें पडूं दिलें नाहीं. संसारासाठीं बाईंना आपलें खिडुकमिडुक व कांहीं वस्त्रपात्रहि या वेळीं विकावें लागलें; व मुलीला सुख व्हावें म्हणून त्यांनीं तसें आनंदानें केलें. बाई कामासाठीं घराबाहेर गेल्या म्हणजे मुलगी त्यांच्या वाटेकडे डोळे लावून बसे व आई दिसूं लागल्यावर हर्षभरित होई. तिच्या आनंदांत बाईहि हळूहळू आपलें दुःख विसरावयास शिकल्या. आईच्या मृत्यूनें उदास झालेल्या आपल्या हृदयांत आपल्या मुलीची आनंदी मूर्ति प्रेमरज्जूनें बांधून टाकल्यावर त्यांना थोडथोडें बरें वाटूं लागलें.

त्याच सुमारास डॉ. बेझंट व चार्लस ब्रॅडलॉ यांची प्रथम गांठ पडली. ब्रॅडलॉ हे त्या वेळचे इंग्लंडांतले, किंबहुना सर्व जगांतले नास्तिक पंथांतील एक सर्वांत मोठे पुढारी होते. त्यामुळें बहुजनसमाज त्यांना नाकें मुरडी. डॉ. बेझंट यांच्या मनांतहि ब्रॅडलॉ यांच्याविषयीं अगोदर प्रतिकूलच ग्रह होते. मि. ब्रॅडलॉ यांच्या संपादकत्वाखालीं प्रसिद्ध होत असलेल्या ‘ नॅशनल रिफॉर्मर ’ नांवाच्या नियतकालिकाचा एक अंक डॉ. बेझंट यांच्या हातीं एक दिवस सहजासहजीं पडला; व त्या पत्रावरून त्यांना समजून आलें कीं, ‘ नॅशनल सेक्युलर सोसायटी ’ नांवाची एक स्वतंत्र विचार प्रसृत करणारी संस्था इंग्लंडांत स्थापन झालेली आहे. चौकशी करून बाई त्या सोसायटीच्या सभासद झाल्या. नंतर लवकरच (१८७४ च्या ऑगस्ट महिन्यांत) त्या हॉल ऑफ् सायन्स या ठिकाणीं ब्रॅडलॉ यांचें व्याख्यान ऐकण्याकरितां गेल्या. ब्रॅडलॉ हे त्या वेळीं इंग्लंडांतले अग्रगण्य वक्ते होते. त्यांचें त्या वेळचें व्याख्यान उत्तमांपैकीं झालें व बाईंच्या मनांत त्यानें ब्रॅडलॉ यांचेविषयीं अत्यंत अनुकूल ग्रह उत्पन्न झाला. त्या व्याख्यानानंतर ब्रॅडलॉ यांनीं नॅशनल सेक्युलर सोसायटीच्या सभासदत्वाचें बाईंचें सर्टिफिकीट त्यांच्या हवालीं केलें. त्या वेळीं ब्रॅडलॉ

यांची व बाईंची प्रथम ओळख झाली व लवकरच त्या दोघांमध्यें निकटचा मित्रभाव उत्पन्न झाला; व तो ब्रॅडलॉसाहेब कालवश होईपर्यंत म्हणजे सुमारें सतरा वर्षें कायम टिकला.

चार्लस ब्रॅडलॉ हे त्या काळचे एक सुप्रसिद्ध पुढारी होते हें वर सांगितलेंच आहे. ते मनानें अत्यंत थोर व वर्तनानें अत्यंत शुद्ध असत. जनतेचीं, विशेषत: गरीब लोकांची सेवा हें त्यांच्या आयुष्याचें ध्येय होतें. त्यांचीं मतें नास्तिकी वळणाचीं असत; व ते कोणालाच भीक घालणारे नसल्यामुळें निर्भीडपणें आपलीं मतें बोलून दाखवीत असत. त्यामुळें ते बहुजनसमाजाला अत्यंत अप्रिय वाटत. प्रारंभीं ते व्यापार-धंदा करीत असत. पण खिश्चन लोकांनीं त्यांना सारखा विरोध केल्या-मुळें त्यांना धंद्यांत बरकत आली नाहीं; उलट त्यांत त्यांना कर्ज झालें. तें फेडण्यासाठीं त्यांनीं आपला खर्च कमी केला, आपली बायको व मुली यांना सासऱ्याकडे पाठविलें; व दोन लहान खोल्या घेऊन ते लंडन शहरांत राहूं लागले. डॉ. बेझंट व ब्रॅडलॉ यांची गांठ या सुमारासच झाली. मग कांहीं दिवसांनीं बाईंनीं ब्रॅडलॉ यांस आपल्या घरीं येण्याविषयीं निमंत्रण दिलें. त्यावर ब्रॅडलॉ यांनीं बाईंस लिहिलें कीं, जनतेच्या मनांत माझ्या-विषयीं तीव्र द्वेष आहे, आपल्या घरीं मी आल्यास तुम्हांला त्याचा फार उपद्रव होईल; तरी मला निमंत्रण देण्यापूर्वी तुम्ही या परिणामांचा विचार करून पहा. मी त्याचा भुर्दंड सोसण्यास तयार आहें, असें बाईंनीं यावर त्यांस कळविलें; तेव्हां ते बाईंच्या घरीं आले. ब्रॅडलॉ यांनीं अगोदर सांगितल्याप्रमाणें बाईंस ते परिणाम खरोखरीच भोगावे लागले. त्यांशीं मित्रत्वाचा संबंध जोडल्यामुळें बाईंच्या ओळखीच्या पुष्कळ लोकांना वैषम्य वाटलें, व नास्तिक वादाचा पुरस्कार करणारींहि अनेक माणसें त्याबद्दल बाईंस नांवें ठेवावयास लागून त्यांचे व बाईंचे ऋणानुबंध तुटून गेले. ब्रॅडलॉ यांच्याविषयीं इतका तीव्र द्वेष त्या वेळीं लोकांचे मनांत होता!

डॉ. बेझंट व चार्लस ब्रॅडलॉ यांचा स्नेह जमल्यावर नास्तिकवादाचें पुढारीपण ब्रॅडलॉ यांच्या बरोबरीनें हळूहळू डॉ. बेझंट यांचेकडेहि आलें. हें पुढारीपण बाईकडे सुमारें तेरा-चवदा वर्षें होतें. दोघेंहि वक्तृत्वकलेंत अग्रेसर, दोघांची कार्यनिष्ठा जाज्वल्य, दोघेंहि अत्यंत स्वार्थत्यागी व बुद्धिवान्, दोघांची उद्योगशीलता व चिकाटी जबर; तेव्हां विलायतेंत, किंबहुना सर्व जगांत नास्तिक-वादाचे पुढारी म्हणून दोघांचें नांव दुमदुमूं लागलें यांत आश्चर्य वाटावयास नको. ब्रॅडलॉ हे डॉ. बेझंटपेक्षां चौदापंधरा वर्षांनीं वडील. सार्वजनिक उद्योगांत बाईपेक्षां ते बरेच अगोदर पडलेले. अर्थात् बाईस त्यांचा फारच फायदा झाला. ते जिवास जीव देणारे मित्र होते. डॉ. बेझंट यांस अडचणींच्या वेळीं हरएक प्रकारची मदत ते करीत. असला वैयक्तिक फायदा डॉ. बेझंट यांस झाला, इतकेंच नव्हे तर सार्वजनिक कामांतल्या पुढाऱ्यांस ज्या गोष्टी अवश्य शिकावयाच्या असतात त्यांचा ओनामा बाई ब्रॅडलॉ यांच्यापाशीं शिकल्या असें म्हटलें तर अतिशयोक्ति होणार नाहीं. डॉ. बेझंट ह्या जन्मतःच तरतरीत व वक्तृत्वपटु होत्या. कोणताहि तरतरीत व वक्तृत्वकुशल माणूस सामान्य दर्जाच्या लोकांचा पुढारी झाला तर तो त्यांचेवर सहज छाप पाडूं शकतो, मग असली अनुयायी मंडळी त्याचे देव्हारे माजवूं लागतात; व शेवटीं त्या सवंग लोकप्रियतेमुळें तो माणूस नुसता वरवर विचार करणारा व उथळ बनण्याचा संभव असतो. डॉ. बेझंट यांस हा इशारा ब्रॅडलॉसाहेब वारंवार देत. सार्वजनिक आयुष्यांत प्रत्येक पुढाऱ्यावर अवास्तव स्तुति व अवास्तव निंदा यांचा वर्षाव होत असतो, व त्याचें नाणें जर खरें असेल तर त्यानें या दोन्ही गोष्टी तृणवत् मानल्या पाहिजेत, असें ते वारंवार म्हणत. ‘अमक्या विषयावर माझें अमुक अमुक मत आहे असें प्रतिपादण्याच्या अगोदर त्या मताच्या सर्वस्वीं विरुद्ध असणारांचे विचार तुम्ही बारकाईनें अभ्यासिले पाहिजेत;’ ‘अमका

विषय मला अवगत आहे असें तुम्हाला म्हणावयाचें असेल तर जगांत सर्व बुद्धिवान् माणसांनीं त्याबद्दल जें जें म्हटलें असेल त्याची तुम्ही अगोदर माहिती करून घेतली असली पाहिजे;' 'न्यायनिष्ठुरपणानें माणसानें स्वत:वर टीका करीत असावें, आपलें भाषण आपणच ऐकून त्यावर तिऱ्हाइतासारखें मत द्यावें, आपणास जे लोक शिव्या देत असतात त्यांचें म्हणणें वाचून त्या शिव्यांत जे सत्याचे कण सांपडतील ते निवडून घ्यावे;' 'आपल्याच मताचे प्रतिध्वनि जे काढतात त्यांचे विचार वाचण्यांत वेळ फुकट घालवूं नये, तर आपल्या विरुद्ध असणाऱ्या लोकांचीं मतें वाचावीं म्हणजे आपल्या ध्यानांतून सुटलेले मुद्दे आपणाला चटकन् समजतात' वगैरे गोष्टी ते बाईंना वारंवार सांगत. बाईंच्या मतांवर, लेखांवर, व्याख्यानांवर, धोरणावर ते त्यांच्यासमोर खासगी रीतीनें जोरानें टीका करीत; त्यांतले दोष उघडकीस आणीत आणि अशा रीतीनें त्यांना शिकवीत. ब्रॅडलॉसारखा शिक्षक मिळाल्यावर बाईंनीं त्याचा पूर्ण फायदा करून घेतला हें सांगणें नकोच. 'ब्रॅडलॉ हे माझ्या सार्वजनिक चळवळींतील गुरु होत, त्यांच्या शिक्षेंत मी इतकें शहाणपण शिकलें कीं, त्यांचे उपकार फेडणें मला शक्य नाहीं.' असें बाईंनीं स्वत:च लिहिलें आहे.

डॉ. बेझंट या मनानें अत्यंत चंचल आहेत, त्यांचें मत कोणतेंच ठाम नसतें अशी टीका त्यांचेवर पुष्कळ माणसें करीत असतात. आमच्या वाचकांपैकीं ज्यांनीं प्रस्तुत पुस्तक येथवर काळजीनें वाचण्याची तसदी घेतली असेल त्यांस ही टीका किती फोल आहे तें सहज लक्षांत येईल. भाविकपणांतून नास्तिकवादाचा जन्म होणें हें वरवर पहाणारास जरी विचित्र वाटलें, तरी जिज्ञासू माणसाच्या मनाची वाढ प्राय: त्याच प्रकारानें होत असते हें आपण ध्यानांत ठेविलें पाहिजे. मनुष्य जन्मास आला म्हणजे आई-बाप व इतर वडील माणसें ज्या गोष्टी त्याला धर्म म्हणून शिकवितात त्या तो लहानपणीं सहजच शिकतो,

या गोष्टी बहुधा भोळ्या भावाच्या पायावर उभारलेल्या असतात. त्या दिशेचीं मतें व धार्मिक रूढी समाजांत सर्वत्र प्रचलित असतात व लहान मूल मोठें होऊं लागलें म्हणजे तें सहजच त्या धोरणानें वागतें. माणसानें धर्मावर निमूटपणें विश्वास ठेवला पाहिजे, आपल्या धर्माच्या सत्यतेविषयीं संशय घेणें हें पाप आहे, अशी बहुजनसमाजाची समजूत असते; आणि म्हणून तो धार्मिक बाबतींत स्वतंत्र विचार करण्यास कोणालाहि फारशी मुभा देत नाहीं. डॉ. बेझंट यांचें आरंभींचें शिक्षण जुन्या विचारांच्या माणसांच्या हाताखालींच झालेलें होतें. अर्थात् त्या सुमारें वीस वर्षांच्या होईपर्यंत--- म्हणजे त्यांचें लग्न होईपर्यंत--- त्यांची ख्रिस्ती धर्मावर भोळ्या भावाची श्रद्धा असली तर त्यांत नवल नाहीं. पुढें बुद्धीस प्रौढपणा येऊन त्या स्वतंत्र विचार करूं लागल्यावर, बायबलमध्यें परस्परविरोधी वचनें असून ख्रिस्ती धर्मांतील कित्येक तत्त्वें युक्तिवादास पटण्याजोगीं नाहींत, हें त्यांस आढळून आलें. त्यामुळें त्यांच्या मनांत धर्माविषयीं संशय उत्पन्न झाले; व मग सत्य काय आहे तें शोधण्यासाठीं त्यांनीं अनेक मोठमोठ्या लेखकांचे ग्रंथ वाचले, अनेक धर्मोपाध्यायांच्या गांठी घेतल्या, व त्या संशयांचीं समाधानकारक उत्तरें मिळत नाहींत असें पाहून ख्रिस्ती धर्मांतलीं तीं तत्त्वें विश्वसनीय नाहींत असें ठरविलें. यांत वावगें तें काय ? पुष्कळ बुद्धिवान् माणसांची अशीच स्थिति होत असते. पण त्यांपैकीं बहुतेकांस स्वतंत्र विचार करण्याचें धैर्य नसतें, किंवा तें असलें तरी आपले पाखंडी विचार लोकांसमोर मांडून व त्याप्रमाणें वर्तन करून लोकनिंदा सोसण्याची त्यांच्या अंगीं धमक नसते; अथवा आपण धर्मास खोटें म्हटलें तर देव आपणावर कोपेल, तो आपल्या संसारसुखांत माती कालवील असें चोरटें भय त्यांस वाटत असतें. म्हणून तीं माणसें गप्प बसतात. यावरून उघड आहे कीं, बाईचा नास्तिकवाद हा त्यांच्या जिज्ञासेचा, त्यांच्या उत्कट स्वभावाचा

व त्यांच्या धैर्याचा परिणाम होता. अर्थात् अंधपरंपरेनें जाणाऱ्या भ्याड लोकांना बाईस नांव ठेवण्याचा अधिकार पोहोंचत नाहीं.

बाईंचा हा नास्तिक-वाद तरी काय होता तें आपण येथें पाहूं या. हिंदु धर्मांत जेवढें विचारस्वातंत्र्य आहे तेवढें ख्रिस्ती धर्मांत आज नाहीं; आणि १८७५ सालच्या सुमारास तें आजच्यापेक्षांहि पुष्कळ कमी होतें. हिंदु धर्मांत 'साधनानाम् अनेकता' आहे, व विचारा-संबंधानें तर पूर्ण स्वातंत्र्य आहे. 'भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनम् कुतः' असें विचारणाऱ्या चार्वाकाला हिंदु धर्मानें आपल्या कक्षेबाहेर ढकललें नाहीं, आणि अनीश्वर-सांख्य मताला तर हिंदु धर्मानें आपल्या आवारांत गौरवानें उच्चासनावर बसविलें आहे. असल्या गोष्टींची माहिती ज्या सुशिक्षित हिंदूला असेल त्याला डॉ. बेझंट व ख्रिस्ती धर्म यांचा इतका मोठा खटका कां उडाला हें गूढ उकलणें थोडेंसें कठीण आहे. बाईंच्यासारखा नास्तिक जर हिंदु धर्मांत असता तर त्याचा हिंदु धर्माशीं तरी इतका मोठा खटका उडाला नसता याची आम्हांस खात्री वाटते. रामकृष्णपरमहंसांची गांठ पडण्यापूर्वी स्वामी विवेकानंदांस जसे लोक नास्तिक म्हणत असत तसें बाईंस आम्ही म्हटलें असतें, त्यांची थोडीफार निंदा केली असती, फार तर त्यांचेवर कांहीं समाजबहिष्कार पडता, इतकेंच आम्हांस वाटतें. नक्की त्यांस किती त्रास भोगावा लागता याची अटकळ करणें कठीण आहे; कारण हिंदु धर्मांत जनरूढी स्त्रीला पुरुषांच्या बरोबरीनें स्वातंत्र्य देत नाहीं. पण डॉ. बेझंटच्या जागीं जर मि. ब्रॅडलॉ असते व ते हिंदु धर्मांत असते तर त्यांस हिंदु धर्मानें ख्रिस्ती धर्माच्या इतका प्राणान्तिक विरोध केला नसता, व जो केला असता तो त्यांच्या मतास्तव नसून धर्माचार मोडल्याबद्दल केला असता. ख्रिस्ती धर्मांत जशीं आकुंचित वृत्तीचीं माणसें आहेत तशीं हिंदु धर्मांतहि पुष्कळ आहेत. पण हिंदु धर्मांत

ख्रिस्ती धर्मापेक्षां तत्त्वज्ञानाचा भाग पुष्कळ अधिक आहे, कोणत्याहि मताला त्यांत मज्जाव नाहीं, व सर्वांस भोळ्या भावाचा एकच मार्ग सांगण्यांत आलेला नसून माणसामाणसांच्या प्रकृतिभेदानुसार त्यांत वेगवेगळे पंथ काढलेले आहेत. अर्थात् हिंदु धर्माचें वातावरण अनेक दृष्टींनीं ख्रिस्ती धर्मापेक्षां अधिक मोकळें आहे.

डॉ. बेझंट व ब्रॅडलॉ यांनीं त्या वेळीं ज्या नास्तिक-वादाचा पुढाकार घेतला होता त्याचें कांहीं अंशीं आपल्या वेदान्ताशीं साम्य आहे हें आपण प्रथमच लक्षांत ठेवलें पाहिजे. 'मनःपूतं समाचरेत्' असें वागतां येण्यासाठीं व नैतिक बंधनें तोडून इंद्रियांचे पाहिजे तसे लाड पुरविण्यासाठीं लोक नास्तिक होतात असें आपणांस वाटतें. पण ती समजूत साफ खोटी आहे. निदान डॉ. बेझंट-ब्रॅडलॉसारख्या ध्येय-वादी, चारित्र्यवान् व लोकसेवेला वाहिलेल्या लोकांच्या नास्तिक-वादाला ती बिलकुल लागू नाहीं. बाईंच्या त्या वेळच्या नास्तिकवादांत बराच तात्त्विक भाग होता. तो आपल्या वेदान्ताशीं कांहीं बाबतींत मिळता आहे हें आश्चर्य आहे. वेदान्तांत ज्याला आत्मतत्त्व किंवा परब्रह्म म्हण-तात, ज्यापासून सर्व चराचर निर्माण होतें—तें बाईंच्या नास्तिकवादाला मान्य होतें. त्या तत्त्वापासून जर सर्व वस्तुजात निर्माण झालें असेल, तर त्या तत्त्वापासून भिन्न असा ईश्वर अस्तित्वांत असणें शक्य नाहीं, असें बाई म्हणत. ईश्वर सर्व सृष्टींत अनुस्यूत आहे, सर्व ब्रम्हांडाइतका विशाळ आहे या म्हणण्यालाहि त्यांचा विरोध नव्हता. पण बायबलांत वर्णन केलेली ईश्वर नांवाची व्यक्ति अस्तित्वांत आहे, किंवा चार हातांचा किंवा तीन तोंडांचा ईश्वर सर्व सृष्टीवर सत्ता चालवूं शकतो हें मत त्या चूक म्हणत. त्या ईश्वराची यथार्थ कल्पना आपणाला सध्यांच्या स्थितींत तरी होत नाहीं. पुढें कधीं तरी माणसाला ती कल्पना कदाचित् होईल किंवा कदाचित होणार नाहीं. त्याविषयीं आज नक्की कोण ग्वाही देऊं

शकेल? आज त्या भूमिकेपर्यंत मानवी विचार पोहोंचूं शकत नाहींत. तेव्हां ईश्वराची यथार्थ कल्पना आपणाला करतां येणें शक्य नाहीं; आणि कोणतीहि ईश्वरविषयक कल्पना खरी मानावयाची असेल तर तिला पुराव्याचा आधार पाहिजे. ईश्वराची जर खरी कल्पना आपणांला करतांच येत नाहीं, तर ईश्वर नाहीं असें म्हणणें म्हणजे लहान तोंडीं मोठा घांस घेण्यासारखें अप्रयोजक होय. पण लोक ज्या ईश्वराचें वर्णन करून सांगतात तो मात्र अस्तित्वांत नाहीं. अशा प्रकारचे बाईचे विचार होते. ही विचारसरणी बऱ्याच अंशानें वेदान्ताला मान्य होण्याजोगी आहे हें कोणालाहि समजेल.*

बाईचा नास्तिकवाद पुढें असें म्हणे कीं, जर ईश्वराची कल्पनाच करणें शक्य नाहीं तर त्याच्या स्वरूपाविषयीं मौन धारण करणें शहाणपणाचें होईल. पण गप्प न बसतां ईश्वराच्या अंगीं परस्परविरोधी गुण चिकटवावयाचे, व ज्या लोकांना ते गुण पटणार नाहींत त्यांना 'तुम्ही नरकांत पडाल' अशी भीति घालावयाची हा कोठला न्याय? सर्वव्यापी तत्त्वाखेरीज आणखी कोणी ईश्वर नाहींच असें आम्ही म्हणत नाहीं; पण जर त्या ईश्वराची कल्पनाच करतां येत नाहीं, तर नक्की तो आहेच असें आग्रहानें कसें सांगावें? आहे म्हणण्यालाहि पुरावा पाहिजे. आणि तो ईश्वर असला तरी जोंवर त्याचें स्वरूप बिलकुल समजत नाहीं तोंवर त्याच्यावर श्रद्धा कशी ठेवतां येणार? जगांत इतकें दुःख आहे, इतका

* The Deity becomes identified with nature, co-extensive with the universe; but the God of the orthodox no longer exists.......I do not deny God which is an unknown tongue to me. I do deny your God who is an impossibility ...... त्या वेळच्या नास्तिकवादाच्या त्यांच्या लिखाणांत असले उद्गार आहेत.

अन्याय आहे, कीं जर कोणी जगन्नियंता ईश्वर असला तर त्याला ह्या दुःख-क्लेशांचें कांहींच वाटत नाहीं असें मानणें भाग पडतें. असल्या क्रूर ईश्वराचें अस्तित्व माझ्या बुद्धीला पटत नाहीं; उलट तसला ईश्वर मानण्यानें माझ्या हृदयाला धक्का बसतो. यापेक्षां ईश्वराविषयींचे शुष्क वादविवाद बाजूस ठेऊन माणसानें स्वतः जग कां सुधारूं नये? माणसाला अक्कल आहे, सामर्थ्य आहे, प्रेम आहे. त्यानें ईश्वरावर अवलंबून न रहातां स्वप्रयत्नानें जगांतलें दुःख नाहींसें कां करूं नये? मनांत आणील तर माणूस पृथ्वीवर नंदनवन आणूं शकेल.

हा नास्तिकवाद व वेदान्त यांत एक अत्यंत मोठा फरक आहे तोहि येथें नमूद केला पाहिजे. अखिल सृष्टीच्या मुळाशीं एक सर्वव्यापी तत्त्व आहे हें बाईच्या नास्तिकवादाला नाकबूल नव्हतें हें आम्ही वर लिहिलें आहे. पण हें तत्त्व आंधळें आहे असें नास्तिक मताचें म्हणणें आहे व असे. वेदान्तदृष्टया तें तत्त्व ज्ञानी व डोळस आहे इतकेंच नव्हे तर ज्ञानीपणा व डोळसपणा यांची परमावधि त्याच्या ठायीं आहे. ब्रह्म हें सत् (अर्थात् क्रियेचें मूळ), चित् (अर्थात् ज्ञानाचें मूळ) व आनंद या त्रिविध स्वरूपाचें आहे. ‘सत्यं ज्ञानं अनंतं ब्रह्म’ असें त्या ब्रह्माचें उपनिषदांत एके ठिकाणीं वर्णन आहे हें आमच्या वाचकांस माहीत असेलच. नास्तिकवादाचें म्हणणें याच्या उलट आहे. आपण एखादा मोत्यांचा शिंपला घेतला तर त्यांत नानावर्णांच्या सुंदर लकेरी दिसतात; त्या शिंपल्यांतील द्रव्याचे परमाणु विशिष्ट प्रकारानें रचलेले असल्यामुळें त्या साऱ्या उत्पन्न होतात. तद्वत् सृष्टींतील आद्यतत्त्व मूलतः द्रव्याच्या परमाणूंचें बनलेलें आहे; आणि चैतन्य, ज्ञान, बुद्धि, जाणीव वगैरे गोष्टींच्या लकेरी त्या द्रव्याच्या आधारावर उत्पन्न झालेल्या आहेत, असें डॉ. बेझंट यांचें मत होतें. अर्थात् या म्हणण्याचा असा अर्थ होतो कीं, मोत्याच्या शिंपल्यांतलें द्रव्य खरवडून काढलें तर ज्याप्रमाणें त्या तेजाच्या साऱ्या लकेरी

नाहींशा होतील त्याचप्रमाणें सृष्टीच्या मुळाशीं असलेल्या द्रव्यपरमाणूंत जर हालवाहालव झाली तर जाणीव, ज्ञान, चैतन्य, मन, बुद्धि वगैरेंचा मागमूसहि सृष्टींत सांपडेनासा होईल. उलट पक्षीं ज्ञान, आनंद, जाणीव यांचा कंद म्हणजेच तें आद्यतत्त्व होय, त्या आद्यतत्त्वापासून द्रव्य निर्माण होतें असे वेदान्त शिकवितो. सूर्याचा प्रकाश ज्याप्रमाणें फोटोग्राफच्या कांचेवर निरनिराळीं द्रव्यात्मक चित्रें चित्रित करतो तद्वत् हें चैतन्यमय आद्यतत्त्व द्रव्यमय सृष्टीला उत्पन्न करून तिला नानारूपांनीं नटवितें अशी वेदान्ताची शिकवण आहे. तेव्हां फोटोग्राफच्या कांचेवरचीं चित्रें पुसून टाकल्यानें जसें सूर्यप्रकाशाचें कांहींच वांकडें होत नाहीं, तद्वत् द्रव्यमय सृष्टीच्या रूपांत कितीहि घंडामोडी झाल्या तरी त्या आद्यतत्त्वाच्या ज्ञानाची ज्योत कधींहि विझणार नाहीं. असा वेदान्ताचा अर्थ होता. असो.

डॉ. बेझंट यांनीं तत्कालीन भौतिकशास्त्रांचा पुष्कळ अभ्यास केलेला असून त्यांनीं सहजच आपला नास्तिकवाद त्यांतल्या जडवादावर उभारलेला होता. आपण ज्याला जीव म्हणतों, मन म्हणतों, जाणीव म्हणतों ती देहाच्या विकासावर अवलंबून असते असें बाईचें मत असे. मूल जन्मतांक्षणीं त्याचा देह दुबळा असतो; व त्या वेळीं त्या मुलाची विचारशक्ति, त्याची स्मरणशक्ति, त्याची ग्रहणशक्ति वगैरे साऱ्या दुबळ्या असतात. देह जसजसा वाढतो तसतसा या साऱ्या शक्ति प्रगल्भ होतात. म्हातारपणीं देह पुनः निर्बल होऊं लागला म्हणजे त्या शक्तीहि पुनः क्षीण होऊं लागतात. इतकेंच नव्हे तर मेंदूवर फटका बसल्यास, अथवा दारूसारखे मादक पदार्थ पिऊन, किंवा अंगांत फार ताप येऊन माणसाच्या मेंदूवर त्यांचा परिणाम घडल्यास, मनाच्या या साऱ्या शक्तींत बिघाड होतो असा अनुभव आहे. जीव, मनाच्या शक्ति, जाणीव वगैरे सर्व गोष्टी जर ह्याप्रमाणें देहावर

अवलंबून असल्याचा प्रत्यय येतो तर देहापासूनच त्या सर्व उत्पन्न होतात असें मानलें पाहिजे; व मृत्यूच्या वेळीं देह निकामी झाल्यावर जीव किंवा जाणीव म्हणून कांहीं वेगळी वस्तु शिल्लक रहाते असें जर कोणी म्हणत असेल तर ती चूक होय, हें मत बाई त्या वेळीं प्रतिपादीत असत. माणसाच्या अंतर्यामीं आत्मा म्हणून किंवा जीव म्हणून कोणी आहे असें मानल्यास माणसास समाधान वाटतें हें खरें आहे; पण ज्या गोष्टी मनास समाधान देतात त्या खऱ्या असतातच असें नाहीं. उद्यां सकाळीं जगांत सर्वत्र सुख व सुबत्ता होईल असें आपणास कोणी सांगितलें तर त्यापासून मनाला आनंद होईल. पण खरोखरीच जगांत उद्यां तशी सुस्थिति येईल कीं नाहीं हा वेगळा प्रश्न आहे, व तो पुराव्यावर अवलंबून असून माणसाच्या मनाच्या समाधानाशीं त्याचा बिलकूल संबंध नाहीं; अशी त्यांची विचारसरणी होती. जिवाचें अस्तित्व, जीवाचें अमरत्व वगैरे गोष्टींसंबंधानें त्या म्हणत, " पुराव्यानें या गोष्टी सिद्ध करून दाखवा. त्या मनाला गोड वाटतात येवढ्याच कारणासाठीं मी त्यांवर श्रद्धा ठेवण्यास तयार नाहीं." *

माणसानें ईश्वर, परलोक, आत्मा वगैरे मृगजलांच्या मागें न लागतां लोकसंग्रहाचें ध्येय मनासमोर ठेवावें, स्वतःचें चरित्र शुद्ध करून सर्व बाजूंनीं जगाचें बरें करावें, खरे व थोर विचार लोकांना शिकवून, राजकारण, शिक्षण, सांपत्तिक स्थिति, समाजव्यवस्था वगैरे क्षेत्रांत एकसारख्या सुधारणा करून सबंध जग सुधारावें, दुःखितांस सुखी, अज्ञान्यांस ज्ञानी व नीतिभ्रष्टांस नीतिमान् बनवून जगांतून दारिद्र्याची हकालपट्टी करावी हा त्यांच्या नास्तिकवादाचा जगाला संदेश होता. जर जनसेवेचें व्रत अंगिकारून माणसें या मार्गानें खटपट

* For many of us evidence must precede belief ×× I cannot believe only because I wish.

करितील तर त्यांचे प्रयत्न यशस्वी होतील अशी त्यांच्या उत्साही मनाला खात्री वाटत होती. कोणती गोष्ट नीतीची व कोणती अनीतीची हें बाईंचा नास्तिकवाद त्या त्या गोष्टींच्या उपयोगावरून ठरवी. जी गोष्ट जगाच्या व व्यक्तीच्या उपयोगाची असेल, जी गोष्ट माणसाला अधिक सुखी, अधिक शहाणें व अधिक थोर करीत असेल ती नीतीची होय अशी त्यांची कसोटी असे; मग ख्रिस्ती धर्माचें मत कसेंहि असो.

अशा प्रकारचे विचार जगाला शिकविण्याचें कार्य बाईंनीं १८७४ सालीं अंगावर घेतलें, व सुमारें पंधरा वर्षें तें कार्य मोठ्या नेटानें चालविलें. त्यांच्या विचारांशीं अनेकांचा मतभेद होईल हें आम्ही जाणून आहों. पण नास्तिक मताचे लोकहि स्वार्थत्यागी व सुसंस्कृत असतात, जनहिताची त्यांस खरी कळकळ असते, जग सुधारण्याच्या खटाटोपांत श्रद्धाळू माणसांपेक्षां ते रतीभरहि कमी नसतात—असले तर ते कधींकधीं जास्तच असतात, एवढी जरी आमच्या वाचकांची खात्री बाईंच्या नास्तिकवादाच्या वरील वर्णनावरून झाली तरी ती आम्हांला पुरे आहे.

---

## प्रकरण चौथें

### उद्योगाचा पसारा व समाजसत्तावाद

डॉ. बेझंट ह्या नास्तिकवादांत--जडवादांत--शिरल्यानंतर सुमारें पंधरा वर्षे त्यांनीं जे नानाविध उद्योग केले त्यांचें वर्णन या प्रकरणांत देण्याचें आम्ही योजिलें आहे. बाईंची मनस्थिति, त्यांचीं ध्येयें व विचार यांची माहिती मागील प्रकरणांत आलीच आहे. ह्या प्रकरणांत त्यांच्या बाह्य खटाटोपांची माहिती आम्ही देणार आहों. त्यांनीं या अवधींत इतके उद्योग केलेले आहेत कीं ते सारे एका माणसाला करतां येतील असें कोणासहि वाटावयाचें नाहीं. अर्थात् या उद्योगांची माहिती अगदीं संक्षिप्तरूपांतच येथें देण्याचा आमचा संकल्प आहे. या छोट्या पुस्तकांत त्यांचे त्या कालचे अनेक उद्योग विस्तारानें देण्यास स्थल नाहीं, व आमच्या महाराष्ट्रीय वाचकांना युरोपांतल्या त्यांच्या चाळीस-पन्नास वर्षांपूर्वीच्या उद्योगांचें अर्थातच तितकें अगत्यहि वाटण्याजोगें नाहीं.

इ. सन १८७३ सालीं बाईंना त्यांच्या नवऱ्यानें घरांतून बाहेर घालविलें, व पुढील वर्षी त्यांची आई इहलोक सोडून गेली. बाईंचा मुलगा बापापाशीं रहात होता. अर्थात् त्या वेळीं डॉ. बेझंट यांना त्यांच्या लहान मुलीशिवाय मायेचें असें कोणीच माणूस शिल्लक राहिलेलें नसल्यामुळें संसारपाश असा उरला नव्हता. त्यांना विचार-स्वातंत्र्य पाहिजे होतें व तें त्यांनीं अनंत क्लेश सोसून मिळविलें होतें. त्या स्वातंत्र्याचा उत्कृष्ट उपयोग कसा करावयाचा हा बाईंच्यासमोर प्रश्न होता. विपत्तीचे दिवस जावयास लागून जरा बरे दिवस दिस-

ण्याची सुरवात झाल्यावर—म्हणजे आईच्या निधनानंतर सुमारें पांच-सात महिने गेल्यावर—१८७५ सालच्या प्रारंभीं त्यांनीं नीट विचार करून आपल्या आयुष्याचें ध्येय निश्चित केलें; आणि यापुढें आपण आपलें सारें आयुष्य सर्वस्वीं लोकसेवेस वहावयाचें असें ठरवून टाकलें. सर्व क्षेत्रांत लोक-सुधारणा करावयाची, स्वतंत्र विचाराचें वारें समाजांत सर्वत्र पसरून जगांतील बरीचशी घाण काढून टाकावयाची, आणि आपण जगांत आलों त्या वेळीं जग जसें होतें त्यापेक्षां तें थोडें तरी सुधारून मग आपला देह ठेवावयाचा असा त्यांनीं आपल्या मनाशीं संकल्प केला. हें कार्य परम श्रेष्ठ व परम पवित्र असून अत्यंत मोठ्या जबाबदारीचें आहे, याची त्यांना पूर्ण जाणीव होती; आणि तें करतांना आपण कोणतीच कुचराई करावयाची नाहीं, त्यासाठीं पडतील तितके श्रम करावयाचे, आपल्या हृदयाचे गुण आणि मनाच्या शक्ति फुलतील तितक्या फुलवावयाच्या आणि मगच त्या जनसेवेस अर्पण करावयाच्या, जें फूल फुलविण्यास आपण अविश्रान्त श्रम केलेले नसतील तें फूल लोकसेवेच्या कार्यास आपण कदापि वहावयाचें नाहीं असें त्यांनीं या वेळीं आपल्या मनाशीं ठरविलें आणि त्या लगेच जगाच्या आखाड्यांत उतरल्या. त्यांनीं आपल्या पुढील आयुष्यांत सर्व जगभर अनेक उद्योग केलेले आहेत व ते सर्वांना दिसतहि आहेत. पण त्यांतला प्रत्येक उद्योग करण्याच्या अगोदर तो उद्योग करण्याचा अधिकार अंगीं यावा म्हणून त्यांनीं लोकांच्या दृष्टीस न आलेले असे अपरंपार कष्ट केलेले आहेत हें विसरून चालणार नाहीं. सार्वजनिक कार्यांत पडूं इच्छिणाऱ्या होतकरू तरुणांनीं ही गोष्ट लक्षांत ठेवणें अवश्य आहे.

ह्या पंधरा वर्षांत बाईंनीं व्याख्यानद्वारा व लेखनद्वारा आपल्या मताचा प्रसार मोठ्या प्रमाणावर केला. बर्नार्ड शॉ यांनीं बाईंच्या ह्या

वेळच्या वक्तृत्वाविषयीं असें लिहिलें आहे कीं, ' बाई ह्या वेळीं इंग्लंड देशांत वक्तृत्वकलेंत सर्वांपेक्षां श्रेष्ठ होत्या, कदाचित् युरोपांतहि त्यांचा सर्वश्रेष्ठ नंबर लागला असता. वक्तृत्वांत त्यांच्यावर कोणीहि ताण केलेली मीं ऐकलेली नाहीं, आणि त्या काळीं त्यांच्या आसपासहि कोणाचा नंबर लागत नसे.' पण इतकें वक्तृत्व असलें तरी त्यांस नास्तिक व जडवादी म्हणून फार लोकक्षोभ सोसावा लागे. बाईच्या अगोदरच्या नास्तिकवादी पुढाऱ्यांच्या मानानें बाईंना त्रास कमी झाला व त्यांसहि सोसाव्या लागणाऱ्या अडचणी कालगत्या कमी होत गेल्या ही त्यांतल्यात्यांत समाधानाची गोष्ट आहे. त्या सबंध देशभर व्याख्यानाचे दौरे वारंवार काढीत. धर्म, तत्त्वविचार, जडवाद, नास्तिकवाद, राजकारण वगैरे अनेक क्षेत्रांतल्या विषयांवर त्या बोलत. पुढें समाजसत्तावादाचा अंगिकार केल्यावर अर्थशास्त्राच्या प्रश्नांवरहि त्या बोलूं लागल्या. पाखंडी व्याख्यात्यास उत्तरपक्ष म्हणून व्याख्यात्याच्या अंगावर दगड फेंकणें हें त्या वेळीं लोक शिष्टपणाचें लक्षण समजत असत. एका व्याख्यानाच्या प्रसंगीं बाईंस दगडाची जखम झाली होती! त्यांच्या व्याख्यानास अध्यक्ष होण्याइतकें धैर्य पुष्कळांच्या अंगीं नसल्यामुळें अध्यक्ष मिळण्यास अनेकदां मारामार पडे. व्याख्यानांत दंगा करणें, तावदानें फोडणें वगैरे प्रकार नित्य घडत. नुकसानभरपाईची हमी घेत असाल तरच भाड्यानें जागा देतों, अशी जागेचा मालक कधीं कधीं अटहि घाली. बाईंच्या एका व्याख्यानास एकदां ब्रॅडलॉ अध्यक्ष होते. व्याख्यान सुरू झाल्यावर एक गुंड उठला व अस्तन्या वर सारून मारामारीस उभा राहिला. ब्रॅडलॉ हे अंगानें धिप्पाड व हाडाचे कणखर होते. त्यांनीं त्याच्याशीं कुस्ती खेळून त्याला पाडलें व पोलिसच्या हवालीं केलें, आणि मग जणुं कांहींच झालें नाहीं अशा रीतीनें बाईनीं आपलें खंड पडलेलें व्याख्यान पुनः सुरू केलें! एकदां व्याख्यानानंतर बाईंच्या सभोंवतीं लोकांचा घोळका

जमला व त्यांच्या शिष्यांची लाखोली खात बाईंना परत घरीं जावें लागलें. त्यांनीं लाथाबुक्क्यांची मारामारी सुरू केली होती, व ज्या घोड्याच्या गाडींतून बाई पुढें जाणार होत्या ती गाडी उलथण्याचा प्रयत्न केला. या वर्णनावरून व्याख्यानांत कोणत्या प्रकारचें जोखीम असे याची कांहींशी कल्पना आमच्या वाचकांना येईल. पुढेंपुढें बाईंना व्याख्यानावर पैसे मिळूं लागले व त्यांचा चरितार्थहि बरा चालूं लागला. असल्या व्याख्यानांखेरीज भौतिकशास्त्रावर, फ्रेंच राज्यक्रान्तीसारख्या ऐतिहासिक प्रसंगांवर त्या कधीं कधीं व्याख्यानांच्या माला गुंफीत, व निरनिराळ्या पक्षांच्या सुप्रसिद्ध पुढाऱ्यांशीं तोंडीं व लेखी असे वादविवादहि करीत.

आपल्या मतप्रसारार्थ त्या लेखनहि पुष्कळ करीत असत. प्रथम त्या आपलें नांव प्रसिद्ध न करतां स्फुट लेख व छोटीं पुस्तकें प्रसिद्ध करीत. पुढें त्या आपलें नांव छापूं लागल्या. 'नॅशनल रिफॉर्मर' म्हणून ब्रॅडलॉ यांनीं चालविलेलें जें नियतकालिक होतें त्यांत त्या नेमानें लिहीत. मि. स्कॉट यांचेकरितांहि छोटीं पुस्तकें लिहीत. 'नॅशनल रिफॉर्मर'च्या उपसंपादकाचें काम त्यांच्याकडे सुमारें दहाबारा वर्षे होतें. लेखनास सुरवात केल्यानंतर कांहीं वर्षांनीं त्यांच्या पुस्तकांचा व नियत-कालिकांचा खप चांगला होऊं लागला, तेव्हां १८८३ सालीं त्यांनीं 'अवर कॉर्नर' ( Our Corner ) नांवाचें आणखी एक स्वतंत्र नियत-कालिक काढलें. यांत प्रसिद्ध नाटककार बर्नार्ड शॉ, प्रसिद्ध शास्त्रज्ञ अर्नेस्ट हेकेल, ब्रॅडलॉ वगैरे नामांकित लेखकांचे लेख वारंवार येत. मजु-रांचे प्रश्न, आणि अर्थशास्त्रविषयक प्रश्न याविषयींची चर्चा त्यांत बाई प्रमुखत्वानें करीत. समाजसत्तावादाचा पुरस्कार करण्यासाठींच तें त्या चालवीत. या काळीं बाईंनीं कांहीं महत्त्वाच्या फ्रेंच ग्रंथांचीं इंग्रजी भाषा-न्तरें केलेलीं प्रसिद्ध आहेत. कांहीं केलें तरी आपला वेळ फुकट घालवाव-

याचा नाहीं व अडचणी आल्या तरी युक्तिप्रयुक्तीनें त्यांतून मार्ग काढावयाचा असा त्यांचा मूळ स्वभाव आहे. एकदां त्या आजारी पडल्या होत्या व कुशीवर वळण्याची त्यांना मनाई होती. तेव्हां बिछान्यावर पाठ टेंकून उताण्यानें लिहिण्याची त्यांनी स्वतःला संवय केली आणि त्या अवधींत डॉ. ब्यूखनर या शास्त्रज्ञाच्या Mind in Animals या जर्मन पुस्तकाचा बराचसा भाग इंग्रजींत भाषान्तरित केला.

या काळीं डॉ. बेझंट ह्या अभ्यासहि खूप करीत. प्रचलित सार्वजनिक प्रश्नांचें नीट अध्ययन त्या करीतच, पण त्याखेरीज इतर अनेक विषयांचाहि अभ्यास करीत. त्यांची लहान मुलगी त्यांच्यापासून वेगळी काढावी म्हणून त्यांचेवर एक फिर्याद झाली होती. त्याविषयींची माहिती लौकरच देण्यांत येणार आहे. त्या फिर्यादीनुसार डॉ. बेझंट यांचेपासून त्यांची मुलगी काढून नेण्यांत आली. त्यानें त्यांस इतकें दुःख वाटलें कीं, कांहीं दिवस त्यांस वेड्यासारखें झालें होतें. या दुःखाचा विरंगुळा पडावा म्हणून त्यांनीं लंडन युनिव्हार्सिटीच्या मॅट्रिक परीक्षेचा अभ्यास करण्याचें ठरविलें, व त्या यथाकाल ती परीक्षा उत्तीर्ण झाल्या. मनाला कधींहि त्रास झाला कीं असलें कांहीं तरी शिकण्याचें काम काढावें; त्यानें दुःख विसरून जातें व ज्ञानांत भर पडते असें त्यांनीं स्वतः लिहिलें आहे. या वेळीं त्यांस बीजगणित, भूमिती, पदार्थविज्ञान वगैरे विषय शिकावे लागले. व्यवस्थित रीतीनें भौतिक शास्त्रांचें शिक्षण बाईनीं पूर्वी घेतलेलें नव्हतें. तें घेऊन आपलें शास्त्रीय ज्ञान दृढ करावें अशी त्यांस मग इच्छा झाली, व निरनिराळीं भौतिकशास्त्रें त्या पद्धतशीरपणानें डॉ. ॲव्हलिंग यांच्या हाताखालीं शिकल्या. त्या शास्त्रांत त्यांस चांगलीं सर्टिफिकिटें मिळालीं, व निरनिराळीं आठ भौतिक शास्त्रें शिकविण्यास लायक असल्याबद्दल त्यांस दाखलाहि मिळाला. ब्रॅडलॉ यांच्या मुलींनींहि असला अभ्यास चालविला होता. डॉ. ॲव्हलिंग व त्यांनीं

तयार केलेली डॉ. बेझंटसारखी मंडळी यांनीं भौतिक शास्त्रें शिकविण्याचे पुढें वर्ग कांढले; व ते सुमारें दहा वर्षें सुरू ठेविले होते. ही मंडळी एकदम तेरा वर्ग चालवीत असत. याखेरीज बाईनीं लंडन युनिव्हर्सिटीच्या फर्स्ट बी. एस्‌सी., प्रिलिमिनरी सायंटिफिक एक्झॅमिनेशन, बी. एस्‌सी. वगैरे परीक्षांचाहि अभ्यास केला. असल्या अभ्यासानें त्यांचें शास्त्रीय ज्ञान अर्थातच खोल व पायाशुद्ध झालें.*

नास्तिकवाद व जडवाद यांचा पुरस्कार केल्यामुळे डॉ. बेझंट यांना पदोपदीं लोकांचा विरोध झाला. दुसरा कोणी असता तर त्याची त्या स्थितींत कंबरच खचती इतका त्यांचा छळ झाला. कांहीं संस्थांनीं त्यांचें नांव आपल्या पटावरून काढून टाकलें. एका संस्थेच्या विद्यमानें त्यांचें एक व्याख्यान व्हावयाचें होतें, पण त्या संथेची नेहेमींची भाड्यानें घेतलेली जागा आयत्या वेळीं मालकानें व्याख्यानाला दिली नाहीं; व तें व्याख्यान दुसरीकडे करावें लागलें. ब्रॅडलॉ व डॉ. बेझंट यांच्या नीतिमत्तेविषयीं लोक वाटेल त्या कंड्या पिकवीत व भलतींसलतीं मतें त्यांच्यावर लादीत. स्त्रीपुरुषांनीं वाटेल तसा व्यवहार करावा, हें प्रेमसंकराचें ( Free Love चें ) मत ब्रॅडलॉ व बेझंट यांस बिलकूल मान्य नव्हतें; उलट त्यांचा त्या मताला जोराचा विरोध होता. पण डॉ. बेझंट यांची नालस्ती करण्यासाठीं, तसेंच ब्रॅडलॉ यांस पार्लमेंटमध्यें निवडून येण्यास मतें मिळूं नयेत म्हणून, पुष्कळ लोक उघड म्हणत कीं, या दोन्ही माणसांस कुटुंब-व्यवस्था मोडून टाकावयाची आहे, व वाटेल त्या स्त्रीपुरुषांनीं मनसोक्त हवे ते व्यवहार करावे असें त्यांचें मत आहे! लंडनच्या युनिव्हर्सिटी कॉलेजमधील वनस्पतिशास्त्र शिकण्याचा जो वर्ग

* बी. एस्‌सी.च्या परीक्षेंत मी या बाईला मुद्दाम नापास करीन असें एका परीक्षकानें अगोदरच बोलून दाखविलें होतें! ( पहा सी. जिनराजदास कृत छोटें बेझंट चरित्र, थिऑसफिस्ट मासिक, ऑक्टोबर १९३२. )

होता त्यांत जाऊन शिकण्याची डॉ. बेझंट यांची व ब्रॅडलॉ यांच्या मुलीची इच्छा होती, व तदनुसार त्यांनीं अर्जेहि केला होता. पण एक बाई नास्तिक व दुसरी नास्तिकाची मुलगी म्हणून त्या दोघांच्याहि अर्जास वाटाण्याच्या अक्षता लावण्यांत येऊन त्या वर्गांत त्यांस प्रवेश मिळाला नाहीं. वनस्पतिशास्त्राचा अभ्यास करण्याकरितां त्यांना रीजंट-पार्कमधील बागेंत जाण्याचाहि मज्जाव करण्यांत आला. डॉ. बेझंट यांना शिक्षणखात्याकडून शिकविण्याच्या लायकीबद्दल दाखला मिळालेला होता. पण त्या ख्रिस्ती धर्माच्या विरुद्ध व नास्तिक मताच्या आहेत, तेव्हां त्यांना सरकारी दाखला कां देण्यांत आला, असे प्रश्न व उपप्रश्न पार्लमेंटमध्यें त्यांच्या शत्रूंकडून विचारण्यांत आले. ज्या सायन्स-क्लासेसमध्यें डॉ. बेझंट शिकवीत असत त्यांना सरकारी ग्रँट मिळूं नये असेहि प्रयत्न कांहीं उपद्व्यापी माणसांनीं पार्लमेंटच्या द्वारानें करून पाहिले. ब्रॅडलॉ यांस दोन मुली होत्या. त्या चारित्र्यानें चांगल्या व बुद्धीनें हुशार होत्या. पण नास्तिक बापाच्या पोटीं त्या जन्मलेल्या असल्यामुळें त्यांच्या मार्गांतहि असले अनेक अडथळे उत्पन्न करण्यांत आले. या गोष्टींवरून बाईंना स्वतःच्या मताबद्दल कोणत्या प्रकारचा लोकक्षोभ चहूं बाजूंनीं सोसावा लागला असेल याची कांहींशी कल्पना येईल.

या लोकक्षोभांत एकदम भर पडण्याचें एक महत्त्वाचें कारण १८७७ सालीं घडलें. त्याची हकीकत येथें देणें अवश्य आहे. कारण त्यावरून बाईंच्या एका उद्योगाची दिशा स्पष्ट होईल. डॉ. बेझंट यांच्या जन्मापूर्वी अनेक वर्षें डॉ. नोल्टन नांवाच्या एका अमेरिकन डॉक्टरानें एक पुस्तक अमेरिकेंत प्रसिद्ध केलें होतें. या पुस्तकांत वैद्यकी व शरीरशास्त्र यांविषयीं माहिती दिलेली होती; व लोकांची नीतिमत्ता सुधारून त्यांचें दारिद्र्य कसें कमी करतां येईल याचें विवेचनहि केलेलें होतें. स्त्रीपुरुषांचे विवाह वाजवीपेक्षां जास्त उशीरानें होऊं लागले तर

समाजांत अनीति वाढते; यासाठीं स्त्रीपुरुषांनीं योग्य वय झालें असतां लग्नें करावीं, लग्नाला फाजील उशीर करूं नये असें ग्रंथकारानें प्रतिपादिलें होतें. पण विवाह केल्यावर स्त्री-पुरुषांस पुष्कळ मुलें होऊं लागतात; त्यानें गरीब कुटुंबांची दैना होते; पुष्कळ मुलांचें योग्य प्रकारचें संवर्धन करण्याला, आणि मुलांना पाष्टिक अन्न, भरपूर कपडे व चांगलें शिक्षण देण्याला त्या कुटुंबाला जड जातें; शिवाय फार मुलें झाल्यामुळें मुलांची व आईची प्रकृति खालावत जाऊन एकंदर कुटुंबाची धूळधाण होते, ही गोष्ट त्या ग्रंथकाराच्या परिचयाची होती; व म्हणून आईबापांच्या सांपत्तिक स्थितीला झेंपतील इतकींच मुलें त्यांना होणें इष्ट आहे, असें ग्रंथकारानें आपलें मत दिलें होतें. वाजवीपेक्षां जास्त मुलें होऊं लागल्यास संततिनियमन कसें करावें ह्याचे उपायहि त्यानें त्या पुस्तकांत सांगितलेले होते. चाळीस वर्षेपर्यंत या पुस्तकाला कोणीहि कायद्याची हरकत घेतली नव्हती. पण १८७७ सालीं इंग्लिशसरकारनें त्या पुस्तकाच्या प्रकाशकावर फिर्याद केली व तें पुस्तक अनीतिमत्तेचें व बीभत्स आहे, असा त्याचेवर आरोप ठेविला. प्रकाशकानें सरकारची लगेच क्षमा मागितली, व तो सुटला. डॉ. बेझंट व ब्रॅडलॉ यांना हें त्याचें करणें आवडलें नाहीं. दोघेंहि गोरगरिबांचीं कैवारी म्हणून प्रसिद्ध होतीं. मजूर लोक, शेतकरी लोक वगैरे गरीब लोकांची सांपत्तिक स्थिति सुधारण्याचा तीं दोघें आटोकाट प्रयत्न करीत होतीं. गरीब लोकांना फार मुलें झालीं तर त्या कुटुंबास कशी विपन्नावस्था येते, व मुलांचीहि कशी आबाळ होते याचीं शेंकडों उदाहरणें त्यांनीं प्रत्यक्ष पाहिलेलीं असून त्यांच्या त्या केविलवाण्या स्थितीचा दोघांच्या मनावर फारच मोठा परिणाम झालेला होता. गरीब लोकांस अतिशय मुलें झालीं तर त्यास काय उपाय करावा, ह्या प्रश्नाची चर्चा समाजांत झाली पाहिजे, व ती तशी होऊन योग्य ठरतील ते उपाय

सुचविल्याशिवाय गरीबांची विपन्नावस्था सुधारणें शक्य नाहीं, असें त्यांचें ठाम मत होतें. सरकारनें डॉ. नोल्टन यांच्या पुस्तकावर फिर्याद करून या चर्चेची मुस्कटदाबी करावी हें त्यांना मुकाट्यानें पहावेना. संततिनियमनाच्या प्रश्नाविरुद्ध आजहि बहुजन-समाज आहे, तेव्हां पंचावन्न वार्षांपूर्वी तो किती विरुद्ध असेल याची कल्पना करणें आम्ही आमच्या वाचकांवरच सोंपवितों. संततिनियमन म्हणजे अधर्माचा व बीभत्सपणाचा कळस होय, असें तेव्हां लोकमत होतें. ब्रॅडलॉ यांच्या मनांत आपण पार्लमेंटांत शिरावें व गरीब लोकांची स्थिति सुधारण्याविषयींचे कायदे तेथें पास करावे अशी महत्त्वाकांक्षा होती. जर आपण संततिनियमनाची बाजू सार्वजनिक दृष्ट्या उचलून धरली तर आपल्याविरुद्ध लोकक्षोभ इतका होईल कीं, पार्लमेंटांत जाण्यास आपणास कधींच कोणी मत देणार नाहीं अशी धास्ती ब्रॅडलॉ यांना सहजच वाटत होती. आपल्यासारख्या स्त्रीनें जर संततिनियमनाचा पुरस्कार केला तर प्राणांहूनहि प्रिय असलेल्या आपल्या चारित्र्यावर लोक वाटेल ते शिंतोडे उडवतील आणि आपल्या शीलाला अक्षय्य कालिमा लागेल, हें डॉ. बेझंट यांच्याहि लक्षांत आलें होतें. पण आपण स्वतःच्या स्वार्थाकडे पाहून गरिबांच्या विपन्न स्थितीकडे दुर्लक्ष करावें काय? असा प्रश्न त्या दोघांच्यासमोर उत्पन्न झाला; व त्यांच्या मनोदेवतेनें त्यांना या बाबतींत माघार घेऊं दिली नाहीं. अर्थात् त्यांनीं डॉ. नोल्टन यांचें पुस्तक मुद्दाम छापलें, व जरी या पुस्तकांतील पुष्कळ विचार आम्हांस मान्य नसले तरी गोरगरिबांच्या सांपत्तिक स्थितींत सुधारणा करावयाची असेल तर संततीच्या प्रश्नासंबंधानें सर्वांगीण चर्चा होणें अवश्य आहे, अशा आशयाची त्याला प्रस्तावना जोडली. अशा प्रकारें सरकारनें मना केलेलें पुस्तक ह्या दोघांनीं छापून स्वतः पोलिसांस विकलें. लगेच त्या दोघांवर फौजदारी खटला झाला व तो इंग्लंडच्या मुख्य न्यायाधीशासमोर

१८७७ च्या जून महिन्यांत सुरू झाला. या पुस्तकांत बीभत्सपणा नाहीं, दोघांहि आरोपींचे हेतु शुद्ध आहेत, हें न्यायाधीशास पटल्यामुळें त्यानें त्या धोरणानें ज्यूरीस खटला समजावून दिला. पण ज्यूरीमध्यें हलक्या मनाचीं अनेक माणसें होतीं. त्यांनीं मत दिलें कीं, जरी आरोपींचे हेतु चांगले असले तरी, या पुस्तकामुळें लोकांच्या नीतिमत्तेस धोका येण्यासारखा आहे. अर्थात् आरोपी दोषी आहेत, असा त्या म्हणण्याचा अर्थ झाला. हें पुस्तक आम्ही अत:पर छापून विकणार नाहीं असें कबूल करा म्हणजे मी तुम्हांला सोडतों, असें जज्जानें त्या दोघांना सांगितलें. हा मुद्रण-स्वातंत्र्याचा प्रश्न असून हें पुस्तक विकण्याचा आमचा निश्चय आहे असें दोघांनीं जज्जास प्रत्युत्तर केल्यामुळें जज्जानें संतापून जाऊन त्यांस सहासहा महिन्यांची शिक्षा दिली, तीन हजार रुपये दंड केला व दोन वर्षांचा त्यांनीं जातमुचलका द्यावा असा निकाल सांगितला. पण पुढें 'रिट ऑफ् एरर' मागण्यांत येऊन तो अर्ज यशस्वी झाला व दोघेहि आरोपी सुटले !

अशा तऱ्हेनें ब्रॅडलॉ व बेझंट यांनीं पदरांत यश पाडून घेतलें, व सरकार पुन: फिर्याद करणार नाहीं असें विरुद्ध पक्षाकडून वचन मिळेपर्यंत त्या पुस्तकाची विक्री सुरू ठेविली. डॉ. नोल्टन यांचे विचार त्या दोघांस सर्वस्वीं पसंत नव्हते, हें आम्ही वर लिहिलेंच आहे. तेव्हां डॉ. बेझंट यांनीं या विषयावर एक स्वतंत्र पुस्तक लिहिलें व नोल्टनच्या पुस्तकाची विक्री बंद करून त्याऐवजीं तें पुस्तक विकण्याची सुरवात केली. बाईंच्या ह्या पुस्तकावर आस्ट्रेलियांत फिर्याद झाली होती, पण तेथेंहि बाईंच्या वतीनें निकाल होऊन त्यांची सर्वत्र फत्ते झाली.*

---

* डॉ. बेझंट या थिऑसफिस्ट झाल्याचा वृत्तान्त या पुस्तकांत पुढें येईलच. त्या वेळीं डॉ. बेझंट यांचें संततिनियमनाविषयींचें मत बदललें व म्हणून त्यांनीं हें पुस्तक छापण्याचें बंद केलें. संततिनियमनाविषयीं डॉ. बेझंट यांचें आजचें मत

पण या केसमुळें बाईच्या विरुद्ध लोकमत उसळलें व लवकरच बाईच्या नवऱ्यानें त्यांचेवर कोर्टांत फिर्याद केली कीं, बाई नास्तिक

---

व त्या वेळचें मत हीं एकच नाहींत. मात्र त्यांमध्यें नक्की फरक काय आहे हें विस्तृत रीतीनें त्यांनीं अलीकडे कोठेंहि सांगितलेलें नाहीं. त्या वेळीं बाई जडवादी होत्या; आतां थिऑसफिस्ट अर्थात् अध्यात्मवादी आहेत. तेव्हां सर्व प्रश्नांकडे पहाण्याचा त्यांचा दृष्टिकोण बदललेला आहे, व या प्रश्नासंबंधानेंहि तो बदललेला असणें स्वाभाविक आहे. अध्यात्मदृष्टया माणसाचें ध्येय म्हणजे आत्मसंयमन होय. विषयवासना माणसाला स्वाभाविक असते, म्हणून तिला मोकाट सोडावी व तिचे लाड हवे तितके पुरवावे ही गोष्ट त्या अध्यात्मदृष्टीला पटण्यासारखी नाहीं. पण आत्मसंयमन हें आपलें ध्येय आहे, मात्र तें पूर्णपणें एकदम साधणें कठीण आहे. यासाठीं आत्मसंयमनाचें नेटानें आचरण करीत असतां, जेव्हां तें साधणार नाहीं तेव्हां संततिनियमनाचे उपाय स्त्रीपुरुषांनीं योजिले, स्वार्थासाठीं न योजतां आईची व मुलांची प्रकृति चांगली रहावी, मुलांचें संगोपन व शिक्षण चांगल्या रीतीनें करतां यावें यासाठीं ते योजिले, तर डॉ. बेझंट यांस ते आजहि पटतील असें आम्हांस वाटतें. ध्येयनिष्ठ नसलेल्या लोकांत नुसताच त्या साधनांचा जडवादी दृष्टीनें कोणी प्रसार केला तर आत्मसंयमन, कौटुंबिक स्वार्थत्याग, पितृ-मातृ-पुत्रधर्म, प्रेम वगैरे नाना सद्‌गुणांवर विरजण पडेल असें त्यांचें मत पडण्याचा संभव आहे. यामुळेंच त्यांनीं जडवादावर आधारलेल्या संततिनियमनाचा सर्वत्र सरोस प्रसार करण्याचें सोडून दिलें आहे असें वाटतें. डॉ. बेझंट यांनीं १८९३ सालीं लिहिलेल्या आत्मचरित्रांत जो या विषयासंबंधाचा उल्लेख केला आहे त्यांत थिऑसफिस्ट झाल्यामुळें माझें मत आज संततिनियमनास प्रतिकूल झालें आहे असें सांगण्याचा त्यांचा रोंख दिसतो; पण १९२७ सालीं माल्थूझियन-लीग या संततिनियमनाचा प्रसार करणाऱ्या विलायतेंतील संस्थेच्या ज्युबिलीच्या समारंभास त्या हजर होत्या. त्या वर्षीच्या जूनच्या थिऑसफिस्ट मासिकांत त्यांनीं जे विचार प्रकट केले आहेत त्यांवरून पहातां, अध्यात्मबुद्धि दृष्टिआड होऊं न देतां व दुष्परिणामांस वाव न ठेवतां संततिनियमनाचा जर कोणी प्रसार केला तर त्याला त्यांचा आजहि पाठिंबा मिळेल अशी आमची कल्पना आहे.

मताच्या अतएव ख्रिश्चन धर्माच्या विरुद्ध आहेत; त्या आपल्या मुलीला ख्रिश्चन धर्माचें शिक्षण देत नाहींत, तेव्हां मुलगी त्यांच्या ताब्यांत न ठेवतां ती माझ्या ताब्यांत द्यावी. बाईनीं कोर्टासमोर आपली बाजू मांडली. पण कोर्टानें त्यांचें म्हणणें न ऐकतां विरुद्ध निकाल दिला व नवऱ्या-कडून आलेल्या माणसानें मुलगी ओक्साबोक्शीं रडत असतांना तिला जबरीनें घरांतून ओढून नेलें. डॉ. बेझंट यांच्या मनावर त्याचा फार वाईट परिणाम झाला; त्या कित्येक दिवस उदास व वेड्यासारख्या झाल्या होत्या. मुलीवर त्यांचा भारी जीव होता. त्यामुळें मुलगी घरां-तून गेल्यावर त्यांना अत्यंत दुःख वाटलें यांत नवल नाहीं. मुलीला नेली तर नेली, पण पुढें नवरा आईला व मुलीला भेटूंहि देईना. तेव्हां बाईनीं कोर्टांत फिर्याद करून मुलीला भेटण्याची परवानगी मिळविली. त्यांचा मुलगा तर अगोदरपासून बापापाशींच रहात होता. मुलांना बाई भेटावयास गेल्या म्हणजे मुलांसमक्ष आईचा अपमान करण्याची योजना केलेली असे. तो प्रकार पाहून बाईनीं मुलांना भेटणेंहि सोडून दिलें; आणि आपल्या मुलांवर ममता करण्याचें जर आपल्या नशिबीं नाहीं तर गोरगरिबांच्या मुलांवर ममता करून त्यांची सुधारणा करण्याचा उद्योग आपण करूं, असा त्यांनीं संकल्प केला. आपणांवर खरें प्रेम कोणाचें आहे हें मुलांना कळत नाहीं असें नाहीं. अर्थात् मुलें मोठीं झाल्यावर, आईवर त्यांचा भारी जीव असल्यामुळें, तीं सहजच आनंदानें आईपाशीं येऊन राहूं लागलीं व पुढें तीं थिऑसफिकल सोसायटीचीं सभासदहि झालीं.*

* प्रस्तुत पुस्तकांत यापुढें डॉ. बेझंट यांच्या नवऱ्याचा संबंध आणण्याचें कारण येणार नाहीं. म्हणून येथेंच त्याच्या चरित्रांतील पुढचा भाग सांगून टाकणें बरें. तो त्याच ठिकाणीं उपाध्यायाचें काम आमरण करीत होता व १९१७ सालीं वारला. तत्त्वाचा प्रश्न सोडून दिला तर बाईनीं आपल्या आत्मचरित्रांत त्याला

याच कालांत मि. ब्रॅडलॉ ह्यांच्या पार्लमेंटच्या निवडणुकीसंबंधानें सर्व इंग्लंड देशभर मोठीच चळवळ सुरू होती, तिचाहि येथें उल्लेख करणें जरूर आहे. कारण डॉ. बेझंट ह्या या चळवळींत जणुं ब्रॅडलॉ यांचा उजवा हात होत्या. ब्रॅडलॉ यांचा फार दिवसांचा संकल्प होता कीं, आपण पार्लमेंटमध्यें गरीबांचा कैवारी म्हणून शिरावें व तेथें योग्य ते कायदे पास करून घेऊन गोरगरिबांची स्थिति सुधारावी. ब्रॅडलॉ हे रॅडिकल मताचे होते. प्रथम ते नॉरदॅम्टन शहरातर्फे १८६८ सालीं उमेदवार म्हणून उभे राहिले; पण त्यांस यश आलें नाहीं. मग पुनः पुनः उमेदवार रहाण्याची त्यांनीं सारखी खटपट केली व शेवटीं त्यांना यश आलें. त्यांच्या निवडणुकीमध्यें डॉ. बेझंट यांनीं त्यांना फार मदत केली. ते नास्तिक मताचे म्हणून त्यांना बहुजनसमाजाचा जोराचा विरोध असे. पण दर निवडणुकींत पूर्वीपेक्षां अधिक मतें मिळावीं असें उत्तरोत्तर होत जाऊन बारा वर्षांच्या खटपटीनंतर—म्हणजे १८८० सालीं ते प्रथमतः निवडून आले. पण जरी ते रीतसर निवडून आले असले, तरी ते नास्तिक असल्यामुळें पार्लमेंटांत त्यांनीं बसूं नये अशी पार्लमेंटांतल्या बहुतेक सभासदांची मनांतून इच्छा होती. त्यांना पार्लमेंटांत प्रवेश मिळूं नये यासाठीं त्यांनीं नाना क्लृप्त्या योजल्या. पार्लमेंटांत बसण्यापूर्वीं शपथ घेण्याचा विधि व्हावयाचा असतो. त्यासंबंधानें रणकंदन सुरू झालें, व कायद्याच्या डावपेंचांत मि. ब्रॅडलॉ यांना पकडून कोर्टांतल्या खर्चाखालीं त्यांना जेरीस आणण्याचा प्रयत्न झाला.

---

फारसा दोष दिलेला आढळत नाहीं. पण मि. ज्यॉफ्रे वेस्ट यांनीं जें बाईंचें चरित्र लिहिलें आहे त्यावरून पहातां जवळच्या नातेवाइकांनाहि त्यांच्या नवऱ्याच्या स्वभावांत फारच दोष दिसत होते असा ग्रह होतो. बाईंना जरी त्यानें वाईट रीतीनें वागविलें असलें तरी त्यांनीं आपल्या आत्मचरित्रांत मुद्दाम मूग गिळून नवऱ्याच्या दोषांवर थोडेंफार पांघरूण घातलें आहे असें दिसतें.

ईश्वराचें नांव न घेतां मला शपथ घेण्याची परवानगी पाहिजे असें ब्रॅडलॉ म्हणत होते; पण ती परवानगी त्यांस पार्लमेंट देईना. कायद्या-प्रमाणें जरूर असेल तर मी औपचारिकरीत्या नेहमींची शपथ घेईन, असें ते म्हणूं लागल्यावर तीहि परवानगी त्यांना पार्लमेंट देईना. एकदां ईश्वराचें नांव वगळून शपथ घेण्याची परवानगी पार्लमेंटनें त्यांना दिली आणि रीतसर शपथ घेतल्याशिवाय पार्लमेंटांत मत दिलें या अपराधाबद्दल हवीं तीं माणसें उभीं करून त्यांच्याकरवीं ब्रॅडलॉ ह्यांचेवर त्यांनीं फिर्यादी करविल्या. हा अन्याय पाहून सबंध देशाला ब्रॅडलॉविषयीं सहानुभूति वाटूं लागली, व अखिल इंग्लंड देशभर त्यांच्या वतीनें 'न भूतो न भविष्यति' अशी चळवळ सुरू झाली. कांहीं तरी कुस्पट काढून पार्लमेंटनें ब्रॅडलॉ यांची निवडणूक रद्द करावी व पुन: नवीन निवडणुकींत ब्रॅडलॉ हे जास्त मोठ्या बहुमतानें निवडून यावे, असें अनेकवार झालें. १८८० पासून १८८५ पर्यंत एकंदर पांच निवड-णुकी झाल्या. दर निवडणुकीनंतर कांहीं ना कांहीं युक्त्या काढून पार्ले-मेंट त्यांस अडचण करी व पुन: ते जास्ती मतें मिळवून निवडून येत. शेवटीं पार्लमेंटनें हात टेंकले व ब्रॅडलॉ हे यशस्वी झाले. लगेच त्यांनीं पार्लमेंटांत शपथेविषयींचा एक नवीन कायदा पास करून घेतला व ईश्वरावर श्रद्धा नसणाऱ्यांच्या मार्गांतली ही धोंड दूर केली. या अनेक वर्षांच्या चळवळींत डॉ. बेझंट यांना राजकारणाचे अनेक धडे शिका-वयास मिळाले. बहुजनसमाजाचें पुढारीपण स्वीकारणें, त्यांना शिस्तींत ठेवणें, प्रचंड चळवळ करणें, कायद्याचे डावपेंच खेळणें, कितीहि अपयश आलें तरी अंगीकृत उद्योगाचा पिच्छा न सोडणें वगैरे अनेक गोष्टी ब्रॅडलॉ यांच्या हाताखालीं बाईंना स्वानुभवानें शिकावयास मिळाल्या. या चळवळींत ब्रॅडलॉ यांना सरशेवटीं यश मिळालें खरें; पण तिनें ब्रॅडलॉ यांचें इतकें रक्त आटवलें कीं त्यानंतर लवकरच

त्यांची प्रकृति ढांसळली व ते अकालीं मृत्युमुखीं पडले, असें बाईंनीं लिहिलें आहे.

मि. ब्रॅडलॉ व डॉ. बेझंट यांचीं मतें १८७५ सालीं जरी एकसारखींच होतीं तरी सुमारें दहा वर्षांनीं त्यांच्या मतांत कांहीं फेर पडण्याचा योगायोग आला. सोशलिझम् किंवा समाजसत्तावाद म्हणून एक मत हल्लीं जनतेच्या पुढें विशेष जोरानें येत आहे, हें आमच्या वाचकांस माहीत असेलच. ह्या पक्षास हल्लींची समाज-व्यवस्था सुधारावयाची आहे. हल्लीं समाजांत सर्व जमीन, सर्व धनोत्पादक कारखाने व उद्योग-धंदे, सर्व भांडवल एका वर्गाच्या हातीं आहे. त्या वर्गास आपण भांड-वलवाले लोक म्हणतों. इतर लोक या भांडवलवाल्या लोकांच्या कार-खान्यांत नोकरी व मजुरी करून स्वतःचें पोट भरतात. त्यांस आपण मजूरवर्ग म्हणतों. समजांतील सर्व माणसें आपापले उद्योगधंदे कर-तांना परस्परांशीं चढाओढ करतात, व जो त्या चढाओढींत टिकेल तोच यशस्वी होतो. समाजसत्तावादाला अशा प्रकारची समाजव्यवस्था नको आहे. असल्या समाजव्यवस्थेमुळेंच समाजांतील बहुजन दरिद्री व कंगाल होतात, अशी समाजसत्तावादाची शिकवण आहे. जमीन, भांडवल व धनोत्पादक कारखाने हे खासगी व्यक्तीच्या मालकीचे नसावे, त्यांवर जनतेची मालकी असावी, त्यांतला फायदा मूठभर लोकांना न मिळतां तो सर्वांस मिळावा, समाजाची रचना चढाओढीच्या पायावर नसावी, हीं समाजसत्तावादाचीं तत्त्वें आहेत. ब्रॅडलॉ हे समाजसत्तावादी नव्हते. उलट त्यांचा त्या मताला विरोध होता. गरिबांची स्थिति सुधारावी असें जरी त्यांचें म्हणणें असलें, तरी वैयक्तिक प्रयत्न, वैयक्तिक चढाओढ, वैयक्तिक महत्त्वाकांक्षा यांच्या जोरावरच माणूस उद्योगी बनून पैसे मिळवितो व पुढें येतो; जर या गोष्टी समाजांतून काढून टाकल्या तर जास्त योग्यतेच्या माणसाला जास्त

उद्योग करून जास्त पैसे मिळविण्याचें आमिष रहाणार नाहीं व लोक आळशी बनून समाजाचें नुकसान होईल, असें त्यांचें मत होतें. बाईचेंहि मत प्रारंभीं याच प्रकारचें होतें. पूर्वी त्यांनीं अर्थशास्त्रावरील जुने ग्रंथ वाचलेले होते व त्यांत समाजसत्तावादाचा मागमूसहि आलेला नव्हता. १८८३ सालीं त्यांचें या विषयाकडे प्रथमतः लक्ष वेधलें. पुढें एका वर्षानंतर इंग्लंडांतील प्रसिद्ध सोशलिस्ट पुढारी मि. हेन्री हिंडमन व ब्रॅडलॉ यांचा समाजसत्तावादासंबंधानें एक सार्वजनिक वादविवाद झाला. त्या वेळीं जरी बाईचें मत एकंदरींत ब्रॅडलॉ यांच्या मताशींच जुळतें असलें, तरी मि. हिंडमन यांची बाजूहि विचार करण्यासारखी आहे असा त्यांचा ग्रह झाला. हिंडमन यांनीं लोकक्षोभ सोसून व स्वार्थत्याग करून समाजसत्तावादाची चळवळ विलायतेंत चालविलेली होती. ते बोलण्यांत अत्यंत फटकळ असत; व ब्रॅडलॉ यांचेवर त्यांनीं मोठ्या अन्यायानें अनेक हल्लेहि चढविले होते. त्यामुळें समाजसत्तावादाच्यासंबंधानें प्रारंभीं बाईच्या मनांत थोडीशी आढीच होती. या वेळीं बाईनीं समाजसत्तावादाचा अभ्यास करण्यांत व मतमतान्तरें पडताळून पहाण्यांत कांहीं काळ घालविला व अखेरीस तें मत ग्राह्य वाटल्यावरून त्या पक्षाचा १८८५ सालच्या सुमारास स्वीकार केला. संप करून व कामगारसंघ काढून मजुरांची स्थिति सुधारेल ही गोष्ट त्यांस अमान्य नव्हती. पण संप ही लढाई आहे, ती सदैव चालूं शकणार नाहीं, मजुरांचे पगार जर नुसत्या चढाओढीच्या तत्त्वावर ठरवावयाचे असतील तर त्यांची स्थिति कायमची सुधारणार नाहीं, गरिबांची स्थिति जर कायमची चांगली करणें असेल तर धनोत्पादक उद्योगधंदे खासगी व्यक्तींच्या मालकीचे असतां कामा नयेत, हळूहळू त्यांची मालकी समाजाच्या हातीं आली पाहिजे असें त्यांस वाटूं लागलें, व म्हणूनच त्यांनीं समाजसत्तावादाचा सार्वजनिक रीत्या अंगिकार केला. पुढें लवकरच बाई त्या मताच्या एक अग्रगण्य

पुरस्कर्त्या झाल्या. पुढें अत्यंत कंगाल लोकांत त्यांचें वारंवार फिरणें असे. त्यामुळें कामाखालीं हे कामकरी लोक कसे बेजार होतात, अष्टौप्रहर काम करूनहि त्यांस पोटभर अन्न कसें मिळत नाहीं, त्यांचीं मुलें भुकेनें कशीं व्याकूळ झालेलीं असतात, गरीब स्त्रिया पैशासाठीं देहविक्रयाचा व्यवसाय कसा करूं लागतात वगैरे गोष्टींची त्यांना प्रत्यक्ष माहिती झाली. गरीबांच्या या दुःखक्लेशांनीं त्यांचें हृदय सदा कष्टी झालेलें असे. ह्या काळीं समाजांतील हे दुःखक्लेश नाहींसे करण्यासाठीं नुसतें राजकारण सुधारून भागणार नाहीं, समाजव्यवस्थाहि हळूहळू बदलली पाहिजे अशी त्यांच्या मनाची खात्री झाली होती. तेव्हां त्या 'फेबियन सोसायटी' नांवाच्या एका समाजसत्तावादी संस्थेच्या पुढारी झाल्या. ब्रॅडलॉ हे मनानें उदार होते. बाईंनीं समाजसत्तावादाचा अंगिकार केला याबद्दल त्यांनीं कधींच तक्रार केली नाहीं व त्या दोघांचा स्नेह पूर्ववत् कायम राहिला; पण बाईंच्या विचारांसंबंधानें ब्रॅडलॉ यांना जो पूर्वी आदर वाटत असे तो जाऊन आपल्या निरनिराळ्या उद्योगांबद्दल ते त्यांचें मत पूर्वी जसें घेत असत तसें मात्र ते यापुढें घेईनासे झाले.

या मतांचा प्रसार करण्यांत बाईंनीं अपरंपार श्रम केले. बर्नार्ड शॉ हे फेबियन सोसायटीचे एक पुढारी होते व अद्यापहि आहेत. 'लोकांवर मोहिनी पाडून त्यांचीं मतें आपल्या बाजूस वळवून घेण्याची जेव्हां जेव्हां आम्हांला जरूरी पडे तेव्हां आमची फेबियन सोसायटी बाईंना व्याख्यानाच्या दौऱ्यावर पाठवीत असे' असें बर्नार्ड शॉ यांनीं लिहिलें आहे. व्याख्यान देण्याखेरीज दुसरेहि अनेक उद्योग बाई करीत. लंडनमधील एका आगकाड्यांच्या कारखान्यांत संप झाला होता. त्याला बाईंनीं पाठिंबा दिला व अनेक बाजूंनीं खटपट करून तो संप त्यांनीं यशस्वी केला. पुढें त्या कामकऱ्यांचा त्यांनीं संघ बनविला व बाई त्या संघाच्या अनेक वर्षे चिटणीस झाल्या. सांखळ्या करण्याचे कारखाने, टिनच्या

डब्यांचे कारखाने वगैरेंतील मजुरांची तसेंच गोदींतील कामकऱ्यांची स्थिति सुधारण्याच्या कामींहि त्यांनीं फार मेहनत केली. समाजसत्तावादाच्या चळवळींतहि त्यांना सरकारचा विरोध सोसावा लागला. सरकार सोशलिस्ट लोकांस उघड्या मैदानावर व्याख्यानें देऊं देत नसे, आणि गरीब मजुरांवर फिर्यादी करून, जामीन नाहीं म्हणून उगीचच्या उगीच त्यांना तुरुंगांत डांबून ठेवीत असे. असल्या अन्यायांचा प्रतिकार करण्यासाठीं बाईंनीं पुष्कळ उद्योग केले. Socialist Defence Association, Law & Liberty League वगैरे संस्था काढून गरीबांचे जामीन पटविणें, त्यांचे खटले चालविण्याची व्यवस्था करणें वगैरे अनेक गोष्टींची त्यांनीं भरपूर तजवीज केली होती.

याखेरीज राजकारणांतहि त्यांनीं लोकमताची जागृति या काळीं केली. इंग्लंडची साम्राज्यतृष्णा बाईंना बिलकुल पसंत नव्हती. आयर्लंड, ईजिप्त, हिंदुस्थान, अफगाणिस्थान या देशांत जें चढाईचें धोरण सरकारनें स्वीकारलेलें असे त्याला त्यांचा सदा विरोध असे. हिंदुस्थानांत येण्यापूर्वीच बाईंची हिंदुस्थानच्या आकांक्षांबद्दल पूर्ण सहानुभूति होती, व ती त्यांच्या त्या वेळच्या व्याख्यानांत व लेखांत वारंवार दिसून येत असे. त्यांनीं हिंदुस्थानशीं सहानुभूति दाखविणारें आपलें पहिलें England India & Afganisthan नांवाचें पुस्तक १८७८ सालीं लिहून प्रसिद्ध केलें होतें या एकाच गोष्टीवरून त्यांची हिंदुस्थानविषयींची सहानुभूति किती जुनी आहे हें वाचकांच्या ध्यानांत येईल. ब्रॅडलॉ यांचीहि विशेष सहानुभूति हिंदुस्थानला मिळालेली होती, व ते १८८९ सालच्या मुंबईच्या राष्ट्रीय सभेला मुद्दाम हजर होते हें सर्व हिंदी लोकांस महशूर आहेच.*

* ब्रॅडलॉ यांचा हिंदुस्थानांत त्या वेळीं अपूर्व सत्कार झाला. हिंदुस्थानांतल्या सर्व मोठ्या शहरांतून त्यांना मानपत्रें पाठविण्यांत आलीं, व कॉंग्रेसनेंहि त्यांस

या एकंदर उद्योगांवरून डॉ. बेझंट ह्या लोकांस अप्रिय कां झाल्या त्याचा वाचकांस उमज पडेल. त्या नास्तिकवादाचा प्रसार करीत व ख्रिस्ती धर्माच्या विरुद्ध बोलत. समाजसत्तावादहि त्या वेळीं लोकांस आवडत नसे व बाई तर त्याहि मताच्या प्रचारक होत्या. त्या राजकारणासंबंधानें जें लिहीत व बोलत त्यांत इंग्लंडचें हिंदुस्थानांतील व आयर्लंडांतील धोरण चुकीचें आहे, त्या देशांना इंग्लंडनें न्यायानें वागविलें पाहिजे असें स्पष्ट व निर्भीडपणानें म्हणत. कोणत्याहि समाजासमोर त्यानें केलेल्या अन्यायांचें आविष्करण केलें तर तें त्या समाजाला कसें खपावयाचें? बाई राजकारणांत जहाल ( Radical ) होत्या, व सामाजिक बाबतींतहि सुधारक होत्या. दुसऱ्याचें राज्य घेऊन आपलें साम्राज्य वाढवूं नये, सैन्यावर पैसा खर्च न करतां लोकशिक्षणावर करावा, लढाया बंद कराव्या, फांशीची शिक्षा बंद करावी, गरिबांची स्थिति सुधारावी, आयर्लंडला स्वराज्य द्यावें, वगैरेसंबंधानें व्याख्यानें देत त्या सर्वत्र फिरत. बाईंना नवऱ्यानें वेगळें काढलें होतें, ब्रॅडलॉंचा व त्यांचा निकट स्नेह होता, व संततिनियमनास त्यांचें मत अनुकूल असून बाई त्या मताचा प्रसार सार्वजनिक रीतीनें करीत; तेव्हां त्यांच्या चारित्र्याबद्दल कुटाळांची जीभ हवें तें बोलूं लागली. अर्थात् विलायतेंत एकंदर लोक त्यांच्या अगदीं उलट असावे यांत आश्चर्य नाहीं. नाहीं म्हणायला लंडनच्या स्कूलबोर्डावर त्या सर्वांत अधिक मतें मिळवून

---

मानपत्र देण्याचा मोठा समारंभ केला. सर फेरोजशहा मेथा हे या कॉंग्रेसचे स्वागताध्यक्ष होते व वेडरबर्नसाहेब अध्यक्ष होते. या कॉंग्रेसनें सुधारणांचा एक मसुदा करून तो पार्लमेंटमध्यें पास करून घेण्याकरितां ब्रॅडलॉ यांच्या हवालीं केला होता. पण ब्रॅडलॉ पुढें फार ज़गले नाहींत. नामदार गोखले व लोकमान्य टिळक यांचीं भाषणें पहिल्यांदा ज्या कॉंग्रेसमध्यें झालीं तीच ही होय. तिच्या पूर्वीं अकरा वर्षें डॉ. बेझंट यांनीं उपरोक्त पुस्तक लिहिलें होतें !

निवडून आल्या, व त्यासंबंधाचें काम लोकांस पसंत पडलें. गरिबांच्या मुलांना पुरेसें खाण्यास मिळत नाहीं, व जर त्यांस सक्तीचें शिक्षण द्यावयाचें असेल तर तें रिकाम्या पोटीं देणें न्याय्य नाहीं, त्यांच्या खाण्याची तरतूद सरकारनें केली पाहिजे असें त्यांस वाटत होतें; व त्या दिशेनें उद्योग करून गरिबांच्या मुलांस अन्न देण्याच्या बाबतींत त्यांनीं यश मिळविलें. पण बाईंचा असला एखादा लोकप्रिय उद्योग म्हणजे लोकक्षोभाच्या लाटांमध्यें ‘ दर्यामें खसखस ’ असाच झाला असल्यास नवल काय ?‡

---

‡ स्त्रियांस मताधिकार असावा असें बाईचें मत होतें, पण ती चळवळ करणाऱ्या मंडळींनीं बाईना आपल्यांत येऊं दिलें नाहीं. कारण काय, तर बाईनीं ख्रिस्ती धर्म टाकलेला होता! मि. स्टेड यांनीं रिव्ह्यू ऑफ रिव्ह्यूज् नांवाचें मासिक जेव्हां प्रथम काढलें तेव्हां पहिल्या अंकांत बाईच्या एका पत्राचा उतारा छापावा असें त्यांच्या मनांत आलें. पण मासिकाची व्यवस्थापक मंडळी म्हणूं लागली, कीं तसें कराल तर शेंकडों वर्गणीदार कमी होतील! या गोष्टींवरून त्यांच्याविरुद्ध लोकमत किती खवळलेलें होतें त्याची कल्पना होईल. (पहा, जॉफ्रे वेस्ट कृत बेझंट चरित्र, पृ. ६५.)

# प्रकरण पांचवें

## बोट बंदरास लागली!

डॉ. बेझंट यांनीं नास्तिकवाद व जडवाद यांचा स्वीकार केल्यापासून म्हणजे सुमारें १८७५पासून पुढच्या पंधरा वर्षांचा संक्षिप्त इतिहास मागील प्रकरणांत आला आहे. १८८९ साल उजाडण्याच्या अगोदर दोनतीन वर्षें डॉ. बेझंट यांच्या मतांत हळूहळू कांहीं नवीन चलबिचल चालू होती. त्या कंगाल व दरिद्री लोकांत एकसारख्या हिंडत व त्यांच्या स्थितींत सुधारणा करण्याचा सारखा उद्योग करीत. या वेळीं त्या दरिद्रीनारायणाचीं नाना दुःखें पाहून त्यांच्या हृदयांत अधिकाधिक कालवाकालव सुरू होऊं लागली. कोणाच्याहि डोळ्यांस न दिसणारा ईश्वर अस्तित्वांत आहे कीं नाहीं, धर्मग्रंथांत सांगितलेला परलोक खरा कीं खोटा, हे बुद्धिवादाचे रिकामे प्रश्न क्षणभर बाजूस सारून सध्यांच आपल्या पायांखालीं काय जळतें आहे तें पहावें व डोळ्यां-समोर उभें असलेलें दारिद्य नाहींसें करण्याचा उपाय शोधावा असें त्यांस या वेळीं त्यांचें मन जोरानें सांगूं लागलें. त्या दिशेनें जनमनाची तयारी करून कामास लागण्यासाठीं व त्या कार्यार्थ होतकरू माणसें एकत्र आणण्यासाठीं त्यांनीं व रिव्ह्यू ऑफ रिव्ह्यूजचे संपादक मि. स्टेड यांनीं 'लिंक' नांवाचें एक साप्ताहिक सुरू केलें. वर्तमानपत्राचा समाजास जरी कितीहि उपयोग असला, तरी त्यानें गरीबांचें दारिद्य चुटकीसरसें कसें नाहींसें होणार? जों जों बाई कंगाल व बेकार लोकांत अधिक अधिक फिरत तों तों उपाशी मुलांची दामटी वळलेलीं पोटें व त्यांच्या आयांचे पाण्यानें डबडबलेले डोळे हेंच दृश्य

त्यांना जिकडे तिकडे दिसूं लागलें. पुन: पुन: असले प्रकार पाहून त्यांच्या हृदयाला कळवळा येई व 'जगाच्या ह्या दु:खावर कांहीं औषध आहे का?' हा एकच प्रश्न त्यांचें मन त्यांना सारखें विचारूं लागे. समाजसत्तावाद जगांत आला तर हा कंगालपणा जाईल असें त्यांचें मत होतें. पण सर्व माणसांना सुखी करावयाचें तर त्या दिशेनें उद्योग करणारीं नि:स्वार्थी माणसें पाहिजेत, त्यांच्या हृदयांत मानवप्रेमाचा अखंड झरा वहात असला पाहिजे, गरीबांची स्थिति सुधारण्यांत त्यांना अत्यानंद वाटत असला पाहिजे. हें व्हावें कसें? त्यांनीं नि:स्वार्थी आणि प्रेमळ माणसें—या दिशेनें उद्योग करणारीं उत्साही माणसें—अंतरात्म्याला समाधान वाटतें एवढ्याचसाठीं नेटानें उद्योग करणारीं माणसें—गोळा करण्याचा उद्योग केला, पण तशीं माणसें मिळेनात. नवीन समाजव्यवस्था उत्पन्न करावयाची तर अशा प्रकारचीं किती तरी माणसें हवींत. मानवसेवेचें मंदीर उभारावयाचें तर त्याला त्या वृत्तीचे पाथरवट न मिळाल्यास कसें चालेल? ते तर सांपडेनात. मग हें जग कसें सुधारणार? याचा बाईंना मोठा पेंच वाटे. पर्वताएवढें दु:ख व तें निवारण्यास उत्साही, निरपेक्ष, व आनंद वाटतो म्हणून कष्ट करणारीं माणसें यांची टंचाई; तेव्हां हें काम तडीस जावें कसें? याची चिंता सदा त्यांच्या मनाला लागे व पुन: पुन: मन अगदीं निराश होऊन जाई. असें कांहीं वर्षें चाललें होतें.

हा काल म्हणजे १८८६ पासून १८८९ पर्यंतचा काळ होय. या काळीं आणखीहि एका दिशेनें डॉ. बेझंट यांच्या मनामध्यें चलबिचल सुरू होती. ह्या सुमारास मानसशास्त्रांत कित्येक शास्त्रज्ञ नवीन प्रयोगांची पुष्कळ भर टाकीत होते. मनुष्याच्या जाणिवेंत पुष्कळ भानगडी व चमत्कार आहेत, कधीं त्याच्या अंतरंगांत विविध-मनस्कताहि§

§ विविध-मनस्कता म्हणजे जिला इंग्रजींत Multiple Personality

सांपडते, असें हिप्नॉटिझम्च्या प्रयोगांवरून सिद्ध होऊं लागलें होतें. जसें पित्ताशयांतून पित्त उत्पन्न होतें, मोत्यांच्या शिंपल्यांतील रंग जसे त्यांतल्या परमाणूंच्या विशिष्ट रचनेमुळें उत्पन्न होतात, तद्वत् विचार, वासना, भावना ह्या चिजा मेंदूच्या द्रव्यापासून उत्पन्न होतात. हा बाईच्या जडवादाचा आणि नास्तिकवादाचा मूळभूत मुद्दा होता; व मानसशास्त्र तर उलट असें सांगूं लागलें कीं, मेंदू हा शून्य व मृतवत् स्थितींत असला तर कधीं कधीं मनाचे व्यापार जास्तच तीव्र होऊं लागतात! अशा प्रकारचे नवे नवे शोध मानसशास्त्रांत लागत होते; व ते सर्व बाईच्या समोर दत्त म्हणून उभे रहात, आणि त्यांचा उलगडा कसा करावयाचा ह्याचा पेंच बाईस पुनःपुनः पडे. जर मेंदूपासून जाणीव व मन उत्पन्न होतें, तर मनामध्यें अंतर्मन व बहिर्मन हीं दालनें कोठून यावीं? अंतर्मनांत अद्भुत अशा ज्या शक्ति दिसतात त्याहि कोठून याव्या? हिप्नॉटिझम्च्या निद्रेंत माणूस असला तर त्याच्या अंतर्यामीं जणुं दोन व्यक्ति दिसतात. प्रत्येकीचा वेगळा व स्वतंत्र असा इतिहास असतो, व ह्या दोन व्यक्ति एकाच माणसामध्यें राहिलेल्या असतात. हा प्रकार कसा उत्पन्न व्हावा? जर मेंदू हा जाणिवेला उत्पन्न करीत असेल, तर हिप्नॉटिझम्च्या निद्रेंत मेंदूला शून्यवत् केल्यावर माणसाची प्रतिभाशक्ति, त्याची स्मरणशक्ति ह्या कमी व्हावयास पाहिजेत, पण उलट त्या तीव्र झालेल्या दिसतात. असें कां व्हावें? हे प्रश्न बाईच्या मनांत घोळूं लागले, व आपण जो जडवाद जगाला सत्य म्हणून आजवर शिकविला तो असल्या प्रश्नांचीं उत्तरें देण्यास

म्हणतात तो प्रकार. मनाच्या एका स्थितींत असतां माणसाला मी अमुक अमुक आहें अशी जाणीव असत व त्याचे सारे व्यवहार त्या धोरणानें होतात, व तो दुसऱ्या मनःस्थितींत गेला म्हणजे आपण दुसरेच कोणी आहों अशी त्याची भावना होऊन तो तसें वागतो या गोष्टीला आम्ही विविध-मनस्कता असें म्हटलें आहे.

पुरा पडत नाहीं असें त्यांस वाटूं लागलें. त्यांनीं या वेळीं मानसशास्त्रांतील शोधांचा बारकाईनें अभ्यास केला; भ्रम, स्वप्नें, आभास, वेडसरपणा वगैरे जे जाणिवेचे चमत्कारिक प्रकार आहेत त्यांविषयीं शास्त्रज्ञांनीं केलेले शोध वाचले व मग स्वतः अनेक प्रयोग करून पाहिले, आणि अनेक चमत्कार खरे असल्याचा अनुभव घेतला. परलोकविद्येचेहि प्रयोग त्यांनीं ह्या सुमारास करून पाहिले; त्यांतले चमत्कार खरे असल्याची त्यांना प्रतीति आली. पण परलोकविद्यावादी माणसें म्हणत कीं मृत माणसें हे सारे चमत्कार करतात, ती उपपत्ति मात्र त्यांना पटेना. न बोलतां एकानें आपले विचार दुसऱ्याच्या मनांत पाठविण्याची क्रिया खरी आहे, सूक्ष्मदृष्टि व सूक्ष्मश्रवण या शक्तिहि खऱ्या आहेत, सामान्य माणसांस न दिसणाऱ्या व न ऐकूं येणाऱ्या गोष्टींची प्रचीति त्या शक्तींनीं माणसाला येऊं शकते याचाहि त्यांनीं सप्रयोग अनुभव घेतला. अर्थात् दृश्याच्या पलीकडे सृष्टींत दुसरें कांहीं नाहीं, द्रव्यच काय तें सत्य होय हें सांगणारा जडवाद खरा नाहीं, असें या प्रयोगांवरून त्यांना दिसूं लागलें; व पुरेसा अभ्यास केल्यावर शेवटीं त्यांचें मत ठाम झालें कीं, या प्रयोगांच्या मुळाशीं कांहीं तरी गुप्त व अद्भुत शक्ति असली पाहिजे. ही शक्ति काय आहे तें आपण समजून घेणें अत्यवश्य आहे असें त्यांचें मन त्यांना आग्रहानें सांगूं लागलें, व पुढें पुढें त्या शक्तीचें ज्ञान मिळाल्याशिवाय मनाला चैनच पडूं नये अशी त्यांची अवस्था झाली. त्यांचे बाह्य उद्योग सारे सुरू होतेच; पण मनांत असली चलबिचल सारखी चालू होती, आणि त्यानें त्यांचें मन सारखें अस्वस्थ असे. एके दिवशीं मनाच्या अशा विषण्ण स्थितींत बाई असतांना एक चमत्कार झाला, व पूर्वी जशी एकदां आकाशांतून आलेली वाणी त्यांनीं ऐकलेली होती* तसें पुनः एकवार झालें. बाई लंडन शहरांत आपल्या

* मागें पृ. ३१ पहा.

ऑफिसमध्यें होत्या व रात्र झालेली होती. दिवसा उद्योगाकरितां शहरांत आलेलीं लाखोंगणती माणसें उपनगर-भागांत सारीं परत जाऊन लंडन शहरांत शुकशुकाट झालेला होता. त्या वेळीं बाईंस भास झाला कीं आपणांशीं कोणी तरी बोलत आहे. ‘ तुला सत्य हवें आहे काय ? त्यासाठीं तूं सर्वस्व सोडण्यास तयार आहेस काय ?’ असें आपणाला कोणी विचारीत आहेसें त्यांना वाटलें. त्यावर त्यांच्या तोंडून एकदम सहजोद्गार निघाले कीं, ‘ अर्थात् मला सत्य हवें आहे.’ त्यावर ती वाणी पुन: उद्गारली, ‘ सत्य समजण्यासाठीं तूं सर्वस्वावर तुळशीपत्र ठेवण्यास तयार आहेस काय ?’ बाई म्हणाल्या, ‘ होय; जर सत्य समजणार असेल तर मी त्यासाठीं पडेल त्या गोष्टीचा त्याग करीन.’ त्यावर ती कठोर वाणी मृदु व प्रेममय झाली आणि ‘ लौकरच तुझ्या अंतर्यामीं तो प्रकाश पडेल ’ असें म्हणून स्तब्ध झाली.

मनाला समाधान नाहीं, जगाचें पर्वताएवढें दु:ख कमी करण्याचें साधन दिसत नाहीं, जगांतील सर्व प्रश्नांस उत्तरें देण्यासाठीं आपण काढलेला जडवाद नवीन शोधांचा उलगडा करण्यास असमर्थ आहे, आणि जाणिवेच्या मुळाशीं तसेंच माणसाच्या अंतर्यामीं कांहीं वेगळी शक्ति आहे, मात्र तिचें आपणांला अद्याप ज्ञान नाहीं—अशा अस्वस्थ मन:स्थितींत बाई दोनतीन वर्षें होत्या. आपला जडवाद सारा चुकलेला नसेल ना ! असा संशय त्यांच्या मनाला खात होता. असल्या मन:-स्थितींत असतांना वरील चमत्कार घडल्यानंतर सुमारें पंधरा दिवसांनीं ‘ रिव्ह्यू ऑफ रिव्ह्यूज् ’चे संपादक मि. स्टेड यांनीं बाईंना दोन लठ्ठ पुस्तकें आणून दिलीं. मॅडम् एच्. पी. ब्लॅव्हॅटस्की नांवाच्या एका स्त्रीनें लिहिलेल्या Secret Doctrine अथवा ‘ गूढविद्या ’ नांवाच्या ग्रंथाचे ते दोन खंड होते. स्टेडसाहेब बाईंना म्हणाले, ‘ माझ्याकडे हें पुस्तक अभिप्रायार्थ आलें आहे. माझ्या मंडळींना या पुस्तकाचा

मोठा बाऊ वाटतो; आणि तुम्हांला तर असल्या विषयांचें वेडच आहे. तेव्हां तुम्हीच त्यावर अभिप्राय लिहा' असें म्हणून त्यांनीं तें पुस्तक बाईंच्या हवालीं केलें.

बाई पुस्तक घेऊन घरीं गेल्या; आणि वाचावयास बसल्या तों आपल्या हृदयांतले जिव्हाळ्याचे सर्व प्रश्न त्यांत आहेत, असा त्यांना अनुभव आला. एखाद्या उत्तुंग गिरिशिखरावर माणसानें चढावें, पायाखालच्या अफाट प्रदेशाचा पट त्याच्या नजरेसमोर उघडा व्हावा, नाना वळणें घेत पुढें पुढें जाणाऱ्या नद्या समुद्राचा शोध करीत कोणत्या धोरणानें चालल्या आहेत हें त्यास एका अंगास दिसावें, दुसऱ्या बाजूस समुद्राच्या फेंसाळ लाटांनीं शुभ्र झालेली किनाऱ्याची नागमोड दृष्टिपथांत यावी, व हा सबंध चित्रपट एकदम डोळ्यांसमोर आल्यामुळें सहस्ररश्मि सूर्य महासागराचें पाणी मेघांच्या घागरींतून आकाशमार्गानें पर्वताच्या माथ्यावर कसें नेतो, वर्षाकाळीं त्या घागरींतलें पाणी तेथें ओतून पर्वताला सचैल स्नान कसें घालतो, व त्या पाण्याचे ओघ नदीरूपानें समुद्रापाशीं पुन: येऊन कसे विलीन होतात; व अशा रीतीनें सृष्टीचें रहाट-गाडगें कसें व्यवस्थितपणें चालतें हें कोडें त्या माणसाच्या बुद्धीस उलगडावें, तसें बाईंचें झालें. पुस्तक वाचतांना दृश्य सृष्टि व तिच्या मुळाशीं असलेली अद्भुतता, मानवी अंतरंग व त्याच्या गव्हरांत वहाणारे चैतन्याचे झरे, उत्क्रान्तीचा चक्रव्यूह व त्याच्या उभारणी-संहारणीचा क्रम, या सर्व गोष्टींवर बाईंच्या मनांत लखलखकन् प्रकाश पडल्यासारखें झालें. या ग्रंथकर्त्रीला कांहीं स्वत:चा अनुभव आहे, ज्या गोष्टी आपण इतके दिवस अज्ञेय म्हणत होतों त्यांपैकीं कांहींची तरी तिला प्रत्यक्ष प्रचीति आहे, असें त्यांचें मन त्यांना सांगूं लागलें, व आपल्या मनाचे संशय न जाणो या बाईकडून फिटतील, असा एक आशेचा नवीन किरण त्यांच्या हृदयांत उत्पन्न झाला.

मॅडम् ब्लॅव्हॅटस्की यांनीं आपल्या ग्रंथांत स्पष्ट लिहिलें होतें कीं, मनुष्याच्या अंतर्यामांतील व त्याचप्रमाणें सृष्टींतील किती तरी प्रकार माणसाला इंद्रियगोचर नसतात, पण या इंद्रियातीत गोष्टी कांहीं व्यक्तींना विशेष प्रयत्नानें प्रत्यक्ष अनुभवितां येतात. त्यांनीं असेंहि प्रतिपादिलें होतें कीं,नीतिमत्ता, चित्तशुद्धि, कार्यकुशलता,बुद्धि, प्रतिभा, आत्मसामर्थ्य या गुणांमध्यें फारच पुढें गेलेलीं आणि योगसिद्धि हस्तगत करून अदृश्य सृष्टि प्रत्यक्ष पाहूं शकणारीं कांहीं निवडक माणसें आजहि पृथ्वीवर विद्यमान आहेत, त्या नरपुंगवांपाशीं सृष्टींतील सर्व कूट प्रश्नांना उत्तरें आहेत, तीं उत्तरें त्यांनीं तर्कशास्त्राच्या अनुमानावर बसविलेलीं नसून त्यांच्या त्या उत्तरांना प्रत्यक्ष अनुभवाचा पाया आहे, व असल्या कित्येक महानुभाव व्यक्तींपासूनच आपण किंचितसें ज्ञान शिकलों असून तें जगासमोर ठेवीत आहों.

तें पुस्तक वाचून बाईनीं त्यावर अभिप्राय लिहिला व लवकरच मि. स्टेड यांच्या मध्यस्थीनें ब्लॅव्हॅटस्की बाईची गांठ घेतली. मॅडम् ब्लॅव्हॅटस्की त्या वेळीं लंडन शहरांत रहात होत्या. त्यांचें वय साठीच्या घरांत आलेलें होतें. सुमारें पंधरा वर्षांपूर्वी त्यांनीं कर्नेल ऑलकॉट नांवाच्या एका सुप्रसिद्ध अमेरिकन गृहस्थाशीं सहकार्य करून थिऑसफिकल सोसायटी नामक एक संस्था काढलेली होती; व त्या संस्थेच्या त्या सर्वमान्य पुढारी होत्या. मॅडम् ब्लॅव्हॅटस्की यांना पाहून डॉ. बेझंट यांच्या मनावर फारच अनुकूल परिणाम झाला. आपण थिऑसफिकल सोसायटींत शिरावें असा विचार त्या वेळीं बाईच्या मनांत आला, पण प्रथम त्यांचें मन तसें करण्यास तयार होईना. आधींच त्यांनीं किती तरी लोकक्षोभ सोसलेला होता, व लंडनच्या लोकल-बोर्डाचें पुष्कळसें काम केल्यामुळें, नुकतेंच कोठें त्यांना एखादें एखादें माणूस तरी बरें म्हणूं लागलें होतें. अशा वेळीं लोकांस न

आवडणाऱ्या थिऑसफिकल सोसायटींत आपण शिरलों तर नास्तिकवादांतून आपण श्रद्धेच्या वातावरणांत उडी टाकिली असें सर्व जगास वाटून लोक आपणांस चंचल म्हणून जास्त शिव्या देतील, व ज्या नास्तिकवादाचें पुढारीपण आपण पंधरा वर्षें इतक्या स्वार्थत्यागानें अंगावर घेतलें होतें, तोच नास्तिकवाद अपुरा व असमाधानकारक आहे असें आपण म्हटलें तर त्या पक्षांतलीं सारीं माणसें——ज्यांनीं आपणास कठीण प्रसंगीं जिवास जीव देऊन अत्यंत सहाय्य केलें होतें ——तींच आपणांवर उलटतील; तसेंच इतकीं वर्षे आपण जगास चुकीचीं मतें शिकविलीं अशी सार्वजनिक कबुली देणें आपणास भाग पडून आपल्यावरचा सर्व लोकांचा विश्वास उडेल; या साऱ्या अडचणी बाईच्या डोळ्यांस दिसत होत्या. आपण नास्तिकवाद सोडून थिऑसफिकल सोसायटींत गेलों तर ब्रॅडलॉ यांस काय वाटेल? हाहि विचार त्यांच्या मनांत आल्याविना राहिला नाहीं. पण मनाची ही स्थिति फार वेळ टिकली नाहीं. खऱ्यासाठीं पडेल तो स्वार्थत्याग करावा, ही त्यांची वृत्ति आतां दृढावली होती; व नवऱ्याचें घर सोडल्यानंतर त्यांना जे जे आघात सोसावे लागले होते त्यांनीं त्यांचें मन घट्ट झालें होतें. तेव्हां सत्य शोधण्यासाठीं जो मार्ग आपणांस योग्य दिसतो तो बिनदिक्कत धरावयाचा, मग लोकांमध्यें त्याचा परिणाम कांहींहि होवो, तिकडे लक्ष द्यावयाचें नाहीं असें त्यांनीं ठरविलें.

त्या पुनः एकदां मॅडम् ब्लॅव्हॅटस्की यांस भेटावयास गेल्या व त्यांचेपाशीं थिऑसफिकल सोसायटीविषयीं चवकशी करूं लागल्या. ब्लॅव्हॅटस्की बाई म्हणाल्या, 'माझेविरुद्ध सायकिकल रिसर्च सोसायटी'नें एक रिपोर्ट लिहिला आहे तो तुम्ही वाचला आहे कीं नाहीं?'*

* मॅडम् ब्लॅव्हॅटस्की ही एक लबाड बाई आहे असें त्या रिपोर्टांत प्रतिपादिलें होतें; व तो रिपोर्ट अनेक बुद्धिमान् माणसांनीं लिहिलेला होता. एके वेळीं त्या

डॉ. बेझंट उत्तरल्या, ' नाहीं ' त्यावर ब्लॅव्हॅटस्की बाईनीं सांगितलें, ' तो रिपोर्ट अगोदर वाचा.' त्याप्रमाणें डॉ. बेझंट यांनीं तो रिपोर्ट आणवून वाचला. मॅडम ब्लॅव्हॅटस्की ही बाई भोंदू व लबाड आहे, असा आरोप त्या रिपोर्टांत केलेला होता. त्याचा परिणाम डॉ. बेझंट यांच्या मनावर झाला नाहीं. त्यांना सत्यसंशोधनाची तहान लागलेली होती, व मॅडम् ब्लॅव्हॅटस्की यांचें Secret Doctrine हें पुस्तक वाचून ती तहान भागणें शक्य आहे ही आशा त्यांच्या मनांत उत्पन्न झालेली होती. अर्थात् ब्लॅव्हॅटस्की बाईच्यावरील वैयक्तिक टीकेनें त्यांचें मन कलुषित झालें नाहीं. दुसऱ्या दिवशीं डॉ. बेझंट या थिऑसफिकल सोसायटीच्या सभासद झाल्या; व पुन: मॅडम ब्लॅव्हॅटस्की यांस भेटावयास गेल्या. मॅडम ब्लॅव्हॅटस्की म्हणाल्या, ' तुम्ही आमच्या सोसायटीच्या सभासद झाल्यात कीं काय? तो रिपोर्ट वाचलात कीं नाहीं?' बेझंटबाईनीं त्या प्रश्नांचीं उत्तरें दिल्यावर त्यांनीं मॅडम् ब्लॅव्हॅटस्की यांना विचारलें, ' माझी आपणांला एक विनंति आहे. मी विचारतें, तुम्ही मला शिष्य म्हणून पत्कराल का? सबंध जगानें मला कितीहि दूर लोटलें तरी मी तुमची आहें, तुमची शिष्य आहें असें जगाला सांगण्याची तुम्ही मला परवानगी द्याल का?' हा प्रश्न ऐकून मॅडम ब्लॅव्हॅटस्की यांची उग्र मुद्रा एकदम वितळली, डोळे पाण्यानें भरून आले व बेझंट-बाईच्या मस्तकावर हात ठेवून त्या उद्गारल्या, ' बाई, तूं थोर स्त्री आहेस; माझ्या गुरुदेवांचा वरदहस्त तुझ्यावर असो!'

अशा रीतीनें डॉ. बेझंट ह्या जडवादाची व नास्तिकवादाची भूमिका सोडून थिऑसफिकल सोसायटींत आल्या. विचार न करतां त्यांनीं एकदम या वेळीं थिऑसफिकल सोसायटींत उडी टाकिली, असा

---

रिपोर्टामुळें मॅडम् ब्लॅव्हॅटस्की यांचेविरुद्ध लोकमत फार कलुषित झालेलें होतें. आज त्या रिपोर्टाचें फारसें कोठें वजन नाहीं.

पुष्कळ लोकांचा त्यांचेवर आरोप आहे. डॉ. बेझंट यांचे सार्वजनिक उद्योगच फक्त ज्यांनीं पाहिलेले असतील त्यांना तसें वाटणें सहाजिक आहे हें खरें. पंधरा वर्षें जडवादाचें पुढारीपण स्वीकारून ज्या स्त्रीनें मोठ्या बुद्धिमत्तेनें नास्तिकवादाचा जोरानें पुरस्कार केला होता तिच्या हातीं एक पुस्तक कोणी द्यावें, तें वाचून तिनें त्या ग्रंथकाराची भेट घ्यावी, व लवकरच नास्तिकवादाविरुद्ध असलेल्या एका संस्थेचा सभासद व्हावें, यांत कोणालाहि निष्कारण घाई दिसण्याचा संभव आहे. अर्थात् जगानें त्यांच्यावर तो आरोप ठेवून मोठा गहजब केला याचें आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. पण खरोखरीं पाहिलें तर बाईंच्या मनांत कांहीं वर्षें चलबिचल सुरू होती, जगांतील दुःखाचे डोंगर उचलण्याला माणसाच्या हृदयांत जी अखंड स्फूर्ति पाहिजे ती देण्यास जडवाद समर्थ नाहीं, मनुष्याच्या अंतरंगाविषयींचे शास्त्रीय शोधहि नुसत्या जडवादाच्या सहाय्यानें उलगडत नाहींत, सृष्टींत द्रव्याच्या पलीकडे कांहीं नवीन शक्ति आहे, व तिची माहिती झाल्याशिवाय आपले प्रश्न सुटणार नाहींत असें बाईंस दोनतीन वर्षें वाटत होतें. त्यांचे प्रयोग त्या दिशेनें चालले होते, वाचन व मननहि सुरू होतें हें आपण नुकतेंच पाहिलें आहे. मनाच्या ह्या तयारीचा आपण विचार केला तर थिऑसफिकल सोसायटींत बाई घाईनें आल्या असें वाटण्याचें बिलकुल कारण नाहीं.

बाई आपल्या पूर्ववयांत धर्मावर श्रद्धा ठेवीत होत्या, पुढें त्या नास्तिक झाल्या, व नंतर १८८९ सालीं त्या थिऑसफिस्ट होऊन पुनः आस्तिक बनल्या. यावरून बाईंना तत्त्वनिष्ठा नाहीं, त्यांचा स्वभाव लहरी व चंचल आहे अशीहि टीका कांहीं लोक त्यांचेवर करीत असतात.* ही टीका अगदीं चुकीची आहे, हें आपण लक्षांत ठेवलें

* मागें पृष्ठ ४६–४७ पहा.

पाहिजे. अगदीं लहान वयांत माणसाला स्वतंत्र विचार करतां येत नाहीं, व जर श्रद्धाळू माणसांच्यामध्यें त्याचा जन्म झालेला असेल तर तो सहजच भाविकपणामुळें आपल्या परंपरागत धर्मावर श्रद्धा ठेवतो. पुढें स्वतंत्र विचार करूं लागण्याची त्याला योग्यता आली व सत्य शोधण्याची त्याला तीव्र उत्कंठा असली तर पुष्कळदां मनांत संशय उत्पन्न होतात; आणि तो जडवादी व नास्तिक बनतो. धर्मतत्त्वांवर श्रद्धा ठेवण्यास पुरेसा पुरावा नाहीं म्हणून तो नास्तिक झालेला असतो. सत्यशोधनाच्या मार्गावरून पुढें जात असतां भोळेपणाचा टप्पा प्रथम येतो, पुढें संशयाचा व नास्तिकपणाचा टप्पा लागतो हें यावरून उघड आहे. अंगीं बुद्धिमत्ता नाहीं, संशय घेण्याला जी अक्कल लागते तीहि ज्याच्या ठिकाणीं नाहीं, किंवा धर्मतत्त्वांचा खरेखोटेपणा पहाण्याची ज्याला उत्कंठा नाहीं, तो भोळेपणाच्या पहिल्या टप्प्यावर सतत माशा मारीत बसून राहील. पण ईश्वर आहे कीं नाहीं, परलोक आहे कीं नाहीं, जगांतील परमोच्च ध्येय काय, जगांतील दुःख कशानें उत्पन्न होतें, तें कोणत्या उपायानें नाहींसें होईल, माणसाच्या अंतर्यामीं देहाव्यतिरिक्त निराळा जीव असतो किंवा नाहीं वगैरे नाना प्रश्नांचीं उत्तरें सुटल्याविना ज्याच्या जिवास चैन पडत नाहीं, व हीं उत्तरें शोधीत असतांना पुरावा नाहीं म्हणून ज्याला धर्मसिद्धान्त खोटे वाटत असतात त्या माणसाला पहिल्या टप्प्यावरच्या भोळसटानें नांव ठेवावें यांत स्वारस्य काय?

जो माणूस अशा प्रकारें नास्तिक झालेला असतो, तो 'पुरावा दाखवा', 'पुराव्याच्या अभावीं आम्हीं धर्मसिद्धान्तावर विश्वास ठेवण्यास तयार नाहीं', 'तुमचे धर्मसिद्धान्त युक्तीला पटत नाहींत' असेंच म्हणत असतो. जर त्यास पुरावा दाखविणारा कोणी माणूस मिळेल तर त्या पुराव्याची चवकशी करणें हें त्याचें अर्थातच कर्तव्य आहे. ज्याप्रमाणें पहिल्या टप्प्यावर अनेक खुशालचेंडू भाविक माणसें थबकून

राहिलेलीं असतात त्याप्रमाणें दुसऱ्या टप्प्यावरहि अनेक अहंमन्य नास्तिक थबकून राहिलेले आढळतात. माझ्यापेक्षां जगांत कोणाला कांहीं समजत नाहीं, युक्तिवादापेक्षां जगांत दुसरें कोणतेंच प्रमाण उपलब्ध नाहीं, असें म्हणत स्वाभिमानाच्या तोऱ्यांत ही मंडळी दुसऱ्या टप्प्यापाशीं रेंगाळत असतात. पण ज्यांच्या हृदयाची तळमळ सारखी चालू असेल, अहंमन्यतेनें ज्यांची जिज्ञासा बोथट झाली नसेल, त्यांना जरी भोळा भाव नको असला, रूढ कल्पना आंधळेपणानें स्वीकारण्याची यद्यपि त्यांची तयारी नसली, तरी शक्य तर अनुभवाच्या मार्गानें जाऊन खरेंखोटें शोधण्याची त्यांची उत्कंठा असते. मला स्वतःला या प्रश्नांसंबंधानें प्रत्यक्ष अनुभव आहे, असें जर कोणी म्हणत असेल तर तो अनुभव स्वतःच घेऊन पहाण्याला त्यांचें मन उत्सुक असतें. मॅडम् ब्लॅव्हॅटस्की ही नुसती पुस्तकें वाचणारी व लिहिणारी स्त्री नव्हती. धर्माच्या सिद्धान्ता-संबंधानें माणसाला स्वतःचा अनुभव घेतां येतो; ज्यांना त्याचा संपूर्ण अनुभव आहे अशीं माणसें आज जगांत विद्यमान आहेत, त्यांच्यापासून मींहि अल्पसा स्वानुभव मिळविलेला आहे, मला जसा तो मिळाला तसा तो दुसऱ्या लोकांनाहि प्रयत्नतः मिळूं शकेल, अनुभवाचा मार्ग आजहि अस्तित्वांत आहे, त्या मार्गानें पुढें जाण्यास मी दुसऱ्यांना थोडीशी मदतहि करीन, पण मजपेक्षां त्या पूर्णानुभवी माणसांचें सहाय्य त्यांना पुष्कळच अधिक होईल, त्यांनींच मला ह्या मार्गाची जगांत घोषणा करण्यास सांगितलें आहे, असें मॅडम ब्लॅव्हॅटस्की यांचें स्पष्ट म्हणणें होतें. आपण ज्या गोष्टीचा शोध करीत आहोंत तें सत्य आपणाला या मार्गानें सांपडेल असा ‘ गूढविद्या ’ पुस्तक वाचून डॉ. बेझंट यांचा ग्रह झाला, अशा आन्तरानुभवानेंच तें पुस्तक लिहिलेलें आहे ही त्यांची कल्पना झाली. मॅडम ब्लॅव्हॅटस्की यांची प्रत्यक्ष भेट झाल्यावर ती कल्पना आणखी दृढ झाली. तेव्हां तुमचें ज्ञान मला शिकवा, अनुभवाच्या मार्गानें तुम्ही

मला पुढें न्या, असें म्हणून डॉ. बेझंट या त्यांच्या शिष्य झाल्या यांत नवल तें काय? प्रारंभींची भूमिका भोळ्या भावाची असते, पुढची जिज्ञासेची, संशयाची, तर्काची व नास्तिकपणाची असते, आणि त्याच्यापुढची प्रयोगाची व प्रत्यक्षानुभवाची असते हें ज्याच्या लक्षांत येईल त्याला डॉ. बेझंट यांचें हें करणें स्वाभाविक वाटेल; आणि ह्या मानवी विकासाच्या क्रमवार पायऱ्या आहेत हें त्याला समजेल.

डॉ. बेझंट या थिऑसफिकल सोसायटीच्या सभासद झाल्या ही बातमी सर्वत्र पसरल्यावर त्यांचेवर चोहोंकडून प्रचंड गहजब झाला. मि. ब्रॅडलॉ हे मनानें थोर असल्यामुळें त्यांचा व बाईचा मित्रत्वाचा ऋणानुबंध तुटला नाहीं खरा, पण ब्रॅडलॉ यांचा बाईच्या विचारांवरील विश्वास मात्र सारा उडून गेला. ज्या नास्तिक पक्षाचें पुढारीपण बाईकडे इतकीं वर्षें होतें त्यांतले बहुतेक सारे लोक बाईवर या वेळीं उलटले. पुष्कळ मित्रांनीं आपले स्नेहसंबंध तोडले व पुष्कळांनीं त्यांचेवर सार्वजनिक टीकेचा वर्षाव केला. अगदीं परक्या माणसानें आपणास शिव्यां दिल्या तर आपणास त्याचें तितकें वाटत नाहीं; पण ज्यांचें आपण पुढारीपण स्वीकारलें होतें, आपला ज्यांच्यावर व ज्यांचा आपणावर तप—दीड तप पूर्ण विश्वास होता, ज्यांच्यासाठीं आपण घरादाराचा व प्राणांहूनहि प्रिय असलेल्या चारित्र्यविषयक नांवलौकिकाचा त्याग केला व ज्यांनीं आपणांला झीज सोसून आणि मनोभावानें मदत केली त्यांचे वाग्बाण बाईना फार लागले असतील हें उघड आहे. कारण नास्तिकवादाचा पक्ष सोडण्यांत बाईनीं बेइमानी केली आहे असेंच त्यांना वाटूं लागलें होतें. अर्थात् आपण थिऑसफिस्ट कां झालों याचीं कारणें बाईना सार्वजनिक रीत्या सांगणें आवश्यक झालें. त्यांनीं त्यासंबंधानें आपल्या जुन्या अनुयायांना व्याख्यानें दिलीं, व सर्वांस आपलें म्हणणें कळावें म्हणून

आपलें म्हणणें लघुपुस्तकरूपानें प्रसिद्ध केलें.* आपल्या नास्तिक-पक्षाच्या अनुयायांस त्यांनीं जें एक त्या वेळीं व्याख्यान दिलें त्यांतला शेवटला भाग वाचनीय आहे. त्यावरून बाईंच्या मनांतील खळबळ व निर्धार या दोन्ही गोष्टी वाचकांस स्पष्ट दिसून येण्याजोग्या आहेत. बाई म्हणाल्या—

'माझ्या नास्तिक मित्रांस मला शेवटचे दोन शब्द सांगणें आहेत. 'आमच्या संस्थेंतून निघून जा' असें जर आपण मला म्हणत असाल तर मीहि आपणांला रामराम करण्यास तयार आहें. कोणत्याहि पक्षावर माझी जबरी नाहीं. ज्या क्षणीं मी आपणाला नकोशी होईन त्या क्षणीं माझा रस्ता सुधारण्यास मी राजी आहें. ज्या जडवादावर माझी इतकीं वर्षें सारी भिस्त होती तो डळमळीत आहे हें मान्य करण्यांत माझ्या जिवाला किती दुःख होत आहे याची तुम्हाला कल्पना नाहीं. मीं स्पष्टपणें तसें सांगितल्यामुळें माझ्या अत्यंत जिवलग मित्रांचा मजवर टीकावर्षाव होत आहे हें आपण पहातच आहां. पण आज काय किंवा माझ्या आयुष्यांतील पूर्वप्रसंगीं काय, असत्य बोलून सुखासमाधानांत रहाण्याची माझी बिलकूल इच्छा नव्हती व नाहीं. मला जें सत्य दिसतें तें बोलण्याची निकडीची आज्ञा माझ्या मनोदेवतेनें मला केली आहे, मग तें बोलणें लोकांना गोड वाटो कीं कडू-वाटो, त्यानें माझ्या पदरांत स्तुति पडो कीं निंदा पडो. माझ्या सत्य-निष्ठेला कलंक लावण्यास मी कदापि तयार होणार नाहीं. त्या सत्याच्या सख्यत्वासाठीं जिवलगांची ताटातूट झाली आणि इष्टमित्रांचे एकूणएक ऋणानुबंध तुटले तरी मला पुरवतील. तें सत्य मला यद्यपि निर्जन अरण्यांत नेत असेल तरी त्याची कांस सोडूं नये असा माझा निश्चय

* Why I Became a Theosophist या नांवानें हें पुस्तक प्रसिद्ध असून तें आजहि वाचण्यालायक आहे.

आहे. सर्व मित्रांनीं मला सोडलें तरी मी त्या सत्याची पाठ सोडणार नाहीं; किंबहुना त्या सत्यानें माझी मान जरी कापली तरी मी त्या सत्यावरील निष्ठा सोडणार नाहीं. 'या स्त्रीनें सत्याची पाठ धरण्याचा प्रयत्न केला' यापरतें दुसरें कांहीं कोणी माझ्या थडग्यावर लिहूं नये इतकीच माझी अखेरची इच्छा आहे.'

इ. स. १८८९ सालच्या मे महिन्यांत डॉ. बेझंट ज्या थिऑसफिकल सोसायटींत शिरल्या त्या आज म्हणजे १९३२ सालीं—अर्थात् त्रेचाळीस वर्षांनंतर—त्याच सोसायटींत आहेत, आणि त्याच सोसायटीचें अधिकाधिक कार्य करीत आहेत. थिऑसफिकल सोसायटींत त्या शिरल्या त्या वेळीं त्यांचें वय ४२ वर्षांचें होतें व त्यानंतर आणखी त्रेचाळीस वर्षें त्याच सोसायटीची त्यांनीं अनन्यभावें एकसारखी सेवा केली आहे. तेव्हां बाईंना चंचल म्हणण्याचें मुळींच कारण नाहीं. थिऑसफींत येण्यापूर्वीं त्यांच्या मनाला स्थिर पाया सांपडला नव्हता; व तो पाया कायम करण्याच्या अगोदर त्यांनीं एक-दोनदां दुसरीकडे पाया खणून पाहिला, तो भुसभुशीत असल्यामुळें त्यांना सोडून द्यावा लागला हें खरें आहे. पण आपण अनुभवाचा मार्ग अंगिकारणार, व तो मार्ग अनुसरण्यास आपणास मॅडम ब्लॅव्हॅटस्की यांचें सहाय्य होईल हें बाईंनीं त्या वेळीं आंखलेलें धोरण पुढें यशस्वी झालें; व अपेक्षेप्रमाणें मॅडम ब्लॅव्हॅटस्की यांनीं डॉ. बेझंट यांना तें सहाय्य केलें, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. थिऑसफींत आल्यावरहि डॉ. बेझंट यांचा गरिबांच्या हिताचा व समाजसत्तावादाच्या प्रसाराचा उद्योग पूर्ववत् चालूच होता. त्या वेळीं थिऑसफीच्या व इतर अभ्यासास वेळ मिळण्याची बाईंना मुष्कील पडूं लागली; आगगाडींतून प्रवास करतांना, ट्रामगाडींतून हिंडतांना व रात्रीं जाग्रण करून त्यांनीं आपला अभ्यास नेटानें चालू ठेवला, आणि आपल्या परोपकारकार्याचा

आपल्या अभ्यासांत व्यत्यय येऊं दिला नाहीं. पुढें कांहीं दिवसांनीं डॉ. बेझंट या मॅडम ब्लॅव्हॅटस्की यांच्या घरीं येऊन राहिल्या. तेथें, त्या घरीं, मॅडम ब्लॅव्हॅटस्की यांच्यासमवेत इतर अनेक सुप्रसिद्ध थिऑसफिस्ट मंडळी रहात असत. रोज ती सर्व मंडळी ठरलेल्या वेळीं एकत्र जमत, त्या वेळीं निरनिराळ्या विषयांची चर्चा होई; पुष्कळ तात्त्विक व अध्यात्मिक गोष्टी त्या सर्वांना समजावून सांगत. त्या बाह्यात्कारीं उग्र दिसत, व कधीं कधीं आपल्या शिष्यांशीं मुद्दाम उग्रपणानें वागत; पण आंतून त्यांचें सर्वांवर जिव्हाळ्याचें प्रेम असे. ब्लॅव्हॅटस्कीबाईनीं राजयोगाचा अभ्यास केलेला होता. त्यांना अंतर्ज्ञान होतें आणि सिद्धिहि प्राप्त झालेल्या होत्या. अर्थात् त्या ज्या गोष्टी आपल्या शिष्यसमुदायाला शिकवीत त्या पुस्तकी ज्ञानाच्या जोरावर न शिकवितां अंतर्ज्ञानाच्या जोरावर शिकवीत, आणि म्हणूनच ती शिकवण त्यांना पटत असे. क्वचित् प्रसंगीं एखादी गोष्ट समजून देतांना योगविद्येचे चमत्कारहि करीत, व प्रयोगाच्या सहाय्यानें आपला मुद्दा विशद करीत. योगसिद्धि म्हणजे कांहीं सृष्टिनियमाविरुद्ध क्रिया नव्हे; तर सामान्य माणसाला जी अर्धीमुर्धी सृष्टि दिसते त्यापलीकडील सृष्टीचें ज्ञान प्रत्यक्ष मिळवून केलेली क्रिया म्हणजेच योग-चमत्कार होय असें त्या म्हणत. तत्त्वतः त्या चमत्काराचा माणसाला उपयोग नसतो, पण अतींद्रियसृष्टि आहे कीं नाहीं हा ज्याला संशय असेल त्याला पुरावा म्हणून असल्या सिद्धींचा उपयोग होतो; व योग्य प्रयत्न केल्यास त्या सिद्धि सर्व माणसांना प्राप्त होऊं शकतील असें त्या सांगत. मॅडम ब्लॅव्हॅटस्की व डॉ. बेझंट यांची गांठ म्हणजे अधिकारी शिक्षक व उत्कृष्ट शिष्य यांची भेट होय. डॉ. बेझंट यांनीं त्या भेटीचा उत्तमोत्तम उपयोग करून घेतला, व मॅडम ब्लॅव्हॅटस्की यांच्या हाताखालीं राजयोगाचा अभ्यास सुरू करून त्यांनीं त्या क्षेत्रांत फारच जलदीनें प्रगति करून

घेतली. गवतांतून आंतली काडी जशी आपण हलक्या हातानें ओढून काढतों तद्वत् माणसाला देहांतून जीव बाहेर ओढतां येतो असें कठोपनिषदांत लिहिलें आहे.* हें माणसाला करतां आलें म्हणजे जीव हा देहाहून वेगळा आहे ह्याचा त्याला अनुभव येऊन देहबुद्धि नाहींशी होते. मॅडम ब्लॅव्हॅटस्की यांच्या शिक्षेंत असतांना असल्या गोष्टी करावयास बेझंटबाई शिकल्या व त्यांचा त्यांना अनुभव घेतां आला. थिऑसफींत शिरल्यावर कांहीं काळानें डॉ. बेझंट यांनी स्पष्ट लिहिलें होतें कीं देह जीवाहून वेगळा आहे याचें प्रत्यक्ष ज्ञान मला आतां प्रयोगानें मिळालें आहे, जी परमज्ञानी माणसें आज पृथ्वीवर असल्याचें मॅडम ब्लॅव्हॅटस्की सांगतात त्यांचेंहि मला प्रत्यक्ष ज्ञान झालें आहे, इतर कांहीं अतींद्रिय गोष्टींचाहि मला प्रत्यय आलेला आहे. मी या गोष्टी अभिमानानें बोलत नाहीं; कारण मी या मार्गावर अगदीं नवीन आहें, आकाशांत उंच भराऱ्या मारणाऱ्या गरुडाच्या मानानें नुकत्याच पंख फुटलेल्या लहान पक्ष्यासारखी आहें; पण या लहानग्या पक्ष्यालाहि थोडाफार स्वतःचा अनुभव आलेला आहे, आणि ज्या आशेनें मीं मॅडम ब्लॅव्हॅटस्की यांचें शिष्यत्व पत्करलें ती सफल होऊं लागली आहे.

मॅडम ब्लॅव्हॅटस्कींनीं कर्नल ऑलकॉट यांच्या सहाय्यानें थिऑसफिकल सोसायटी प्रथम १८७५ सालीं स्थापिली हें आम्ही वर सांगितलेंच आहे. आरंभापासून या सोसायटीचे तीन प्रमुख उद्देश आहेत; व वेळोवेळीं त्यांत शाब्दिक फरक करण्यांत आलेला असला तरी त्यांचें मूळ कायम आहे. देश, जाति, धर्म, वर्ण, स्त्रीपुरुष वगैरे भेदांस गौण मानून अखिल मानवजातीच्या बंधुत्वाचा केंद्र निर्माण करणें हा सोसायटीचा पहिला व सर्वांत महत्त्वाचा उद्देश आहे. जगांतील नाना धर्मांचा व तत्त्वविचारांचा सहानुभूतिपूर्वक आणि तुलनेच्या दृष्टीनें

* तं स्वात् शीररात् प्रवृहेन्मुंजादिवेषिकाम् धैर्येण । कठ, ६, १७.

अभ्यास करणें हा दुसरा उद्देश आहे. आणि मनुष्याच्या अन्तर्यामीं ज्या अज्ञात शक्ति आहेत त्यांचा शोध करणें हा तिसरा हेतु आहे. ह्या सोसायटींत येणाऱ्या सभासदांस पूर्ण मतस्वातंत्र्य असतें. अमुक एका गोष्टीवर श्रद्धा ठेविली पाहिजे अशी सोसायटींत कोणावरहि जबरी नाहीं. बंधुत्वाची कल्पना ज्याला मान्य असेल अशा कोणाहि माणसाला सभासद होतां येतें, मग त्याचीं मतें कांहींहि असोत. मॅडम ब्लॅव्हॅटस्की यांनीं काढलेल्या सोसायटीचें स्वरूप हें असें होतें. सोसायटी काढण्यांत मॅडम ब्लॅव्हॅटस्की यांचा आणखीहि एक अप्रसिद्ध उद्देश होता. तो असा कीं, सोसायटींत येणाऱ्या मंडळीपैकीं जीं माणसें खरोखरी जिज्ञासू व निष्ठावान् असतील, ज्यांस तीव्र आंच लागली असेल त्यांची तयारी करून त्यांस अनुभवाचा मार्ग दाखवावा, ज्ञानी व अधिकारी ऋषितुल्य पुरुषांची आणि त्यांची अंतरंगाच्या भूमिकेवर गांठ घालून द्यावी, आणि त्या माणसांना त्यांचें शिष्यत्व मिळवून देऊन लोकसेवा करण्यास अधिक लायक करावें. डॉ. बेझंट यांना आपलें मतस्वातंत्र्य कायम ठेवून हा अनुभवाचा मार्ग चोखाळण्यास पुरेसा वाव कसा मिळाला असेल, व त्यांच्या जनसेवेच्या ध्येयासहि ही सोसायटी कशी पोषक झाली असेल तें वाचकांना वरील वर्णनावरून सहज ध्यानांत येईल. डॉ. बेझंट यांच्या पूर्वीच्या नास्तिक-वादला 'बाबा वाक्यम् प्रमाणम्' हें तत्त्व मान्य नव्हतें; आणि थिऑसफिकल सोसायटीलाहि तें मान्य नव्हतें. अर्थात् डॉ. बेझंट यांना सोसायटीमध्यें कोणतीच अडचण वाटली नाहीं. धर्मसंस्थांचें प्रायः असें असतें कीं, अमुक गोष्टीवर श्रद्धा ठेवीत असाल तरच तुमचा प्रवेश होईल असे त्यांचे नियम असतात; पण तसें थिऑसफिकल सोसायटीचें नव्हतें.

डॉ. बेझंट या थिऑसफिकल सोसायटींत आल्यानंतर त्यांना अंतर्यामीं नवीन अनुभव येऊं लागून त्यांचे विचार बदलले, मनाची बैठक स्थिर झाली, व दृष्टीला नवें वळण लागलें; पण लोकसेवा हें थिऑस-

फीचेंहि ध्येय असल्यामुळें त्यांच्या बाह्य उद्योगांत कांहीं फरक झाला नाहीं. पूर्वीचे सारे उद्योग सांभाळून अनुभवाच्या दृष्टीनें जगांतील धर्मांस उजाळा देणें, विश्वबंधुत्वावर विशेष जोर देणें व त्या दिशेनें लोकमत जागृत करणें, हीं नवीन कामें त्यांच्या अंगावर आलीं; व तीं करण्यास डॉ. बेझंट ह्या मोठ्या धैर्यानें लवकरच पुढें आल्या. त्या वेळीं डॉ. बेझंट ह्या नुकत्या चाळिशी उलटलेल्या व ऐन तारुण्यांत होत्या, तेव्हां हें नवीन काम त्यांनीं मोठ्या हौसेनें अंगावर घेतलें असेल याची शंका नको. सोसायटींत आल्यावर त्यांना अंतर्यामींची शान्तता मिळाली. राजयोगाचा त्यांचा सप्रयोग अभ्यास सारखा चालू होताच, त्याचा त्यांस फार उपयोग झाला. कारण धर्मप्रसारार्थ पुस्तकी ज्ञान लंगडें पडतें. त्याला आत्मानुभव अवश्य असतो व तो त्यांस योगाभ्यासानें अधिकाधिक प्रमाणांत मिळूं लागला. अशा रीतीनें जरी त्यांना चित्ताची शान्ति मिळत गेली असली, तरी त्यांचा बाह्य उद्योगाचा धूमधडका पूर्वीसारखाच सुरू होता. डॉ. बेझंट ह्या सोसायटींत आल्यावर थिऑसफींतहि त्यांना लवकरच पुढारीपण मिळालें. सोसायटींत आल्यावर सुमारें दोन वर्षांनीं ब्रॅडलॉ मृत्यु पावले, व मॅडम ब्लॅव्हॅटस्की यांनींहि इहलोक सोडला.* त्या दोघांच्या मृत्यूमुळें डॉ. बेझंट यांचें हृदय किती विषण्ण झालें असेल त्याची कल्पना करणें आम्ही आमच्या वाचकांवरच सोंपवितों.

---

* ब्रॅडलॉ यांच्या उत्तरक्रियेला महात्मा गांधी हजर होते. त्या वेळेस ते लंडनांमध्यें विद्यार्थी म्हणून रहात होते. ब्रॅडलॉच्या निधनापूर्वी महात्मा गांधींची व डॉ. बेझंट यांची तसेंच ब्लॅव्हॅटस्कीबाईची औपचारिकरीत्या ओळख झालेली होती. ब्लॅव्हॅटस्कीबाईचें एक पुस्तक वाचून मला हिंदुधर्मांचा अभ्यास करण्याची हौस वाटली, व ख्रिस्ती मिशनरी सांगतात त्याप्रमाणें हिंदुधर्मांत वेडगळपणा भरलेला नाहीं हें मला नंतर समजून आलें असें गांधी लिहितात. त्या वेळच्या तरुण पिढीला थिऑसफीचा कोणत्या प्रकारचा उपयोग झाला याची कल्पना वरील गोष्टीवरून येईल. (पहा, गांधीकृत 'My Experiments with Truth' पृ. १६६–१६९.)

# प्रकरण सहावें



## डॉ. बेझंट हिंदुस्थानांत येतात

मॅडम ब्लॅव्हॅटस्की व मि. ब्रॅडलॉ यांच्या निधनानंतर डॉ. बेझंट यांचें पाऊल हळूहळू हिंदुस्थानाकडे वळलें. प्रथम त्या हिंदुस्थानांत थोड्या दिवसांकरितां येत व काम संपल्यावर परत इंग्लंडमध्यें जात. पुढें त्यांनीं आपलें सारें चंबूगवाळें हिंदुस्थानांत आणिलें व या हिंद-भूमींतच त्या स्थायिकपणानें राहूं लागल्या. डॉ. बेझंट यांची जीवन-सरिता आतां समुद्रांत मिळाल्यासारखी झाली होती; आणि त्यांची दृष्टि विस्तृत होऊन त्यांच्या उद्योगास एक प्रकारचा अफाटपणा येत चालला होता. पूर्वी त्यांचे उद्योग मुख्यतः इंग्लंडमध्येंच सुरू असत. आतां सर्व जग त्यांचें कार्यक्षेत्र होऊं लागलें. इंग्लंड हें त्यांचें पूर्वाश्रमींचें घर म्हणून व हिंदुस्थान हें त्यांनीं नंतर स्वीकारलेलें घर म्हणून जरी ह्या दोन्ही देशांत त्यांचा व्याप इतर देशांपेक्षां अधिक राहिला तरी कोणत्याहि एका देशांत त्यांचें कार्य सामावूं नये, त्या कार्यास सर्व जगाची रंगभूमि अवश्य व्हावी अशी स्थिति मॅडम ब्लॅव्हॅटस्की यांच्या निधनानंतर त्यांना लवकरच आली. सर्व जगांत त्यांच्या यापुढें इतक्या उलाढाली सुरू झाल्या कीं त्यांचा नुसता नामनिर्देशहि आपणांस या पुस्तकांत करतां येणार नाहीं; आणि केला तरी आम्हां महाराष्ट्रीयांना त्याचें महत्त्व सहजच वाटणार नाहीं. तेव्हां त्यांचे सर्व जगभर चालू असलेले उद्योग थोडेफार दृष्टीआड करून ह्या चरित्रांत आपण त्यांच्या हिंदुस्थानांतील कार्याकडेसच जास्त लक्ष दिलें पाहिजे हें उघड आहे. तेव्हां आपण महाराष्ट्राच्या डोळ्यांनीं त्यांच्या उद्योगांकडे पाहूं या.

हिंदुस्थानांत डॉ. बेझंट यांनीं आजतागायत जे उद्योग केले त्या सर्वांत कांहीं व्यवस्थित योजना आहे, कांहीं एकसूत्रीपणा आहे, हें आपण ध्यानांत आणलें नाहीं तर त्या उद्योगांचें रहस्य आपल्या मनांत भरणें कठीण जाईल. निरनिराळ्या रंगांचे धागेदोरे घेऊन एखादी स्त्री रुमाल विणीत असली तर प्रारंभीं आपणाला तिच्या मनांतील योजना तिच्या हाताच्या टांक्यांवरून स्पष्ट होत नाहीं. तिच्या मनांत त्या रुमालावर एखाद्या पक्षाचें चित्र दाखवावयाचें असलें तरी प्रथमारंभींचे टांके पहाणाऱ्याला त्यांतील निरनिराळ्या रंगीबेरंगी धाग्यांवरून त्या पक्ष्याची कल्पनाहि येत नाहीं. ते टांके प्रारंभीं तुटक दिसतात, दूर दूर वाटतात. एखादा रंग दोऱ्यांनीं बहुतेक भरलेला असतो पण दुसऱ्याचा प्रारंभहि झालेला नसतो; आणि त्यामुळें तें भावी चित्र त्या माणसाच्या मनश्चक्षूला दिसत नाहीं; इतकेंच नव्हे तर ही स्त्री विचार न करतां भराभर हवे तसे वांकडेतिकडे टांके कां घालीत आहे याचेंच त्याला आश्चर्य वाटतें. पण तें सबंध चित्र पुरें झालें म्हणजे त्या स्त्रीच्या मनांतील योजना त्या प्रेक्षकाला दृग्गोचर होते, व जे टांके प्रारंभीं वेडेवांकडे व अव्यवस्थित दिसत होते त्यांचे परस्पर संबंध ध्यानांत येऊन आपल्या लक्षांत ती योजना अगोदर आली नाहीं याचें कारण आपलेंच अज्ञान होय, ही त्याची खात्री पटते. डॉ. बेझंट यांच्या हिंदुस्थानांतील उद्योगांचें असेंच झालेलें आहे. त्यांनीं जेव्हां आपले ते निरनिराळे उद्योग सुरू केले तेव्हां लोकांना त्यांच्या मनांतील योजना दिसली नाहीं व पटली नाहीं; बाई उपटसुंभासारखें कांहीं तरी करीत आहेत असेंच त्यांस त्या वेळीं वाटलें. असें होणें साहजिक आहे. पण बाईनीं हिंदुस्थानांत पाऊल ठेवल्यास आज जवळ जवळ चाळीस वर्षे होत आहेत. या काळाचें जर कोणीहि निःपक्षपाती माणूस चाणाक्ष-पणानें सिंहावलोकन करील तर त्यांनीं तेव्हां आंखलेली योजना त्याच्या

मनांत चटकन भरेल, व त्या नाना उद्योगांचा एकसूत्रीपणा पाहून बाईंच्या दृष्टीची पोहोंच किती दूरवरची होती याची त्यास कल्पना येईल. जगांत फारच थोड्या माणसांच्या उद्योगांत असली दूरदृष्टीची योजना दृष्टोत्पत्तीस येत असते.

डॉ. बेझंट यांनीं हळूहळू जे उद्योग हिंदुस्थानांत सुरू केले व ज्या वेळीं सुरू केले त्यांची त्यांनीं अगोदर आपल्या मनाशीं व्यवस्थेशीर योजना आंखली होती व तिच्या अंगोपांगांस योग्य तो वेळहि पाहिला होता असें विचारान्तीं दिसून येईल. पुष्कळ निरनिराळ्या क्षेत्रांतले उद्योग त्यांनीं एकदम सुरू ठेवलेले आहेत व होते. पण प्रस्तुत चरित्राच्या सोयीकरितां ते सर्व वेगवेगळ्या प्रकरणांत नमूद करणें अवश्य आहे. त्यांचे उद्योग नुसते कालानुक्रमानें जर आपण पाहिले आणि निरनिराळ्या क्षेत्रांत जर आपण त्यांची विल्हेवारी लाविली नाहीं तर त्यांचें धोरण आपणास समजणें कठीण जाईल. प्रस्तुत पुस्तक अगदीं छोटें आहे; व त्यांत डॉ. बेझंट यांच्या उद्योगांपैकीं फक्त ठळक ठळक उद्योगांचाच उल्लेख करणें शक्य आहे. अर्थात् उपरोक्त कारणास्तव ते उद्योग आम्ही वेगवेगळ्या प्रकरणांत संक्षिप्तरूपानें वर्णणार आहों.

डॉ. बेझंट यांच्या स्वभावांत एक अलौकिक मोहिनी आहे. कार्याबद्दल लोकांच्या मनांत हौस व उत्साह उत्पन्न करणें, आपल्या सभोंवतीं सहकारी लोक ओढून घेऊन त्यांचे निरनिराळे गट बनविणें आणि ते गट निरनिराळ्या ठिकाणीं विखरून त्यांचेकडून कार्य करून घेणें, या गोष्टींची हातोटी त्यांना उत्तम साधलेली आहे. त्यांच्या उत्साहाची ज्योत अष्टौप्रहर सारखी तेवत असते; व जीं जीं माणसें त्यांच्या संनिध जातील त्या सर्वांच्या ज्योती बाई तात्काळ पेटवूं शकतात. विजेच्या तारेभोंवतीं एक वर्तुळाकार क्षेत्र असतें व त्या क्षेत्रांत सर्व ठिकाणीं त्या विजेचा परिणाम जोरानें होत असतो असें शास्त्रज्ञ सांगतात. तद्वत् डॉ. बेझंट

यांची स्थिति असून त्यांचा धगधगीत उत्साह, त्यांची जिव्हाळ्याची कळकळ, त्यांचा प्रामाणिकपणा यांची सभोंवतालच्या माणसांवर छाप पडून तीं बाईच्या कक्षेंत ओढलीं जातात व त्यांस साहाय्यक होतात. लोकांस आपणांकडे ओढून घेण्याची त्यांची शक्ति इतकी अजब आहे, कीं जे उद्योग लोकप्रिय नाहींत, जे केल्यास लोकनिंदेचे बाण माणसास सोसावे लागतात, ते उद्योगहि करण्यास त्यांस माणसें मिळतात; व तीं माणसें तीं तीं कामें मोठ्या निष्ठेनें वर्षानुवर्ष करीतहि रहातात. माणसावर छाप पाडून त्याला कामीं लावण्याचा गुण प्रत्येक लोकनायकाला अत्यवश्य असतो. तो गुण बाईच्या अंगांत भरपूर असल्यामुळेंच त्यांना मोठमोठे उद्योग तडीस नेतां आलेले आहेत. दुसऱ्याला कार्यस्फूर्ति देणें हा जणुं त्यांचा जीवस्वभावच आहे.

थिऑसफींत शिरल्यानंतर डॉ. बेझंट यांनीं निरनिराळ्या देशांत व क्षेत्रांत जीं कार्यें केलीं आहेत तीं सर्व अध्यात्मदृष्टीनें केलीं आहेत. थिऑसफीनें त्यांच्या मनाला अध्यात्माची बैठक दिली व त्या बैठकीवरच स्वतःचें अधिष्ठान ठेवून त्यांनीं आपले सारे उद्योग चालविलेले आहेत. तिरका चालणारा उंट व अडीच घरें उडी मारणारा घोडा यांस हातीं घेऊन बुद्धिबळें खेळणारा मनुष्य आपल्या पटावर कोणत्याहि उलाढाली करीत असला व वरवर पहातां त्या उलाढाली जरी कितीहि विसंगत वाटल्या, तरी जशी त्याची दृष्टि प्रतिपक्षावर मात करण्याच्या ध्येयावर खिळलेली असते तद्वत् आपल्या उद्योगांच्या धुमश्चक्रींत बाईंनीं ' मामनुस्मर युध्य च ।' या गीतावचनावर सदा दृष्टि ठेविलेली आहे. लोकसंग्रह करणें हें त्यांच्या मतें आदर्श माणसाचें ध्येय असलें पाहिजे. गीतेंतला कर्मयोग हा त्यांच्या नसानसांत भरलेला आहे. इतर पुढारी आपले उद्योग लौकिक व जागतिक दृष्टीनें करतात, तर डॉ. बेझंट या आपले उद्योग अध्यात्मदृष्टीनें करतात, हा त्यांच्यांत फरक आहे. बाईची अध्यात्मदृष्टि सर्वव्यापी

आहे. जगाच्या हितार्थ केलेले सर्व उद्योग त्यांच्या अध्यात्मदृष्टीला वंदनीय वाटतात. धर्मसुधारणा, समाजसुधारणा, राजकारण, शिक्षण, सांपत्तिक सुधारणा वगैरे यच्चयावत् मानवी उद्योग त्यांच्या अध्याम-दृष्टीच्या कक्षेंत येत असतात. त्यांची अध्यात्मदृष्टि कोणत्या प्रकारची आहे हें थोडक्यांत स्पष्ट करणें कठीण आहे. जुनें तेवढें चांगलें म्हणावें, नवीन गोष्टींस एकजात विरोध करावा, आणि वेदान्ताच्या शुष्क गोष्टी बोलण्यांत वेळ घालवावा म्हणजे ती अध्यात्मदृष्टि होय, असें महाराष्ट्रांत पुष्कळांस वाटत असतें. कारण अध्यात्मशास्त्राचें अध्ययन करणारां-मध्यें आपणास समाजसुधारणेचा नेटानें पुरस्कार करणारा माणूस सहसा सांपडत नाहीं. डॉ. बेझंट यांची अध्यात्मदृष्टि याहून अगदीं वेगळी आहे. सर्व सृष्टीच्या मुळाशीं ईश्वराचें मन आहे, त्या मनानें सृष्टिप्रवाहाची दिशा व्यवस्थितपणानें आंखलेली आहे, अल्पज्ञ व अल्पसमर्थ मानव टप्प्याटप्प्यांनीं महाज्ञानी आदर्श-पुरुष होणार आहे, जगाची शाळा सर्व जीवांचा विकास व्हावा यासाठींच ईश्वरानें काढलेली आहे, शाळेंत जसा शिक्षणाचा व्यव-स्थित कार्यक्रम असतो तसा ईश्वरानेंहि कार्यक्रम आंखलेला आहे, निरनिराळे धर्म व निरनिराळ्या संस्कृति, राष्ट्रांचे उदय व अस्त, मानवी उद्योगाचीं निरनिराळीं क्षेत्रें हे सारे त्या कार्यक्रमाचे भाग आहेत, असें बाईंच्या अध्यात्मदृष्टीला दिसत असतें; व म्हणूनच मानवी उत्क्रान्तीचा हा नकाशा लक्षांत ठेवून ईश्वरी योजनेची परिपूर्ति करण्यासाठीं अष्टौ-प्रहर झटणें हें त्यांस माणसाचें अवश्य-कर्तव्य वाटतें. या बुद्धीनें बाई सारे उद्योग करतात. जगांतील इतर पुढाऱ्यांचे उद्योग लौकिक दृष्टीनें होत असल्यामुळें बाईंचा व त्यांचा सहजच मधूनमधून विरोध येतो. बाईंच्या अनेक उद्योगांचें सिंहावलोकन आपण या पुस्त-कांत आतां यापुढें करणार आहों. तें वर्णन वाचीत असतांना

बाईच्या ह्या अध्यात्मदृष्टीची उत्तरोत्तर यथार्थ कल्पना आमच्या वाचकांना यावी असें वाटतें.

इंग्रज-सरकारचें राज्य हिंदुस्थानांत चिरस्थायी झाल्यावर बरेच दिवसपर्यंत त्यांच्या संस्कृतीनें आम्हां हिंदवासियांचे डोळे दिपविलेले होते. इंग्रज लोक, त्यांचा धर्म, त्यांची विद्या, त्यांच्या चालीरीति या सर्व आपणांपेक्षां फार चांगल्या आहेत, व इंग्रजांचें अनुकरण करण्यांतच आपल्या देशाचा तरणोपाय आहे, अशी समजूत प्रारंभीं जनतेंत बळावली होती. हिंदी विद्या व हिंदी सुधारणा या नादान आहेत, त्या उराशीं बाळगून रहाण्यांत अर्थ नाहीं, आपण सर्व बाबतींत पाश्चात्यांचा धडा गिरविला पाहिजे असें त्या वेळच्या पुढाऱ्यांस वाटे. ह्या विचाराची लाट हिंदुस्थानांत १८८० च्या अगोदर मोठ्या जोरावर होती; पण त्यानंतर एका विचारपरिवर्तनास लवकरच सुरुवात झाली. इंग्रजांच्या सुधारणेनें दिपलेलीं माणसें व त्यांच्या अनुकरणाची वृत्ति हीं हळूहळू मागें पडूं लागलीं; व हिंदी संस्कृति चांगली आहे, आम्हां हिंदी लोकांना पाश्चात्यांच्या तोंडाकडे पहाण्याची बिलकूल जरूरी नाहीं ही तरुणांची स्वाभिमानाची वृत्ति समाजांत अधिकाधिक पसरूं लागली. महाराष्ट्रांत हें परिवर्तन विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या विद्यमानें सुरू होऊन स्वाभिमानाच्या या नवीन लाटेनें पूर्वींच्या अनुकरणवृत्तीस आपल्या पोटांत हळूहळू गडप करून टाकलें.

इ. स. १८८० पासून १९०० पर्यंतचा काळ म्हणजे या स्वाभिमानी विचारपरिवर्तनाचा काल होय. कोणत्याहि विचारपरिवर्तनाचा झंझावात जोरानें वाहूं लागला, आणि लाखों लोकांना त्या झंझावातानें घेरलें, कीं अर्थात् कोणत्याहि माणसाचें मन त्या वादळांत समतोल राहूं शकत नाहीं. १८८० च्या अगोदर स्वतःस नादान समजून पाश्चात्यांचें अंधानुकरण करण्याच्या दिशेनें वारा वहात होता, व या अंधानुकरणांत

पुष्कळांनीं पुष्कळ अतिरेक केले होते. पुढें वारा फिरल्यावर स्वाभिमानाचाहि अतिरेक होण्यास वाव सांपडला. १८८० पासून १९०० पर्यंतच्या कालांत हे भिन्न दिशेचे वारे परस्परांवर आदळून एकसारखीं वावटळें उत्पन्न करीत होते. प्रारंभीं अंधानुकरणाची लाट जोरावर होती; पण झगडा सुरू होऊन अनुकरणप्रियतेस हळूहळू मंदत्व आलें आणि शेवटीं विरुद्ध दिशेनें स्वाभिमानाचा वारा जोरजोरानें वाहूं लागला. या नवीन विचारांचे महाराष्ट्रांतील अध्वर्यु अनेक होते. लो. टिळक, विष्णुशास्त्री चिपळूणकर, प्रिन्सिपाल आगरकर, सार्वजनिककाका इतिहासाचार्य राजवाडे वगैरेंचीं नांवें त्यांत प्रमुखपणें सांगण्यासारखीं आहेत.

हा झगडा जोरावर असतांना डॉ. बेझंट या हिंदुस्थानांत कोलंबो मार्गानें येऊन १८९३ सालीं नोव्हेंबरच्या १६ व्या तारखेस त्यांनीं तुतिकोरीन येथें हिंदभूमीवर पाय ठेवला. त्या वेळीं हिंदुस्थानांत वरील प्रकारची धुमश्चक्री सर्वत्र सुरू होती. जुन्या पिढीच्या माणसांना आत्मविश्वास वाटत नव्हता; व पाश्चात्यांचें फाजील अनुकरण करण्याचें त्यांचें धोरण होतें. हीच पिढी त्या वेळीं प्रभावी होती. नव्या पिढीचीं पुष्कळ स्वाभिमानी माणसें त्या वेळीं पुढें येत होतीं, पण त्यांचा जम समाजांत अद्यापि फारसा बसला नव्हता. डॉ. बेझंट यांची मनोरचना, त्यांचें शिक्षण, त्यांचा अनुभव हीं हिंदुस्थानांतल्या तत्कालीन पुढाऱ्यांहून अगदीं भिन्न होतीं. महाराष्ट्रांतील त्या वेळच्या थोर मंडळींशीं त्यांची तुलना केल्यास हा फरक लक्षांत येणें कठीण नाहीं. माधवराव रानडे हे त्या कालचे एक सर्वमान्य पुढारी होते. पण एक अष्टपैलूपणाचा गुण सोडून दिला तर रानडे व बेझंट यांमध्यें फारसें साम्य सांपडण्याजोगें नव्हतें. रानडे सुधारक असले तरी धर्माच्या क्षेत्रांत ते भाविक व श्रद्धाळु होते. त्या दृष्टीनें पहातां डॉ. बेझंट यांचा लहानपणचा भाविकपणा व रानड्यांची श्रद्धा यांचें साम्य थोडेंफार

दाखवितां येईल. नास्तिक मताच्या भट्टींत बाईंचे विचार तावून-सुलाखून निघालेले होते; आणि त्यानंतर बुद्धीवर व अनुभवावर आधारलेली धर्मनिष्ठा त्यांच्या हृदयांत सुप्रतिष्ठित झालेली होती. या धर्मनिष्ठेंत जो जोर व जिवंतपणा आहे तो अर्थातच रानड्यांच्या भाविकपणांत येणें शक्य नव्हतें. रानड्यांचा भाविकपणा, जरी त्यांच्या स्वतःच्या चित्ताला समाधान देण्यास समर्थ असला तरी, बुद्धीचे सर्व संशय फेडण्याची त्याला कुवत नव्हती व दुसऱ्याच्या हृदयांत उत्कट धर्मबुद्धि उत्पन्न करण्याची प्रखरताहि त्यामध्यें नव्हती. टिळक--चिपळूणकर हीं माणसें राजकारणाविषयीं जितकीं आतुर होतीं तितकीं तीं धर्माविषयीं नव्हतीं. खऱ्या भाविकपणाचा विचार केला तर तो त्यांच्यांत फारसा नव्हता असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. हीं दोन्ही माणसें हिंदुधर्माबद्दल पुष्कळ अभिमान बाळगीत हें खरें; पण त्यांनीं सुरू केलेली चळवळ स्वाभिमानमूलक असल्यामुळें त्यांत आपोआप धर्माभिमानास स्थान मिळालें होतें, इतकेंच. देशाभिमानास त्या वेळीं धर्माभिमान पोषक होता; व आपले पूर्वज, आपले धर्मग्रंथ, आपली संस्कृति यांचेविषयीं स्वाभिमानी माणसाला स्वाभाविकपणेंच आपलेपणा वाटत असल्यामुळें, टिळक--चिपळूणकरांच्या मनोरचनेंत धर्माभिमान आलेला होता. लोकांमध्यें जागृति करण्याकरितां जर त्या वेळीं धर्माभिमानाचा उपयोग होण्यासारखा नसता, तर त्या दोघांनीं धर्माला वाटाण्याच्या अक्षता लावण्यास कमी केलें नसतें अशी त्यांची मनोरचना होती. पुढें गीतेचा खोल अभ्यास केल्यानें टिळकांच्या मनावर धर्माचा पगडा बसला हा भाग स्वतंत्र आहे. पण १८८० सालच्या सुमारास टिळक--चिपळूणकरांस धर्माचें असें फारसें अगत्य नव्हतें. त्या वेळच्या सर्व सुशिक्षित मंडळीवर मिल्, स्पेन्सर, हक्स्ले वगैरेंच्या मताची बरीचशी छाप बसली होती; व त्यांचीं मतें प्रत्यक्षवाद, उपयोगवाद, अज्ञेयवाद वगैरेकडे झुकत

होतीं. आगरकर-टिळक-चिपळूणकर ही त्रयी या प्रवृत्तीस अपवाद नव्हती. आगरकरांचा कटाक्ष राजकीय सुधारणेबरोबरच समाजसुधारणा करण्याचा असल्यामुळें त्यांस जेथें धर्माभिमान जाचक होऊं लागला तेथें 'चक्षुर्वै सत्यम्' या न्यायाचा आश्रय करून त्यांनीं हिंदुधर्मावर हल्ले सुरू केले हें सर्वश्रुत आहेच. टिळक-चिपळूणकरांचा भर राजकीय प्रगतीवर जास्त होता. राजकीय चळवळीस हजारों लोकांचें पाठबळ मिळणें जरूर असतें. आणि सामाजिक व धार्मिक सुधारणा बहुजनसमाजास नेहमींच अप्रिय वाटत असतात. त्यामुळें जर आपण त्या सुधारणांचा विशेष पुरस्कार केला तर आपल्या राजकीय चळवळीस समाजाचा पुरेसा पाठिंबा मिळणार नाहीं ही गोष्ट त्या दोघांसहि माहीत होती; आणि म्हणून त्या दोघांनीं आगरकरांच्या विरुद्ध धोरण ठेवून सुधारकांवर टीकास्त्र सोडण्याचा मार्ग अंगिकारला होता. खेरीज कांहीं सुधारकांची इच्छा अशी होती कीं, सरकारकडून कायदे करवून आपण सामाजिक सुधारणा अमलांत आणाव्यात. परकी सरकारला आपल्या धर्मांत हात घालूं देणें हें टिळक-चिपळूणकरांच्या स्वाभिमानी वृत्तीस रुचण्यासारखें नव्हतें. या सर्व कारणांमुळें टिळक-चिपळूणकर हे धर्माभिमानी आहेत असा जरी जनतेचा समज झाला असला तरी धर्माचा स्वतंत्र रीतीनें विचार केल्यास टिळक-आगरकर-चिपळूणकर यांचीं मतें तत्कालीन बुद्धिवान् लोकांसारखींच धर्मास फारशीं न मानणारीं व प्रत्यक्षवादाकडे झुकणारीं होतीं हें कोणीहि विसरतां कामा नये. डॉ. बेझंट यांस धर्माचें स्वतंत्रदृष्ट्या पुष्कळ महत्त्व वाटत होतें. हा वरील त्रयीमध्यें व त्यांच्यामध्यें एक मोठा फरक होता. चिकित्सक बुद्धि हुषार माणसाला पाखंडी करीत असते. ही त्रयी मनानें त्या पाखंडी वृत्तींत त्या वेळीं होती; व डॉ. बेझंट ह्या त्या पाखंडी वृत्तीच्या कोषांतून अगोदरच सुबुद्धपणें बाहेर पडल्या होत्या. दुसरा फरक असा कीं,

वरील त्रयीला जरी धर्माचें अगत्य असलें तरी तें फक्त हिंदुधर्माचेंच असणें शक्य होतें, व त्यांची दृष्टि फक्त हिंदुस्थानापुरतीच होती. उलट पक्षीं डॉ. बेझंट यांनीं सर्व धर्मांचा तुलनात्मक वृत्तीनें व त्या सर्वांबद्दल आदर बाळगून अभ्यास केला होता; त्यांची दृष्टि कोणत्याहि एका देशास चिकटलेली नसून जागतिक झालेली होती.

डॉ. बेझंट यांचें नांव अगोदरच सर्व जगभर दुमदुमलेलें असल्यामुळें त्या जेव्हां येथें आल्या तेव्हां त्यांचें हिंदुस्थानांत अपूर्व स्वागत झालें. जसा एखाद्या महाराज्ञीचा दौरा निघावा तसा त्यांचा दौरा निघून सर्व लोकांनीं त्यांचा सर्वत्र जयजयकार केला. त्यांचें पहिलें व्याख्यान तिनिवेल्ली येथें झालें. त्यांनीं जो हिंदुस्थानांत आपल्या व्याख्यानांचा पहिला दौरा काढला होता त्यांत त्यांनीं सुमारें सहा हजार मैल प्रवास केला. हिंदुस्थानांतल्या मोठमोठ्या बहुतेक सर्व शहरांत व्याख्यानें दिलीं आणि थिऑसफिकल सोसायटीच्या वार्षिक परिषदेला हजर राहून चार महिन्यांत आपला दौरा आटपून बाई १८९४ सालच्या मार्च महिन्यांत मुंबईहून लंडनला रवाना झाल्या. ह्या दौऱ्यांत त्यांनीं पुष्कळ खासगी व्याख्यानें व मुलाखती दिल्या, आणि सुमारें १२० सार्वजनिक व्याख्यानें दिलीं. जे मिशनरी लोक हिंदुधर्माचे इतकीं वर्षें सारखे वाभाडे काढीत होते त्यांच्याच देशच्या एका जगप्रसिद्ध गौरकाय स्त्रीनें हिंदुधर्मास उचलून धरावें, ह्याचें हिंदु लोकांस फारच मोठें कौतुक वाटावें व बाईच्या अलौकिक वक्तृत्वानें त्यांचीं मनें मोहून जावीं हें साहजिकच आहे. गौरकाय लोकांची अवास्तव स्तुति करणें हा पुणेकरांचा धर्म नाहीं व केसरीपत्राचा तर नाहींच नाहीं. असें असूनहि त्या वेळीं डॉ. बेझंट यांचें विस्तृत चरित्र * केसरीनें छापण्यास सुरवात केली; आणि कित्येक आठवडे तें क्रमशः प्रसिद्ध करून 'वृत्तंहि महतां सताम्' या कवि-

* हें चरित्र २०-३-९४ च्या केसरींत समाप्त झालेलें आहे.

वचनानें त्याचा समारोप केला. परकीय लोकांचीं चित्रें हिंदुस्थानांत लोकप्रिय करण्याचा उद्योग चित्रशाळा प्रेस करील असें कोणीहि म्हणणार नाहीं; पण चित्रशाळेनें बाईचें चित्र तयार करून विक्रीस ठेविलें, व ' असल्या अपूर्व बाईचा फोटो प्रत्येकानें आपल्यापाशीं अवश्य ठेवावा ' अशी केसरीनें त्या फोटोची शिफारस केली.* मिशनरी लोकांनीं या वेळीं बाईस जोराचा विरोध केला होता असें दिसतें. कारण केसरीकडे मिशनरी लोकांची डाळ शिजण्याचा फारसा संभव नसतांहि हिंदुस्थानांतल्या मिशनऱ्यांनीं बाईच्या उद्योगास हाणून पाडण्यासाठीं कांहीं पुस्तकें छापून केसरीकडे पाठवून दिलीं होतीं; पण त्यांचा परिणाम केसरीवर बिलकूल न होतां ' अशा विदुषीनें जो पंथ आज वीस वर्षें विचार करून स्वीकारला आहे, त्या पंथाचे प्रवर्तक सर्व मूर्ख असतील असें स्वतः समजणें किंवा लोकांची समजूत करून देणें हे दोन्हीहि प्रकार अत्यंत गर्ह्य होत ' असें केसरीनें आपलें मत दिलें. परकीयांची स्तुति करण्याबाबत जे नेहमींच फार सावधगिरी बाळगतात त्यांनीं जर बाईंचा इतका गौरव केला, तर इतरांच्या स्तुतीचा पारा किती तरी वर गेला असला पाहिजे हें न सांगतांहि समजण्यासारखें आहे.

धर्मजागृति करण्याचा डॉ. बेझंट यांचा हा उद्योग तेव्हांपासून आजपर्यंत चालू आहे. नुसत्या हिंदुस्थानांतच नव्हे तर पृथ्वीवरील सर्व देशांत तो चालू आहे. त्यासाठीं त्यांनीं पुष्कळ प्रवास केला आहे, पुष्कळ पुस्तकें लिहिलीं आहेत, पुष्कळ व्याख्यानेंहि दिलीं आहेत. त्या उद्योगाचें सविस्तर वर्णन देणें प्रस्तुत पुस्तकाच्या आटोक्याबाहेर आहे. तेव्हां त्या कार्याशीं अनुस्यूत असलेल्या कांहीं गोष्टी नमूद करून हें प्रकरण आटोपतें घेणें भाग आहे.

---

* २७-३-९४ चा केसरी पहा.

ज्या राष्ट्राला स्वाभिमान नाहीं, त्याच्या हातून कोणतेंच कार्य होणें नाहीं हें ओळखून बाईंनीं आपल्या हिंदुस्थानांतील धर्मकार्यांत जनतेचा धर्माभिमान जागृत करण्याचें धोरण ठेवलेलें होतें. धर्म म्हणजे समाजाच्या चालीरीति व विधिसंस्कार होत असें जनतेस वाटतें. पण धर्म म्हणजे मानवी हृदयाचा ईश्वरविषयक शोध होय, अशी बाईंची धर्माविषयींची कल्पना आहे. त्यामुळें धर्म म्हणजे उदात्त ध्येयांची, श्रेष्ठ आचारविचारांची, उच्चतम कर्तव्यांची खाण होय असें त्यांस सहजच वाटतें. अर्थात् धर्माला केरांत टाकून समाजाचें चालवयाचें नाहीं, धर्म दृष्टीआड झाला तर जनता जडवादी होऊन विषयसुखांच्या पलीकडे तिला कशाचेंच महत्त्व वाटणार नाहीं, असें त्यांचें म्हणणें आहे. म्हणूनच त्यांनीं हिंदुस्थानांत प्रथमारंभीं धर्माच्या पुनरुज्जीवनाचा उद्योग हातीं घेतला. जुन्या चालीरीतींचा पोकळ अभिमान म्हणून जसे पुराणप्रिय लोक धर्माचे देव्हारे माजवितात, आणि मन संकुचित असल्यामुळें सर्व नवीन गोष्टींना विरोध करतात तशी डॉ. बेझंट यांची वृत्ति बिलकुल नव्हती व नाहीं. धर्म हा ध्येयांचा जनक असतो, अशा बुद्धीनें त्यांनीं हिंदुस्थानांत धर्मविषयक जागृति केली. धर्माविषयीं स्वाभिमान उत्पन्न झाला कीं त्या धर्मबुद्धीकडून नंतर निरनिराळीं कार्यें समाजांत चालू करतां येतील असा त्यांचा कयास होता. आपल्या भावी उद्योगाचा पाया म्हणून त्यांनीं प्रथम धर्मकार्य हातीं घेतलें. इंग्लड जर्मनी वगैरे देशांची भिकार नक्कल हिंदुस्थानानें करावी, पाश्चात्यांचें अंधानुकरण हिंदी समाजानें करून तेथल्या भानगडी हिंदुस्थानांत ओढून आणाव्या, हें त्यांचें ध्येय तेव्हां नव्हतें व आजहि नाहीं. म्हणून त्या हिंदुस्थानवासियांस सांगत कीं पाश्चात्य संस्कृतींत पुष्कळ दोष आहेत, डोळे मिटून नक्कल करण्यासारखी ती तुम्हांस दुरून दिसत असली तरी खरोखरी तशी नाहीं, योग्य

त्या गोष्टी परक्यांपासून विवेकानें घेणें व तुमच्या संस्कृतींतील चांगल्या गोष्टी जिवंत ठेवणें हेंच तुम्हांस उचित आहे.

व्यक्तिशः डॉ. बेझंट यांचा ओढा हिंदुधर्माकडे विशेष आहे; पण त्यांनीं पृथ्वीवरील सर्व धर्मांचा खोल अभ्यास केलेला आहे. मूळ पाहिल्यास पृथ्वीवरील सर्वच धर्म खरे आहेत, व ते खरे असल्यामुळेंच सर्व धर्मांत साम्य आलें आहे, असें त्याचें म्हणणें आहे. श्रीकृष्णांना पूर्वजन्माची आठवण होती म्हणून गीतेंत पुनर्जन्मवाद आला, गौतमबुद्धांनाहि पूर्वजन्माची आठवण होती म्हणून बौद्धधर्मांतहि पुनर्जन्मवाद आला; अर्थात हें साम्य ज्ञानमूलक आहे. सर्व धर्मांत मुद्दयाच्या गोष्टींबद्दल असेंच सादृश्य आढळतें. त्या साम्याला त्या त्या धर्मसंस्थापकांच्या अनुभवाचा आधार असतो आणि म्हणूनच सर्व धर्म खरे आहेत, असें बाईंचें म्हणणें आहे. धर्माधर्मांत जे विरोध दिसतात ते वरवरचे असतात, अज्ञ लोकांनीं नंतर घुसडलेल्या गोष्टींमुळें ते उत्पन्न झालेले असतात, अथवा स्थलपरत्वें वा कालपरत्वें ज्या चालीरीति बदलत असतात त्यामुळें ते धर्मांत शिरतात, किंवा एखाद्या धर्मानें एखाद्या मुद्दयावर कांहीं कारणासाठीं विशेष जोर दिल्यामुळें ते विरोध भासतात; अर्थात त्यांस महत्त्व देणें वाजवी नाहीं असा डॉ. बेझंट यांचा उपदेश असतो. जर प्रत्येक धर्म मुळांत ज्ञानमूलक असेल तर प्रत्येकानें आपल्या धर्माचा चांगला अभ्यास करून इतर धर्मांकडे सहानुभूतीनें पहाण्यास शिकलें पाहिजे, एक धर्म सोडून दुसऱ्यांत जाण्यांत अर्थ नाहीं, असा त्यांच्या शिकवणीचा अर्थ आहे. सर्व धर्म अनुभवावर आधारलेले असले तरी प्रत्येक धर्माची मांडणी वेगळी असते. कांहीं गोष्टींवर विशेष जोर द्यावा, कांहीं गोष्टी थोड्या मागें ठेवाव्या, कांहीं गोष्टींस विशिष्ट वळण देऊन त्यांची विशिष्ट प्रकारची मांडणी करावी असें प्रत्येक धर्माचें धोरण असतें. ज्या संस्कृतीसाठीं किंवा ज्या देशांत जो धर्म चालू असेल

त्या संस्कृतीस किंवा त्या देशाच्या भवितव्यतेस अनुरूप असें त्यांतल्या धर्माचें वळण असतें; व त्या निरानिराळ्या वळणांचा मानवी समाजाला उपयोग असतो. जोंवर जगांत निरनिराळ्या व्यक्ति आहेत, निरनिराळ्या संस्कृति आहेत, जनसमूहांच्या गरजा व ध्येयें निरनिराळीं आहेत तोंवर जगांत निरानिराळे धर्म असणें उचित व आवश्यक आहे. ते सर्व धर्म मोडून टाकून एक नवा धर्म निर्माण केला तर तो नाना प्रकारच्या माणसांना उपयोगी पडूं शकणार नाहीं. यासाठीं जगांत धर्म-वैचित्र्य ठेवणें जरूर आहे. पण जगांतील निरनिराळे धर्म हे एकाच उगमापासून निघालेले आहेत, एकाच ज्ञानवृक्षाच्या त्या निरनिराळ्या दिशांस जाणाऱ्या शाखा आहेत, हेंहि जगांतील लोकांनीं ओळखलें पाहिजे; ते तें न ओळखतील तर निरनिराळ्या धर्मांत सतत भांडणें उत्पन्न होत राहतील; आणि मानव जातीच्या इतिहासपटावर सारखा रक्ताचा सडा पडत राहील; हा डॉ. बेझंट यांचा जगांतील सर्व धर्मांच्या अनुयायांस संदेश आहे व तो त्यांनीं सर्व जगभर सर्व लोकांस पुनः पुनः इतक्या कुशलतेनें सांगितला आहे, कीं हिंदु लोकांस त्यांचीं मतें हिंदु धर्मासारखीं वाटतात, बौद्धांस बुद्ध धर्मासारखीं, पारशांस झरथुष्ट्री धर्मासारखीं व मुसलमानांस इस्लामी धर्मासारखीं वाटतात. हिंदुस्थानांत हे व इतर सर्व धर्म एकत्र आले असून त्यांचा सलोखा करणें भावी हिंदुस्थानाला अत्यवश्य आहे. तो सलोखा अन्य कोणत्याहि मार्गानें होणें नाहीं, असें डॉ. बेझंट यांचें स्पष्ट सांगणें आहे.

---

# प्रकरण सातवें

++∞·*·∞++

## धर्मप्रसाराचें कार्य

डॉ. बेझंट यांनीं हिंदुस्थानांत आल्यानंतर जी धर्मविषयक कामगिरी केली तिचें कांहीं दिग्दर्शन मागील प्रकरणांत झालें आहे. या प्रकरणांत त्या कामगिरीचीं दुसरीं अनेक अंगें नमूद करून तो भाग आम्ही पुरा करणार आहों. बाई हिंदुस्थानांत जेव्हां प्रथम आल्या तेव्हां त्यांचें येथें अपूर्व स्वागत झालें हें गेल्या प्रकरणांत आम्ही सांगितलेंच आहे. पण त्यावरून बाईस हिंदुस्थानांत कोणाचाहि विरोध नव्हता, असें वाचकांनीं समजूं नये. त्यांस तेव्हांपासून आजतागायत अनेकांनीं निरनिराळ्या बाजूंनीं विरोध केला आहे. ही बाई प्राच्य धर्मास उचलून धरते व त्यामुळें हिंदु लोकांत जागृति होऊन हिंदूंस ख्रिस्ती धर्मांत ओढण्याच्या आपल्या मार्गांत डॉ. बेझंट ही मोठीच धोंड आहे हें ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या ध्यानांत लवकरच आलें; व त्यांनीं बाईंना जो विरोध १८९३ सालीं सुरू केला तो अद्याप कायम आहे. हिंदुस्थानांत जडवादी मताचे सुशिक्षित व बुद्धिमान लोक पूर्वीं अनेक होते व आजहि पुष्कळ आहेत. धर्म म्हणजे सर्व झूट आहे, धर्म म्हणजे आंधळेपणा व बावळटपणा होय असें या मंडळींचें म्हणणें असतें. त्या पक्षांतलीं थोडीशीं माणसें आपले विचार सडेतोडपणानें बोलून दाखवितात; पण बरींचशीं माणसें मनचे विचार मनांतच ठेवणारीं असतात. बाईंनीं हिंदुस्थानांतल्या लोकांस बावळट व खुळसट बनविण्याचा उद्योग केला आहे असा त्यांचा बाईंवर आरोप होता व आहे. असला आरोप करणारीं माणसें वाटतात तितकीं थोडीं नाहींत, हें लक्षांत आणणें जरूर आहे. हिंदुस्थानांत

अशी पुष्कळ लोकसंख्या आहे, कीं ज्यांची धर्मश्रद्धा रूढीच्या चाकरींतून कधींच बाहेर पडत नाहीं. त्यांनाहि बाईंच्या कार्याबद्दल विरोध वाटत असतो. ‘बाई तुम्हांला फसवून ख्रिस्ती करतील’ असा स्पष्ट इशारा पूर्वी ही मंडळी लोकांना देत. आतां ते जरी प्राय: तसें म्हणत नसले तरी त्यांच्या कार्याकडे पाहून नाक मुरडण्यास ते कमी करीत नाहींत. हिंदुस्थानांतील लोकांचें लक्ष राजकारणावरून उडावें यासाठीं त्या धार्मिक चळवळ करीत आहेत, असें म्हणणारा एक मोठा पक्ष त्यांच्या विरोधकांत एके वेळीं होता. १९१४ सालीं बाईंनीं हिंदी स्वराज्याची चळवळ सुरू केल्यानंतर असली भाषा बोलणारे लोक पुष्कळच कमी झाले आहेत. पण त्या विरोधांत श्लेष काढून ‘बाई आयत्या वेळीं आपल्या जातीवर जातील’ असें म्हणणारा वर्ग अद्याप अनेक ठिकाणीं सांपडतो. याखेरीज बाईंस हिंदुस्थानांतल्या गोऱ्या अंमलदार लोकांचा मनांतून फारच मोठा विरोध आहे. आपल्याच जातीच्या माणसानें शत्रूस जाऊन मिळावें, या पापाबद्दल ते बाईंना कधींहि क्षमा करीत नाहींत. या विल्हेवारीवरून बाईंचे विरोधक किती व कोण आहेत आणि त्यांच्या विरोधाची मीमांसा काय आहे याची कल्पना आमच्या वाचकांना सहज करतां येईल.

डॉ. बेझंट यांनीं गेलीं चाळीस वर्षें जें धर्मकार्य एकसारखें चालविलें आहे, त्याला लोक ‘थिऑसफी’ म्हणतात. बाई प्रथम हिंदुस्थानांत ज्या आल्या त्या थिऑसफिस्ट म्हणूनच आल्या. खरोखरी थिऑसफी या शब्दानें व्यक्त होणारें धर्मकार्य व इतर धर्मकार्य यांत तादृश फरक नाहीं. ‘थिऑसफी’ हा धर्म नाहीं. आपल्या धर्मांत राहून व त्यावरील निष्ठा कायम ठेवून कोणीहि माणूस थिऑसफींत येऊं शकतो. थिऑसफी हा पंथहि नाहीं; कारण तिचे वेगळे असे विधि-संस्कार नाहींत व अमुक एक मत ग्राह्य मानलेंच पाहिजे असा

तींत नियम नाहीं. ‘ थिऑसफी ’ ही एक दृष्टि व मांडणी आहे. धर्माकडे पहाण्याचा तसेंच इतर सर्व गोष्टींकडे पहाण्याचा तो एक विशेष दृष्टिकोण आहे. थिऑसफीला ‘ अध्यात्मदृष्टि ’ असें नांव दिलें तर शोभेल. पण सामान्य जनतेला थिऑसफी म्हणजे काय हें बिलकूल समजलेलें नाहीं. जुन्या शब्दांनीं, जुने आधार घेऊन व जुन्या रीतीनें धार्मिक चळवळ केली, तर लोक तिला ‘ थिऑसफी ’ म्हणत नाहींत. पण धर्मास उजाळा देण्यासाठीं नवीन तऱ्हेचें विवेचन केलें, नवीन पुरावा दाखविला, ब्लॅव्हॅटस्की बाईसारख्यांचा अनुभव दाखल करून नवीन माहिती सांगितली, कीं लोक प्रायः त्याला थिऑसफी म्हणतात. उभ्यानें बोललें म्हणजे लोक ‘ व्याख्यान ’ म्हणतात, आणि बसून बोललें कीं ‘ प्रवचन ’ म्हणतात तशांतला हा विचित्र प्रकार आहे. पण अस्तित्वांत आहे हें खास. तेव्हां लोक ज्या उद्योगावर ‘ थिऑसफी ’ असा शिक्का मारतात त्याविषयींची डॉ. बेझंट यांची कामगिरी या पुस्तकांत नमूद करणें अवश्य असल्यामुळें ती येथेंच सांगितलेली बरी.

धर्म म्हणजे नुसता कविकल्पनेचा खेळ नाहीं, धर्माच्या क्षेत्रांत माणसाला स्वतःचा असा अनुभव मिळूं शकतो, हें मॅडम ब्लॅव्हॅट्स्की यांनीं डॉ. बेझंट यांना सांगितलें व त्या अनुभवाच्या प्राप्त्यर्थ डॉ. बेझंट ह्या थिऑसफींत शिरून ब्लॅव्हॅट्स्की बाईंच्या शिष्य झाल्या, हा कथाभाग आम्ही पूर्वीच वर्णिला आहे. थिऑसफिकल सोसायटींत आल्यावर मॅडम ब्लॅव्हॅट्स्की यांनीं डॉ. बेझंट यांना पद्धतशीर रीतीनें राजयोगाच्या क्रिया शिकविण्याची सुरवात केली. मॅडम ब्लॅव्हॅट्स्की यांचा स्वतःचा तिबेटांत रहाणाऱ्या दोन जीवन्मुक्त पुरुषांशीं बराच परिचय होता; व त्यांपैकीं एका ऋषितुल्य पुरुषाला त्या स्वतःचे गुरु मानीत असत. त्यांचेपासून ब्लॅव्हॅट्स्की बाईंनीं स्वतः योगज्ञान मिळविलेलें होतें. तें ज्ञान त्यांनीं डॉ. बेझंट यांना शिकविलें. अर्थातच त्यांस यमनि-

यम पाळावे लागले, देहशुद्ध्यर्थ पूर्णपणें वनस्पत्याहारी बनावें लागलें, आणि ध्यानधारणादि क्रिया शिकून त्यांत तरबेज व्हावें लागलें. एखाद्या नळाची खालच्या मजल्यावरील तोटी सोडली तर वरच्या मजल्यावर पाणी चढत नाहीं, पण खालची तोटी बंद केली कीं लगेच पाणी वरच्या मजल्याच्या तोटीशीं येतें; तद्वत् मानवी जाणिवेची स्थिति आहे. ती जाणीव बहिर्मुख करून जगांतल्या व्यवहारांत वाहूं दिली नाहीं, उलट ती अंतर्मुख करून जगांत वहाण्याचें प्रयत्नत: बंद केलें, तर ती त्या वेळीं अंतरंगांतल्या निरनिराळ्या भूमिकांवर चढूं शकते असा अनुभव आहे. ती तशी चढली कीं क्रमानें मन उच्च उच्च अशा अवस्थांत जातें, आंतल्या नवीन शक्ति जागृत होतात व जी सृष्टी इंद्रियातीत आहे ती त्याला प्रत्यक्ष पहातां येते. ध्यानादि क्रियांमध्यें आपण बहिर्मुख वृत्ति बंद करीत असल्यामुळें, जर आपली इतर बाबतींतली तयारी परिपूर्ण झालेली असेल तर ध्यान शिकून माणसाला अदृश्य सृष्टि दृश्य करून घेतां येते. डॉ. बेझंट यांनीं आपले इतर उद्योग सांभाळून या दिशेनें अनेक वर्षें नेटाचा प्रयत्न केल्यामुळें अंतरंगांतल्या निरनिराळ्या भूमिकांवर त्यांना आपली जाणीव नेतां आली; व त्या जाणिवेचा संबंध ज्ञानी जीवन्मुक्त पुरुषांच्या जाणिवेशीं त्या जोडूं शकल्या. या उद्योगांत त्यांना उत्कृष्ट प्रतीचें यश उत्तरोत्तर मिळत गेलें, आणि त्यामुळें जुन्या ग्रंथांत ज्या गोष्टी सविस्तर नमूद केलेल्या नाहींत, त्या प्रत्यक्ष पाहून त्यांचेविषयीं माहिती मिळविण्याचा अधिकार त्यांच्या अंगीं आला. जगांतील आजचे बहुतेक सर्व धर्मगुरु ग्रंथोपजीवी असतात. जीव, त्याचे कोष, त्याची परलोकीं गति, पुनर्जन्म, सूक्ष्मसृष्टी, कर्मप्रक्रिया, मानवी विकास, धर्मसंस्कार, वगैरे अनेक गोष्टींचा खुलासा ते प्राचीन धर्मग्रंथावरूनच करतात. जी माहिती धर्मग्रंथांत दिलेली नाहीं, ज्या प्रश्नांचीं उत्तरें

त्यांत सांपडत नाहींत, त्याविषयीं ह्या धर्मगुरूंना तार्किक चर्चेपलीकडे कांहीं सांगतां येत नाहीं. पण डॉ. बेझंट यांची स्थिति तशी नाहीं. जशी एखाद्या माणसापाशीं दुर्बिण असावी तद्वत् हे अदृश्य प्रकार दृग्गोचर करणारी जणूं एक अलौकिक शक्ति त्यांनीं स्वतःला प्राप्त करून घेतली आहे; आणि त्यामुळें त्यांना आजच्या काळास पटेल अशी धर्माची मांडणी करतां येऊन पुष्कळ नवीन माहिती जगासमोर ठेवतां आली आहे. थिऑसफीचा जर कांहीं विशेष असला तर तो हा आहे.*

थिऑसफीचा जगभर प्रसार करून जगांतील सर्व धर्मांस जिल्हई देणें, जीवनविषयक भानगडींवर प्रकाश पाडून त्या माणसास समजेशा करणें, या प्रचारकार्यासाठीं डॉ. बेझंट यांनीं सर्व जगभर इतका प्रवास केला आहे कीं, त्याचा आढावा पाहिल्यास माणसाची छाती दडपून जाईल. १८९१ सालापासून फारसा खंड न पडतां त्यांचा प्रवास आजवर चालू आहे. जेव्हां त्या इंग्लडांत जास्त दिवस असतात तेव्हां तेथें प्रचारकार्याचे दौरे काढतात; जेव्हां हिंदुस्थानांत असतात तेव्हां हिंदुस्थानांत दौरे काढतात. दर दोन वर्षांनीं लंडनच्या क्वीन्स

---

* बिपिनचंद्र पाल यांनीं डॉ. बेझंट यांचें एक चरित्र लिहिलें आहे. त्यांत ( पृ. १४ व १५ पहा ) ते लिहितात कीं, 'बाई व्याख्यान देतांना आवेशानें बोलूं लागल्या म्हणजे मला त्यांच्या चेहेऱ्याभोंवती एक तेजोवलय दिसतें; वक्तृत्व, हावभाव या गोष्टी शिकून येण्यासारख्या आहेत; पण हें मला दिसणारें तेजोवलय कृत्रिम शिक्षणानें उत्पन्न करतां येण्याजोगें नाहीं, बिपिनचंद्र पाल यांस स्वभावतःच किंचिन्मात्र सूक्ष्मदृष्टि असावी असें आम्हांस वाटतें; एरव्हीं हें तेजोवलय त्यांस प्रत्यक्ष दिसण्याचा संभव नाहीं. ह्या तेजोवलयाचा अर्थ काय याविषयीं निरनिराळीं मतें असूं शकतील. पण थिऑसफिस्ट नसलेल्या व बाईंच्या अनेक मतांस विरोधी असलेल्या पालबाबूंस तें दिसे ही गोष्ट महत्त्वाची आहे. बाईंच्या अंतरंगांत कांहीं एका प्रकारचा विकास झाला असल्याचें तें गमक असूं शकेल.

हॉलमध्यें कोणता तरी विशेष महत्त्वाचा विषय घेऊन त्यावर चारपांच व्याख्यानांची माला गुंफण्याचा त्यांचा सामान्यतः परिपाठ असतो. थिऑसफीचा जो वार्षिक समारंभ भरतो त्याला थिऑसफिकल कन्व्हेन्शन म्हणतात; व त्या अधिवेशनाला महत्त्वाच्या विषयांवर दरवर्षी चारपांच उत्कृष्ट व्याख्यानें करविण्याची रीत आहे. इ. स. १८९३ पासून १९२५ पर्यंतचा काल उदाहरणादाखल घेतला तर त्या तेहेतीस अधिवेशनांपैकीं बावीस वेळचीं सारीं व्याख्यानें बाईंचीं झालीं, पांच वेळां कांहीं इतरांचीं व कांहीं त्यांचीं अशीं झालीं; व सहा वेळां काय तीं दुसऱ्या वक्त्यांचीं झालीं असा हिशेब सांगतां येईल. थिऑससफीच्या इतर सभा व संमेलनें सर्व जगभर पुनः पुनः भरत असतात, आणि त्यांपैकीं किती तरी वेळां व्याख्यानें देण्यास बाई हजर असतात. १८९३ सालच्या मे महिन्यांत बाई हॉलंडमध्यें होत्या; सप्टेंबरांत शिकागो येथील धर्माच्या पार्लमेंटसाठीं अमेरिकेंत गेल्या; (तेथील भाषणामुळें स्वामी विवेकानंद प्रथम प्रसिद्धीस आले हें सर्वश्रुत आहे.) परत त्या विलायतेस आल्या व आक्टोबरांत तेथून निघून प्रथम सीलोनला दाखल झाल्या; पुढें हिंदुस्थानांत व्याख्यानांचा चार साडेचार महिन्यांचा त्यांनीं दौरा काढला; नंतर लगेच १८९४ च्या मार्च महिन्यांत त्या पुनः विलायतेस गेल्या, आणि पुनः दोनचार महिन्यांनीं आस्ट्रेलिया व न्यूझीलंड येथें रवाना झाल्या. अशा प्रकारचे सततचे त्यांचे प्रचंड दौरे आपण पाहिले म्हणजे नवखंड पृथ्वी हें त्यांच्या उद्योगाचें क्षेत्र कसें झालें याची कांहीं कल्पना आमच्या वाचकांना येईल. जगांतले नाना देश त्यांना मुंबई-पुण्याइतके जवळ झाले आहेत. असल्या प्रवासामुळें आणि योग्यता अष्टपैलू असल्यामुळें बाई नाना देशच्या व नाना धर्मांच्या लोकांस कार्यस्फूर्ति देऊन आपल्या विचारांची छाप सर्व जगावर पाडूं शकतात. मधलींच दोनतीन उदाहरणें घेतों.

त्यावरून बाईच्या उद्योगाची कांहीं कल्पना येईल. १९०८ मधला बाईचा हिंदुस्थानांतला दौरा सुमारें सहा हजार मैलांचा होता. १८९३ सालीं त्यांनीं आस्ट्रेलियाच्या बाजूस कित्येक देशांत दौरा काढला होता त्यांत त्यांनीं १७६३० मैल प्रवास केला, चव्वेचाळीस दिवस व रात्री प्रवासांत घालविल्या, बासष्ट दिवस आपलें प्रचारकार्य केलें आणि त्यांत चव्वेचाळीस जाहीर व्याख्यानें, नव्वद सभा, आणि पुष्कळ खासगी मुलाखती वगैरे कार्यक्रम पार पाडला. १९०९ सालीं त्यांनीं संयुक्त संस्थानांत १०६२९ मैलांचा दौरा काढला होता. त्यांत त्यांचें सुमारें दोन महिने गेले, तेहतीस शहरांस त्यांनीं भेट दिली, व अठ्ठेचाळीस जाहीर व्याख्यानें देऊन चौपन्न दुसऱ्या सभा घेतल्या. या वर्षीं आरंभीं त्या हिंदुस्थानांत हिंडत होत्या; एप्रिल महिन्यांत त्या हिंदुस्थानाबाहेर जाऊन नवंबरांत परत आल्या, व हा एकंदर प्रवास ३७१७० मैलांचा झाला. त्या सबंध वर्षांतला त्यांचा एकंदर प्रवास सुमारें ४५००० मैलांचा म्हणजे जवळ जवळ दोन पृथ्वीप्रदक्षणांइतका होतो. अगदीं अलीकडेहि, म्हणजे वयास ऐंशीं वर्षे झालीं असतांनाहि त्यांनीं असे प्रचंड दौरे काढलेले आहेत. कधीं त्यांना अनेक देशांत जाण्यास दुसऱ्या उद्योगांमुळें सवड झाली नाहीं तरी त्या असतील त्या देशांत (प्रायः हिंदुस्थानांत) बराच प्रवास करितात!

धर्मप्रसारार्थ व्याख्यानांच्या बरोबरीनें त्यांनीं लेखनकार्य केलेलें आहे. त्यांच्या एका चरित्रकारानें असें लिहिलें आहे कीं, १८९५ पासून १९०७ पर्यंतचा बारा वर्षांचा अवधि हिशेबांत घेतला तर बाईनीं त्या कालांत लहानमोठीं पाऊणशें बुकें लिहिलेलीं सांपडतात.* धर्मगुरु म्हणून डॉ. बेझंट यांची व आपल्या इकडच्या कांहीं पुढाऱ्यांची

* पहाः जॉफ्रे वेस्ट कृत बाईचें चरित्र, पृ. १८७.

तुलना केली तर बाईंच्या कामगिरीचें मर्म समजण्यास आमच्या वाचकांस सोपें जाईल; तेव्हां ती करून पाहूं या. महाराष्ट्रांत धर्माच्या क्षेत्रांत गेल्या पन्नास-पाऊणशें वर्षांत जीं माणसें होऊन गेलीं त्यांपैकीं फारच थोड्यांची छाप सुशिक्षित समाजावर पडलेली आहे. वांईचे भाऊशास्त्री लेले किंवा शंकराचार्यांच्या गादीवरील शंकराचार्य यांस धर्मगुरु म्हणतां येईल. पण नवीन काळांतील समाजाच्या गरजा न ओळखतां शब्दप्रामाण्यास नुसतें चिकटून रहाण्याची त्या सर्वांची जोराची प्रवृत्ति असल्यामुळें धर्माची नवीन मांडणी करूं इच्छिणाऱ्या डॉ. बेझंटशीं त्यांचें बिलकुल सादृश्य नाहीं; अर्थात् त्यांच्यामध्यें तुलनाच शक्य नाहीं. डॉ. कुर्तकोटी शंकराचार्य आजचा काळ ओळखणारे आहेत आणि त्यामुळेंच सुशिक्षित समाजाला प्रिय झाले आहेत. पण हिंदुधर्माकडे पहाण्याची त्यांची कांहीं विशेष दृष्टि आहे किंवा अमुक एक तऱ्हेची नवीन मांडणी ते करतात असें मुळींच नाहीं; आणि म्हणून त्यांचेमध्यें व डॉ. बेझंट यांचेमध्यें तुलना करणें निरुपयोगी होणार आहे. लोकमान्य टिळकांचा पेशा धर्मगुरूचा नव्हता, पण गीतारहस्यकार म्हणून धर्माच्या क्षेत्रांत गीतेंतील तत्त्वज्ञानाच्या एका बाजूची नवीन मांडणी त्यांनीं केली आहे आणि ती मांडणी आणि डॉ. बेझंट यांची मांडणी ह्या त्या बाबतींत परस्पर सदृश आहेत हें नमूद करण्यास आम्हांस आनंद वाटतो. 'मुक्ति' ही मनुष्याची सर्वांगपरिपूर्ण आदर्श स्थिति आहे; त्या स्थितींत त्यानें लोकसंग्रह करावा, जगाची प्रगति करण्याचा खटाटोप करावा ही गीतेची शिकवण आहे, असें लोकमान्य प्रतिपादतात. डॉ. बेझंट याहि तसेंच म्हणतात. ही गोष्ट इतकी उघड आहे कीं बाईंच्या बोलण्यांत व लिहिण्यांत ती सदा गृहीत धरलेली असते. ह्या साध्या मुद्द्याच्या समर्थनार्थ लोकमान्य टिळकांसारख्या प्रखर बुद्धीच्या माणसास, महाराष्ट्रीय जनतेची खात्री करण्या-

साठीं, एक हजार पृष्ठें लिहावीं लागलीं असें बाईंना कोणीं सांगितलें तर त्यांचा त्यावर विश्वास बसणेंहि कठीण! माधवराव रानडे यांचीहि धर्माच्या क्षेत्रांत कामगिरी झालेली आहे. त्या कामगिरींत जी श्रद्धा व जो जिव्हाळा आहे तो त्यांचा विशेष मानतां येईल. पण डॉ. बेझंट यांची श्रद्धा बुद्धीवर आधारलेली आहे, रानड्यांसारख्या त्या प्रामुख्यानें भक्तिमार्गी नाहींत, असा त्या दोहोंत फरक आहे. वर लिहिलेल्या महाराष्ट्रीय मंडळीपैकीं सगळी ग्रंथोपजीवी आहेत, कांहीं व्यक्ति आकुंचितपणानें शब्दप्रमाणास हट्टानें धरून बसतात तर कांहीं स्वतंत्र विचाराचे, व नवीन काळ ओळखणारे असल्यामुळें उदारपणा दाखवितात, इतकाच त्यांचेमध्यें फरक आहे. डॉ. बेझंट यांना धर्मग्रंथांविषयीं पुष्कळ आदर असला तरी त्या ग्रंथोपजीवी नाहींत, त्यांना स्वतःचें असें थोडें फार ज्ञान आहे, कांहीं अपरोक्षानुभूति आहे. त्यांच्यामध्यें व वर आलेल्या इतर सर्वांमध्यें मूलभूत असा हा फरक आहे. तुलनेसाठीं महाराष्ट्राबाहेर गेलें तर अलीकडच्या पुढाऱ्यांमध्यें दयानंदसरस्वती व स्वामी विवेकानंद यांचीं नांवें डोळ्यासमोर येतात. दयानंदसरस्वती, विवेकानंद व डॉ. बेझंट हीं माणसें लोकसंग्रहास वाहिलेलीं होतीं, इतक्यापुरतें त्या तिघांमध्यें साम्य आहे. दयानंदांना स्वानुभव किती होता याची प्रस्तुत लेखकाला पुरेशी माहिती नसल्यामुळें अनुभवाबाबत दयानंद व डॉ. बेझंट यांची तुलना करण्याला तो समर्थ नाहीं. स्वामी विवेकानंद यांचा अनुभवाच्या क्षेत्रांत थोडा फार तरी प्रवेश झाला होता, हें त्यांच्या राजयोगादि ग्रंथांवरून दिसतें. पण 'अनुभव घेणें शक्य आहे' ह्या एका कबुलीखेरीज त्यांच्या आणि डॉ. बेझंट यांच्या दृष्टींत आणि धर्माच्या मांडणींत जास्त सादृश्य दिसत नाहीं, हें मोठें आश्चर्य आहे. एका ग्रंथकारानें जुनीं प्रवासवर्णनें गोळा करून त्यांवरून एखाद्या देशाचें वर्णन लिहिलें व दुसऱ्यानें

स्वत: त्या देशांत पुन: पुन: प्रवास करून वर्णन लिहिलें तर त्या दोघांच्या लेखनांत पुष्कळच फरक पडेल. जुनीं प्रवासवर्णनें वाचून लिहिलेला ग्रंथ नव्या काळच्या माणसांस समजण्यास दुर्बोध, नीरस, व जिज्ञासूंच्या नवीन गरजा न भागविणारा असा होईल. उलट पक्षीं स्वत: प्रवास करून आपल्या समकालीन लोकांकरितां जो माणूस वर्णनात्मक ग्रंथ निर्माण करील त्याला नवीन आकांक्षांच्या दिशेनें व नवीन लोकांस पटेल अशा धोरणानें तो लिहितां येईल; नवीन तऱ्हेच्या प्रश्नांस त्यांत उत्तरें सांपडतील; व आजच्या लोकांस ज्या गोष्टींचें अगत्य वाटतें त्या गोष्टी जास्त विस्तारानें तो त्यांत नमूद करील. खेरीज हा ग्रंथ त्या जुन्या प्रवासवर्णनांवरहि नवीन प्रकाश पाडूं शकेल. हिंदु धर्म हा तर्कावर अधिष्ठित नाहीं, त्याला अनुभवाचा पाया आहे, हें तत्त्व पुष्कळ जुनें आहे. जुन्या काळच्या अधिकारी माणसांनीं त्या अनुभवाचें सहाय्य घेऊन हिंदुधर्मावर त्या त्या वेळीं ग्रंथ लिहिले आहेत. अर्थातच ते त्या त्या काळच्या गरजा भागविण्यासाठीं लिहिलेले असल्यानें आजच्या काळास जुळते नाहींत. हल्लींचा काळ वेगळा आहे; सर्व धर्मांचीं माणसें आजच्या काळीं सार्वजनिक कामांत सदा एकत्र होत असल्यामुळें, निरनिराळ्या धर्मांची तुलना करणें आज अपरिहार्य झालें आहे. हल्लींचें युग सायन्सचें आहे. तेव्हां आजच्या जिज्ञासूंस प्रत्येक गोष्टीचें वर्णन स्पष्ट व तपशिलानें भरलेलें असावें लागतें, आज जी नवीन माहिती लोकांस जरूर वाटते ती त्यांत असावी लागते, आणि ती माहिती नीट समजण्यासाठीं वर्णनाचे सुसंगत भाग-विभाग पाडावे लागतात. जुन्या काळीं असल्या वर्णनाची अपेक्षा लोकांना नसे; कारण सायन्सचा पगडा त्या वेळीं लोकांच्या मनावर बसलेला नव्हता. वर्णन काव्यमय व हृदयाला आनंद देणारें असलें म्हणजे त्यांना तें पुरेसें होई, मग माहिती भौतिकशास्त्रांतल्या वर्णनासारखी भरपूर, स्पष्ट

व रेखींव पद्धतीनें सांगितलेली नसली तरी त्यांची त्याला हरकत नसे. आजच्या काळीं धर्मावर लोकांची श्रद्धा नाहीं याचें मुख्य कारण, इंद्रियातीत प्रकार स्वतः पाहून त्यांचें शास्त्रीय पद्धतीनें वर्णन सांगणारे लोक लुप्त झाले आहेत हेंच होय. डॉ. बेझंट यांच्या व्याख्यानांत व पुस्तकांत ही उणीव दूर करण्याचा फार मोठा प्रयत्न आहे. विवेकानंदासारख्यांच्या ग्रंथांत तो असल्यास हवा होता; पण दुर्दैवाची गोष्ट ही कीं, तो त्यांत फारसा दिसत नाहीं. असल्या प्रयत्नांमुळेंच डॉ. बेझंट यांचे ग्रंथ अत्यंत महत्त्वाचे झाले आहेत. आपल्या वेदान्तांत पंच ‘ कोष ’ सांगितले आहेत, स्थूल-सूक्ष्म असे अनेक ‘ लोक ’ सांगितले आहेत; पण त्या कोषांचा व लोकांचा माणसाशीं संबंध काय, ते कसे व कोठें असतात, त्यांचा उपयोग काय, सृष्टींतलें त्यांचें कार्य काय, याविषयींची सविस्तर माहिती बाईंच्या पुस्तकांत आहे. माणसाच्या देहांत चक्रें असतात, त्याच्या कमरेच्या पाशीं कुंडलिनी नांवाची वेटाळें घातलेली शक्ति असते, या गोष्टी आपल्या जुन्या ग्रंथांत आहेत. पण डॉक्टरांना यांपैकीं कांहींच माणसाच्या देहांत सांपडत नसल्यानें हीं ग्रंथांतलीं वर्णनें चुकीचीं आहेत असा पुष्कळ सुशिक्षित लोकांचा ग्रह झाला आहे. या विषयाबद्दल बाईंनीं अंतर्दृष्टीनें निरीक्षण करून आपल्या ग्रंथांत जी माहिती दिली आहे, तिनें आजच्या नवीन शंकांस उत्तरें मिळून या विषयावर नवीन प्रकाश पडत आहे. सृष्टींत देवदेवता आहेत असें सर्व धर्मांनीं एकमतानें सांगितलें आहे. पण त्या कशा असतात, कोठें असतात, सृष्टिक्रमांत त्यांचें कार्य व स्थान कोणतें, याची माहिती आज उपलब्ध नाहीं. पृथ्वीवर अनेक खंडें आहेत, तिचे सभोंवती अनेक समुद्र आहेत, असें आपलीं पुराणें सांगतात; पण ही पुराणांची शिकवण चुकीची असल्याचें आधुनिक भूगोल-शास्त्रानें ठरविलें आहे. मृत्यूच्या वेळीं आत्मा मरत नाहीं, अशी हिंदु धर्माची सामान्य शिक-

वण आहे. पण मृत्यूच्या वेळीं नक्की काय होतें याचें आजच्या जिज्ञासू माणसांचें समाधान करणारें शास्त्रीय वर्णन कोठें सांपडत नाहीं. माणूस पुनः पुनः जन्म घेतो असें अनेक धर्मांनीं सांगितलें आहे; पण ही जन्म घेण्याची क्रिया नक्की कशी होतें याचा तपशील उपलब्ध नाहीं. ह्या व असल्या अनेक प्रश्नांसंबंधानें बाईंनीं आपल्या ग्रंथांत व व्याख्यानांत तपशील देऊन खुलासा केला आहे, त्या प्रश्नांच्या भानगडी नीट सोडवून दाखविल्या आहेत, आणि ही कामगिरी कविकल्पनेच्या किंवा शुष्क तर्काच्या जोरावर न करतां आपल्या अंतर्यामांतील नवीन शक्तींचा उपयोग करून, शास्त्रीय रीत्या प्रयोग व निरीक्षण करून आणि अनुभव घेऊन केलेली आहे. ह्या कार्यांत बाईंना थिऑसफिकल सोसायटीचें एक मोठे पुढारी मि. लेडबीटर यांची फार मदत झाली आहे, हें येथें नमूद करणें अवश्य आहे. लेडबीटर यांना असली शक्ति डॉ. बेझंट यांच्या बरोबरीनें आहे; व कांहीं बाबतींत तर त्यांची शक्ति बाईंच्यापेक्षां थोडीशी सरसच ठरेल. कित्येक वेळीं त्या दोघांनीं एकत्र संशोधन करून आपलीं पुस्तकें जोडीनें लिहिलीं आहेत. बाईंच्या ह्या कामगिरीस जगांत आज दुसरीकडे कोठेंहि तोड सांपडण्याजोगी नाहीं.

डॉ. बेझंट यांच्या धर्मकार्यांतील एकदोन ठळक मुद्यांखेरीज जास्ती गोष्टींचा उल्लेख करण्यास येथें स्थळ नाहीं. बाईंचें एक म्हणणें असें आहे कीं, जगांत जे धर्म आहेत त्या प्रत्येकाला अंतरंग व बहिरंग अशा दोन बाजू असतात. बहिरंगाची बाजू सामान्य जनांसाठीं असते, आणि ती सर्वांसमोर उघड मांडण्यात येते; अंतरंगाची बाजू गुप्त असते. ती समजण्यास कठीण व सामान्य प्रतीच्या अज्ञ माणसाचा बुद्धिभेद करील अशा प्रकारची असते. त्या बाजूच्या अभ्यासानें माणसाच्या मनाचें सामर्थ्य वाढून त्याला अलौकिक क्रिया करण्याची शक्ति

येत असल्यामुळें, सामान्य दर्जाच्या माणसाच्या हातून त्याचा दुरुपयोग होण्याचेंहि भय असतें; यासाठीं ती बाजू गुप्त राखण्यांत येते, व ज्या थोड्या अधिकारी माणसांची तितकी तयारी असेल त्यांसच तींत प्रवेश मिळतो. बहिरंगाची बाजू सर्वांकरतां असते. त्यांत नीतितत्त्वें, तत्त्व-विचार, पौराणिक गोष्टी, विधि-संस्कार वगैरे सामान्य प्रतीच्या माण-सास लागणाऱ्या सर्व बाबींचा समावेश असतो. जरी हीं दोन अंगें वेगळीं दिसलीं तरी खरोखरी अंतरंगाचा आधार बहिरंगाला असतो. जर जगां-तील धर्मांची पूर्णपणें समजूत करून घ्यावयाची असेल तर पांडित्याच्या दृष्टीनें नुसत्या बहिरंगाचा अभ्यास करून भागावयाचें नाहीं. जगांतले बुद्धिमान लोक आज नुसत्या पांडित्याच्या दृष्टीनें सर्व धर्मांच्या बाह्यांगाचाच अभ्यास करीत असल्यानें त्यांना ते नीट आकलन होत नाहींत व पटत नाहींत. धर्माचें रहस्य नीटपणें हस्तगत करावयाचें असेल तर माणसानें चित्तशुद्धि करून त्या अंतरंगाचा अभ्यास केला पाहिजे. हा अभ्यास करण्यास पूर्वी गुप्त संप्रदाय असत व हल्लींहि आहेत. या गुप्त संप्रदायांस इंग्रजींत 'मिस्टरीज' असें म्हणत व ते निरनिराळ्या देशांत चालू असल्याचा पुरावा इतिहासांत सांप-डतो. या संप्रदायांतूनच मोक्षाची वाट अधिकारी जिज्ञासूला सांपडत असते. 'येरव्हीं अमृतमथना-। सारखें होईल अर्जुना। जरि रिघसी अनु-ष्ठाना। संप्रदायेंविण ॥ १ ॥* असें सांगून ज्ञानेश्वरांनीं मुमुक्षूला संप्रदायाची आवश्यकता सुचविली आहे; आणि 'पाठीं महर्षी येणें आले। साध-कांचे सिद्ध झाले। आत्मविद थोरावले। येणेंचि पंथें ॥ २ ॥'‡ अशा उदात्त वाणीनें त्या मार्गाचा गौरवपूर्ण उल्लेख केलेला आहे. सामान्य प्रतीचा माणूस हळूहळू सद्‌गुणी व ज्ञानी होत, ढकलत ढकलत पुढें जाईल

* पहाः ज्ञानेश्वरी अध्याय १८ ओंवी १४८२.

‡ पहाः ज्ञानेश्वरी अध्याय ६ ओंवी १५६.

आणि हजारों वर्षांनीं तें मोक्षरूपी ध्येय गांठील; पण ज्याला जास्त प्रयत्न करण्याची इच्छा आहे, पिपीलिका-मार्गानें सावकाशीनें न जातां विहंगम मार्गानें तीरासारखें सरळ व लवकर जाण्याचा ज्याला उत्साह आहे त्याला आजहि तो मार्ग खुला आहे; अगोदरच तेथें जाऊन पोहोंचलेले सर्वांगपरिपूर्ण जीवन्मुक्त पुरुष, त्या मार्गाच्या शेवटीं सध्यां उपस्थित असून खऱ्या मुमुक्षूला ते आजहि सहाय्य करतात, असें डॉ.बेझंट यांचें म्हणणें आहे. या जीवन्मुक्तांची एक सुसंघटित संस्था विद्यमान आहे, व जगांतील सर्व कार्यांचीं खरीं सूत्रें ही संस्था आंतून हालवीत असते.* या संस्थेंत निरनिराळे अधिकारी असतात. नवीन वसाहती,

* पृथ्वीवरील अनेक उद्योगांचीं सूत्रें ज्ञानी पुरुष हालवीत असतात याचा कांहींसा प्रत्यय राष्ट्रीय सभेच्या स्थापनेच्या इतिहासांत मिळण्याजोगा आहे. थिऑसाफिकल सोसायटीचे दृश्य पुढारी कोणीहि असले तरी तिचे खरे संस्थापक कांहीं ऋषितुल्य ज्ञानी पुरुष आहेत ही गोष्ट थिऑसाफिकल सोसायटीच्या सर्व पुढाऱ्यांनीं एकमतानें सांगितलेली आहे. राष्ट्रीय सभा स्थापण्याची मूळ चर्चा १८८४ सालच्या डिसेंबरांत मद्रास येथें दिवाणबहादुर रघुनाथराव यांचे घरीं सतरा माणसांच्या एका सभेंत झाली. या सतरांपैकीं बहुतेक माणसें थिऑसफिकल सोसायटीच्या कन्व्हेन्-शनला प्रतिनिधी म्हणून अडयारला आलेलीं असून तीं कन्व्हेन्शन संपल्यावर लगेच मद्रासमध्यें वरील चर्चेसाठीं एकत्र जमलेलीं होतीं. त्यांनीं त्या चर्चेनंतर कमिट्या स्थापल्या व १८८५ सालीं पुण्यास पहिलें अधिवेशन भरण्याचें ठरविलें, व सीतारामपंत चिपळूणकर आणि सार्वजनिक सभेची इतर मंडळी यांनीं स्वागतकमिटी पुण्यास स्थापण्याचें ठरविलें. पण पुण्यास कॉलरा सुरू झाल्यामुळें पहिली राष्ट्रीय सभा पुण्यास न भरतां मुंबईस भरवावी लागली. कॉंग्रेस स्थापण्याचा मुख्य मान मि. ए. ओ. ह्यूम यांस सर्व लोक देतात. ह्यूमसाहेब हे एक प्रसिद्ध थिऑसफिस्ट होते, ही गोष्ट सर्वांना माहीत आहे. थिऑसफिकल सोसायटीच्या पाठीशीं असणाऱ्या ज्ञानी पुरुषांशीं त्यांचा पत्रव्यवहार असे. त्यांपैकीं अनेक पत्रें अलिकडे थिऑसाफिकल वाङ्मयांत प्रसिद्ध झालेलीं आहेत. हे ह्यूमसाहेब १८८४-१८८५ च्या सुमारास पुण्यास आले होते; व सीतारामपंत चिपळूणकरांस भेटले होते. या भेटीची हकीकत सीतारामपंत

राष्ट्रांचे उदयास्त, संस्कृतींचे झगडे आणि राजकीय घडामोडी यांचीं सूत्रें हालविणाऱ्या अधिकाऱ्यास 'मनु' म्हणतात. मानवी शिक्षण व निरनिराळ्या धर्मांची संस्थापना यांवर देखरेख करणाऱ्या अधिकाऱ्यास 'बोधिसत्व' म्हणतात. जगांतील सारे धर्म या अधिकाऱ्यांच्या विद्यमानें स्थापलेले असल्यामुळें ते परस्पर सदृश असणें साहाजिकच होय. स्त्रियांचे प्रश्न, अपत्यजन्म व अपत्यसंगोपन यांकडे लक्ष देणारीहि

---

चिपळूणकरांनीं बार्शीचे रा. रामचंद्र मोरेश्वर साने यांना त्या वेळींच सांगितली होती, व ती रा. साने यांनीं १०-२-२५ च्या केसरींत आपल्या नांवानें प्रसिद्ध केली आहे. ती वाचकांनीं मुद्दाम पहाण्यासारखी आहे. तींत रा. साने लिहितात कीं, राष्ट्रीय सभेचा पूर्वेतिहास अनेक ठिकाणीं प्रसिद्ध झाला आहे, परंतु एक गोष्ट अद्यापि अप्रसिद्ध असल्यामुळें मी ती मुद्दाम या पत्रांत देत आहें. ती गोष्ट अशी कीं, पेन्शन घेतल्यावर ह्यूमसाहेबांची मनःप्रवृत्ति हिंदी लोकांच्या कल्याणाकडे सतत जी लागली तिचें अधिष्ठान धार्मिक स्वरूपाचें होतें; ह्यूमसाहेबांना एक ऋषितुल्य ज्ञानी पुरुष भेटला होता; त्यानें हिंदी जनतेच्या हिताकरितां झटा असें ह्यूम यांस सांगितल्यामुळें ह्यूमसाहेबांनीं कॅांग्रेसचा पुढाकार घेतला होता. ही गोष्ट प्रत्यक्ष मि. ह्यूम यांनीं चिपळूणकरांना सांगितली असें रा. साने लिहितात. योग्य माणसांस हातीं धरून हे ज्ञानी पुरुष जगांतील उद्योग कसे करतात, त्याची कल्पना वरील हकीकतीवरून येईल. रामदास स्वामींस ही कल्पना मान्य दिसते. ते दासबोधांत सांगतात—

उगीच पाहतां सृष्टि । गल्बला दिसतो दृष्टि ।
परी ते राजसत्तेची गोष्टी । वेगळीच ॥२०,४,३

* * *

सत्ता पृथ्वीमध्यें वाटली । जेथें तेथें विभागली ।
कळेनें सृष्टि चालली । भगवंताचे ॥ २०,४,६

* * *

प्रगट रामाचें निशाण । आत्माराम ज्ञानघन ।
विश्वंभर विद्यमान । भाग्यें कळे ॥ २०,४,१४

* * *

एक अधिकारी व्यक्ति या संस्थेंत असते.* डॉ. बेझंट यांची अशी शिकवण असून ती विस्तृत रीतीनें प्रतिपादिलेली त्यांच्या विविध पुस्तकांत सांपडण्याजोगी आहे.

जगांतील धर्मांमध्यें आज जे विरोध आहेत ते अज्ञानमूलक आहेत, ते मोडून आपण पृथ्वीवर सर्व धर्मांचा सलोखा केला पाहिजे, असें डॉ. बेझंट यांचें म्हणणें आहे. याचा त्यांनीं स्वतः उपक्रम केलेला आहे. सर्व धर्मांतील सदृश तत्त्वें एकत्र संकलित करून त्यांना बाईंनीं Fellowship of Faiths 'निरनिराळ्या धर्मांचें बंधुत्व' असें नामाभिधान दिलें आहे. या तत्त्वांचा प्रसार—तीं सर्व धर्मांत आहेत अशा दृष्टीनें—केला तर धर्मांतील विरोध मोडण्याचें कार्य कांहीं अंशांनीं होईल असें त्यांस वाटतें. थिऑसफीच्या परिषदांच्या आरंभीं सर्वधर्मीय प्रार्थना ( Common Act of Worship ) सुरू करण्याचा परिपाठ बाईंनीं पाडला आहे. त्या वेळीं सर्व धर्मांचीं माणसें आदरयुक्त मनानें उभीं रहातात, व प्रत्येक धर्माचा अनुयायी आपल्या धर्माची प्रार्थना त्या मेळ्यासमोर गंभीरपणानें व भक्तिभावानें म्हणतो. असल्या समारंभांत भाग घेणाऱ्या माणसाला आपल्या स्वतःच्या धर्मप्रार्थनेच्या वेळीं ती ऐकत निष्ठेनें उभें रहावयाचें असतें व इतर धर्मांच्या वेळींहि तसेंच करावयाचें असतें. तसें केल्यानें त्या एका परमेश्वरासच सर्व धर्म आळवीत आहेत, हें सर्वांच्या मनावर ठसून आपल्या धर्मावरची निष्ठा कमी न होतां इतर धर्मांविषयीं त्याचें मन सहिष्णु होण्यास शिकतें. अड्यार येथें बाईंनीं निरनिराळ्या धर्मांचीं देवळें बांधण्याचा उपक्रम केला आहे. तेथें प्रत्येक देवळांत त्या त्या धर्माच्या पद्धतीनुसार प्रार्थना होत असतात; आणि त्या वेळीं वाटेल त्या धर्माच्या

* थिऑसफिस्ट मासिकाच्या जून १९२८च्या अंकांतलें The World Mother याविषयींचें त्यांचें प्रवचन पहा.

माणसास वाटेल त्या देवळांत जाण्याची पूर्ण मुभा असते; पण तेथें आलेल्या प्रत्येक प्रेक्षकानें पूर्ण आदरवृत्तीनें वागलें पाहिजे, व त्या धर्मोची ईश्वरास आदर दर्शविण्याची जी पद्धत असेल ती तेथें असे-पर्यंत स्वीकारली पाहिजे, अशी शिस्त आहे. एखाद्या व्यक्तीस एखाद्या धर्माविषयीं आदर वाटत नसेल तर त्यानें तेथें जाऊं नये, आदर असेल तरच जावें व तो त्या पद्धतीनें व्यक्त करावा असें ठरविलेलें आहे. बाईनीं थिऑसफिकल सोसायटींत सुरू केल्या या गोष्टी जर सामान्य जनसमूहानें उचलल्या व शाळांत सुरू केल्या तर धर्माधर्मांचे कलह मिटविणें सोपें जाईल हें उघड आहे.

थिऑसफिकल सोसायटींत शिरल्यावर डॉ. बेझंट यांस तेथें लव-करच पुढारीपण मिळालें. १९०७ सालीं पूर्वीचे अध्यक्ष कर्नल ऑलकॉट हे दिवंगत झाले. त्यांच्या मागें सोसायटीनें बाईंना प्रचंड बहुमतानें अध्यक्ष निवडलें. त्यानंतर दर सात वर्षांनीं म्हणजे १९१४, १९२१ व १९२८ सालीं ज्या निवडणुकी झाल्या त्यांतहि बाईंसच जगांतील सर्व सभासदांनीं अध्यक्षाच्या जागीं पुनः पुनः निवडलें आहे. त्यामुळें अर्थात् त्या आज पंचवीस वर्षें अध्यक्ष आहेत. शेवटची निवडणूक उदाहरणादाखल घेतली तर नोंद झालेल्या एकंदर २११८६ मतांमध्यें २०८८० बाईंस अनुकूल, १७८ प्रतिकूल, १२८ चुकीमुळें रद्द अशीं होतीं. यावरून पहातां शेंकडा ९९ पेक्षांहि त्यांस अधिक मतें पडलीं आहेत असें दिसून येईल.* बाईंच्या अध्यक्षत्वाखालीं सोसायटीची वाढहि फार झपाट्यानें झाली आहे. पूर्वी जगांतील अकरा देशांत सोसायटीचे सेक्शन्स (Sections or National Societies) संघटित झालेले होते. कोणत्याहि देशांतील सोसायटीच्या शाखा अमुक

* पहाः थिऑसाफिस्ट मासिक, ऑगस्ट १९२८ चा अंक.

एका मर्यादेपेक्षां जास्त झाल्या म्हणजे त्या देशांत 'सेक्शन' ची संघटना करतात. बाईंच्या अमदानींत जगांतील सेक्शन्सची संख्या ११ वरून ४७ पर्यंत गेली असें १९३१ सालच्या रिपोर्टावरून दिसतें. कर्नल ऑलकॉट यांच्या मृत्यूच्या वेळीं सोसायटीचे सभासद सुमारें पंधरा हजार होते, ती संख्या अलीकडे चाळीस हजारांच्या आंत-बाहेर येऊं लागली आहे. सोसायटीचें आद्यपीठ मद्रासजवळ अड्यार येथें आहे. तेथें सोसायटीच्या मालकीची जागा पूर्वी २७ एकर होती. डॉ. बेझंट यांनीं लोकांकडून देणग्या मिळवून व स्वतःचे पैसे देऊन ती सुमारें पावणेतीनशें एकरपर्यंत वाढविली आहे; आणि त्या जागेवर विद्युत्गृह, छापखाना, हिंदी व विलायती भोजनशाळा, रहाण्याच्या जागा, कचेऱ्या वगैरे किती तरी ठिकाणें त्यांनीं बांधविलीं आहेत.* त्यांच्या अमदानींत जगांतल्या इतर अनेक देशांतहि सोसायटीच्या मालकीचीं घरें व इस्टेटी झाल्या आहेत. बाईंचें अध्यक्षपदावरचें धोरण पूर्ण मतस्वातंत्र्याचें आहे. त्यांची श्रद्धा जाज्वल्य असली आणि स्वतःचा अनुभव असल्यामुळें त्या आपलीं मतें जोरानें प्रतिपादित असल्या तरी सभासदांस पूर्ण विचारस्वातंत्र्य देण्याचें धोरण त्यांनीं एकसारखें चालू ठेवलें आहे. सर्व सभासदांनीं आपापलें चरित्र शुद्ध करावें व आपणास आवडेल तें जगाचें कार्य सतत करावें असा त्यांचा कटाक्ष असल्यामुळें व तदनुसार सभासदांनीं जगभर नाना उद्योग सुरू केले असल्यानें सोसायटीचा लौकिक सर्वत्र वाढला आहे. आपल्या मागें आपली जागा

---

* येथें एक विस्तीर्ण व भव्य असा वटवृक्ष आहे. मोठमोठीं व्याख्यानें त्याच्या छायेखालीं होतात. त्याच्याखालीं चारसहा हजार माणसें सहज बसतात. त्याच्या बुंध्याचा घेर सुमारें पाऊणशें फूट आहे. त्याच्या पारंब्या खालीं येऊन त्यांचे लठ्ठ खांब बनलेले आहेत. असले सुमारें सत्तर खांब त्या झाडाला आधार देत आहेत! वृक्षाचा घेर सुमारें पांचशें फूट असावा!!

घेतील आणि थिऑसफीचें निशाण पुढें नेतील अशीं माणसेंहि त्यांनीं तयार केलीं आहेत.

बाईनीं पुढाकार घेतल्यामुळेंच अमेरिकेंतल्या थिऑसफिस्टांनीं एक सुमारें पावणेपांचशें एकरांचें रमणीय ठिकाण तीन लक्ष साठ हजार रुपयांस १९२८ सालीं विकत घेतलें. या ठिकाणास ओहायची दरी असें म्हणतात. हें ठिकाण लॉस एंजलीस शहरापासून फारसें दूर नाहीं. डॉ. बेझंट यांच्या मतें नवीन संस्कृतीचें बीजारोपण जगांत लवकरच होणार आहे, त्याची सुरवात करण्याचें आरंभस्थान म्हणून जागा घेण्यांत आली आहे; आणि नवीन विचार, नवीन ध्येयें, नवीन प्रकारची रहाणी, नवीन प्रकारचें शिक्षण वगैरेंचा आरंभ बाईनीं येथें होऊं घातला आहे.

शेवटीं एका अत्यंत वादग्रस्त गोष्टीचा उल्लेख करून हें प्रकरण संपवूं या. १९०८ सालच्या अखेरीस व १९०९ सालीं डॉ. बेझंट यांनीं ठिकठिकाणीं जीं व्याख्यानें दिलीं त्यांत तीन मुद्दे त्यांनीं विशेष जोरानें प्रतिपादिले होते. ते असे : (१) एक युग संपून दुसरें लागण्याचा संधिकाल सध्यां आला आहे; जुने विचार, जुने आचार, जुनी परंपरा, जुनीं ध्येयें, जुनी संस्कृति, जुनी समाजव्यवस्था हीं सारीं लवकरच एकदम बदलूं लागतील व नव्या युगास सुरवात होईल; (२) जगाला नवीन दिशा दाखवणारा एक ऋषितुल्य पुरुष लवकरच जगासमोर येईल; आणि (३) मनाचे व देहाचे निराळे गुण दर्शविणारा एक मानववंश अमेरिकेंत हळूहळू अस्तित्वांत येईल. हे तिन्ही मुद्दे सामान्य जनतेला त्या वेळीं अगदीं हास्यास्पद वाटले, व बाईंची सर्वत्र थट्टा होऊं लागली. पण लोकनिंदेस न जुमानतां सर्व देशांत त्यांनीं या मुद्दयांचा जोरानें सारखा प्रसार चालविला.*

* The Changing World नामक पुस्तकांत हे सारे मुद्दे बाईनीं एकत्र दिलेले वाचकांस सांपडतील.

एखादा ऋषितुल्य पुरुष जगास शिकविण्यास आला असला तरी दुराग्रह, मनाचा आकुंचितपणा, स्वतःची घमेंड, अवहेलना-बुद्धि वगैरे दुर्गुण मानवी स्वभावांत भरपूर असल्यामुळें जनतेला त्याच्या मोठेपणाची ओळख पटत नाहीं, उलट ती त्याला विरोधहि करते, हें श्रीकृष्ण, गौतमबुद्ध, ख्राइस्ट वगैरे थोर पुरुषांच्या चरित्रांवरून उघड आहे. हल्लींच्या काळीं असें न व्हावें व त्या ज्ञानी पुरुषाची ओळख माणसाला पटण्यास सोपें जावें, यासाठीं डॉ. बेझंट व त्यांचे इतर सहकारी यांनीं पुढें लवकरच एक संस्था स्थापिली व ती The Order of the Star in The East या नांवानें १९११ सालीं प्रसिद्धीस आली. डॉ. बेझंट यांनीं या संस्थेचा पुढें सर्व जगभर प्रसार केला, व पुष्कळ सभासद तिला मिळवून दिले. कोणी तरी एक ज्ञानी पुरुष जगासमोर लवकरच येईल, जगांत सर्वत्र धुडगुस व धुमश्चक्री माजेल, या ज्ञानी पुरुषाचा थोरपणा ओळखण्यासाठीं लोकांनीं आपलीं हृदय-मनें निर्मल, आग्रहशून्य व प्रेमळ अशीं करणें अत्यंत अवश्य आहे, हा संदेश बाईनीं या संस्थेच्या द्वारानें पुष्कळ वर्षें सर्व जगाच्या कानांवर घातला. १९०९ सालीं मि. नारायणअय्या नांवाचे एक वृद्ध पेन्शनर ब्राह्मण कृष्णमूर्ति नामक आपल्या मुलास घेऊन अड्यार येथें रहावयास आले होते. त्याच सालीं थिऑसफिकल सोसायटीचे एक पुढारी मि. लेडबीटर यांची व त्या मुलाची प्रथम गांठ पडली; व नंतर बाईंची व मुलाची भेट झाली. कृष्णमूर्ति हा मुलगा त्या वेळीं तेरा वर्षांचा होता. तो दिसण्यांत अशक्त व बावळट दिसे. शाळेंतहि तो मंदबुद्धीचा असे.* पण

---

* Mrs. Besant & the Alcyone Case या पुस्तकांत पृ. ३३ वर Krishnamurti had been known at the Mylapore Boys' School as a dull boy असें विधान आहे तें पहा.

डॉ. बेझंट व लेडबीटर यांना त्या मुलांत कांहीं विशेष आहे असें वाटलें. आध्यात्माचा कांहीं विशेष अधिकार या मुलामध्यें आहे; जो ऋषितुल्य ज्ञानी पुरुष जगांत लवकरच येणार आहे त्याचा व या मुलाचा कांहीं निकट संबंध आहे, या मुलाच्या शरीरांत आवेश होऊन किंवा अन्य प्रकारचीं कांहीं स्थित्यन्तरें होऊन आध्यात्मदृष्ट्या हा मुलगा फुलासारखा फुलेल, त्याच्या शिकवणीचा सुगंध जगांत सर्वत्र दरवळेल, आणि त्या पुरुषाच्या जाणिवेचें तो वाहन होईल असें त्या दोघांचें मत पडलें. तेव्हां त्यांनीं त्या मुलाला उपरोक्त संस्थेंत सर्वांत उच्चासनावर नेऊन बसविलें. बाईनीं त्याच्या बापाला सांगितलें, कीं मी या मुलाचें शिक्षण उत्कृष्ट प्रकारें पार पाडीन, त्याच्यासाठीं मुबलक पैसा खर्च करीन, शिक्षणाकरितां त्याला निरनिराळ्या देशांसहि पाठवीन, तेव्हां तुम्ही हा मुलगा माझ्या ताब्यांत द्यावा. बाप बाईंच्या चाहत्यांपैकीं एक असल्यामुळें त्याला आनंद वाटून त्यानें हौसेनें मुलगा शिक्षणाकरितां बाईंच्या स्वाधीन केला, व कायदेशीर कागद करून बाईस पालक नेमिलें. बाईनीं लगेच त्याच्या शिक्षणाची उत्तम सोय केली. त्या स्वतःच त्याला इंग्रजी शिकवूं लागल्या. त्याला त्या प्रवासांत आपल्याबरोबर नेत. पुढें १९११ सालीं त्यांनीं त्याला शिक्षणासाठीं विलायतेस स्वतःबरोबर नेलें. नारायणअय्या हा हाडानें दुष्ट नव्हता. तो वृद्ध झालेला होता, आणि मनाचा दुबळा व स्वतःचें कायम असें मत नसल्यामुळें लोक सांगतील तें ऐकणारा असा होता. डॉ. बेझंट यांस नाक मुरडणारीं हवीं तितकीं माणसें त्या वेळीं मद्रासमध्यें व हिंदुस्थानांत इतरत्र होतीं. त्या वेळीं डॉ. बेझंट या हिंदी राजकारणांत पडलेल्या नव्हत्या, आणि या गोऱ्या बाईचें प्रस्थ हिंदुस्थानांत बिलकूल माजूं नये, तिचा पगडा हिंदी लोकांवर, विशेषतः तरुणांवर बसल्यास तें राजकीय दृष्ट्या हिंदुस्थानाला अनिष्ट होईल, असें पुष्कळ लोकांना त्या वेळीं प्रामाणिक-

पणानें वाटे. बाई तर हळूहळू लोकप्रिय होत चालल्या होत्या व या मंडळींना तें मुळींच नको होतें. परधर्मी स्त्रीचा पगडा सनातन हिंदुधर्मावर बसणें ठीक नाहीं, असें मानणारीं जुन्या विचाराचीं माणसेंहि समाजांत भरपूर होतीं. थिऑसफिकल सोसायटींतहि बाईंच्या विरुद्ध रुसून फुगलेल्या माणसांचा एक गट होता. डॉ. बेझंट यांचीं या नवीन संस्थेशीं निगडित असलेली मतें मूर्खपणाचींच नव्हत तर लुच्चेगिरीचीं आहेत, असें खरोखरीच वाटणारांचाहि एक पक्ष हिंदुस्थानांत व इतरत्र अस्तित्वांत होता. या सर्व तऱ्हेच्या मंडळीमध्यें नुसतीं विघ्नसंतोषी माणसेंहि थोडींथोडकीं होतीं असें नाहीं. त्या सर्वांनीं नारायण अय्याला बाईविरुद्ध चिथाविलें; तुझा मुलगा परदेशीं गेल्यामुळें आतां बाटला असें सांगितलें, व माझा मुलगा परत द्या अशी मागणी त्यांनीं बापाच्या मुखानें बाईकडे करविली. लेडबीटर हे अनीतीनें वागतात, त्यांनीं माझ्या मुलाची नीति बिघडविली आहे, व तुम्हांस हें माहीत असूनहि तुम्ही बुद्धया त्याच्याकडे कानाडोळा केला आहां, अशी भाषा या उपद्व्यापी गृहस्थांनीं नारायण अय्याला पुढें करून बाईंना ऐकविली, व लोकांतहि पसरविली. अनीतीचे सर्व आरोप अगदीं खोटे होते. पण ज्या अर्थी ते राजरोस केले जात आहेत, त्या अर्थी हें प्रकरण आपण आपसांत विझविल्यास या प्रकरणाच्या मुळाशीं कांहीं काळेंबेरें खरेंच आहे असें म्हणण्यास आपण आपल्या हितशत्रूंना जागा दिल्यासारखें होईल, हें बाईंच्या लक्षांत अर्थातच चटकन् आलें. जर थिऑसफिकल सोसायटीच्या पुढाऱ्यांवर अनीतिमत्तेचे चोरटे संशय लोक घेऊं लागले तर सोसायटीच्या कार्यास मोठेंच विघ्न येईल, हें त्यांस माहीत होतें. कृष्णमूर्ति हा मुलगा आध्यात्मक्षेत्रांत पुढें मोठा होईल, तेव्हां त्याचें शिक्षण आपण करावें अशी बाईंची उत्कट इच्छा होती; व कायदेशीर कागद झाल्यावर त्या मुलाच्या शिक्षणासाठीं बाईंनीं हाजारों रुपये खर्च केले

होते. या सर्व गोष्टींचा विचार करून बाईनीं नमतें न घेतां नारायण अय्यास कोर्टाची वाट दाखविली. तेव्हां नारायण अय्यानें मद्रासच्या कोर्टांत मुलगा ताब्यांत मिळण्यासाठीं बाईवर फिर्याद केली. ही फिर्याद १९१२ सालीं दाखल झाली. पुढें ती कोर्टांत कांहीं महिने चालून जज्जानें निकाल दिला कीं, बाईनीं मुलगा बापाच्या ताब्यांत द्यावा, कारण बापाचा मुलावरील हक्क प्रभावी आहे; पण अनीतीचे आरोप सिद्ध झालेले नाहींत, व नारायण अय्यानें खोटया गोष्टींच्या आधारांवर आपली बाजू उभारलेली आहे; तेव्हां त्यानें स्वतःचा खर्च सोसून बाईचाहि खर्च द्यावा. अनीतीच्या आरोपांचा इनकार झाला व नारायण अय्याची बाजू खोटी आहे इतकें जज्जानें निकालांत नमूद केलें, तेव्हां बाईच्याविरुद्ध निकाल झाला असला तरी त्यांचा त्यांत अंशतः विजयहि झाला असें म्हटलें पाहिजे. पुढें बाईनीं मद्रासच्या हायकोर्टाकडे अपील केलें. तेथें खालच्या कोर्टाचा निकाल कायम झाला. तेव्हां त्यांनीं प्रीव्ही कौन्सिलकडे अपील केलें. प्रीव्ही कौन्सिलनें बापाच्या हक्कापेक्षां मुलाच्या हिताचाच जास्त विचार केला; मुलाचें म्हणणें ऐकून घेतलें. त्याची इच्छा व हित काय आहे, त्याचें शिक्षण कोठें चांगल्या-प्रकारें पार पडेल तें सर्व पाहिलें व निकाल दिला कीं, जरी बापाचा मुलावर हक्क असला तरी जर तो हक्क गाजवून बाप मुलाचें नुकसान करीत असेल, तर त्या हक्काची अंमलबजावणी करण्यास बापास वाव देऊं नये. अशा रीतीनें खालच्या कोर्टांतील निकाल फिरला. सरशेवटीं बाईचा संपूर्ण विजय झाला.

हा खटला कोर्टांत सुरू असतां हिंदुस्थानांतलें सारें लोकमत बाईच्याविरुद्ध फारच खवळलें होतें. सार्वजनिक कामांतले बाईचे जे हितशत्रु होते ते या वेळीं सारे त्यांच्याविरुद्ध एकत्र झाले होते. महाराष्ट्रांतील लोकमत हें बाईस अत्यंत अनुकूल असें बहुधा केव्हांच

नसतें. तेव्हां बाईच्याविरुद्ध त्या वेळीं केवढें मोठें तुफान उठलें असेल त्याची आमच्या वाचकांनीं कल्पना करावी. हायकोर्टांतला पहिला निकाल बाईच्या विरुद्ध झाल्यावर केसरीनें 'अवतारकृत्याचा पोरखेळ' म्हणून एक अग्रलेख लिहिला. तो रा. नरसोपंत केळकरांच्या लेखणींतून आलेला असला तरी त्यांत गरम मसाला व तिखट हीं पुष्कळच आहेत. 'बाईचें सर्वच चरित्र हास्यास्पदतेकडे झुकणारें आहे.' 'वक्रता आणि खोडसाळपणा बाईच्या अंगीं भरपूर आहे' अशा शेलक्या शब्दांचा अहेर केसरीनें मुक्तहस्तानें बाईंना त्यांत केला आहे.* थिऑसफिकल सोसायटीचे आतां बारा वाजले, डॉ. बेझंट यांचें ढोंग आतां सारें बाहेर आलें, अशी भाषा त्या वेळीं महाराष्ट्रांत वारंवार ऐकूं येई.

प्रीव्ही कौन्सिलचा अखेरचा निकाल १९१४ च्या मे महिन्यांत झाला व हें वादळ लवकरच शान्त झालें. आतां त्यावर इतकीं वर्षें लोटलीं असल्यामुळें मन शान्त ठेवून आपणांला या प्रकरणांतल्या दोनतीन गोष्टींकडे सध्यां पहातां येईल. जगांत सर्वत्र धुमश्चक्री चालू होईल, एक काल संपला आहे व दुसरा लागणार आहे याचीं चिन्हें सर्व जगभर दिसूं लागतील, सर्व देशांत आणि क्षेत्रांत जुन्या परंपरा मोडावयास लागून क्रान्तीचा संक्रमणकाल सुरू होईल, हें डॉ. बेझंट यांनीं १९०९ सालीं केलेलें भविष्य जरी तेव्हां पुष्कळांस वेडेपणाचें वाटलें असलें तरी आज सर्वांच्या डोळ्यांसमोर तें खरें होत आहे. तेव्हां वर दिलेल्या तीन मुद्दयांपैकीं पहिल्या मुद्दयावरील निकाल

* ता. २२-४-१३ चा केसरीचा अंक पहा. डॉ. बेझंट ह्या त्या वेळीं हिंदी राजकारणांत मुळींच पडलेल्या नव्हत्या; व त्या जातीनें इंग्रज असल्यामुळें हिंदुस्थानच्या राजकीय आकांक्षांस प्रतिकूल आहेत असेंच लोक त्या वेळीं गृहीत धरून चालत. त्यामुळें त्यांस जास्ती जोराचा विरोध झाला.

बाईच्या बाजूनें देणें प्राप्त आहे. अमेरिकेंत हल्लीं अनेक माणसांच्या देहांच्या बांधणींत फरक होत आहे, नवीन ठेवणीचीं माणसें जन्मास येत आहेत ही गोष्ट आज अनेक मानवशास्त्रज्ञांस मान्य झाली आहे. या प्रकारच्या माणसांस लोक 'अमेरिकन टाइप' किंवा तत्सदृश नावें देऊं लागले आहेत, व त्यांच्या अस्तित्वाबद्दल अमेरिकन वर्तमानपत्रांतहि कधीं कधीं लेख येत असतात. तेव्हां वर निर्देशिलेला तिसरा मुद्दा खरा झाला आहे, ही कबुलीहि दिल्याविना आपणांला गत्यंतर नाहीं. बाईनीं केलेलें हेंहि भाकित खरें ठरत असल्यामुळें त्याचें श्रेय त्यांना मिळणें अवश्य आहे.* रहातां राहिला नंबर दोनचा मुद्दा. हा कितपत खरा ठरला आहे त्याचा निर्णायक निकाल होण्यास अद्यापि अवकाश आहे. पुष्कळ हिंदी लोकांनीं मोठ्या हिशेबीपणानें आपलीं बुद्धिमान्

* अमेरिकेंत कॅलिफोर्निया संस्थानामध्यें नवीन उपवंशाच्या उत्पत्तीचीं चिन्हें दिसत असल्याचा पुरावा अलिकडे उपलब्ध झालेला आहे. डॉ. हृड्लिटर (Dr. Ales Hrdlicka) या सुप्रसिद्ध शास्त्रज्ञानें तीं चिन्हें मान्य केलेलीं आहेत. अलीकडील अमेरिकन पुस्तकें व लेख हिंदुस्थानांत मिळणें खार कठीण पडत असल्यामुळें त्यांतील उतारे येथें देणें जरूर असलें तरी तें शक्य नाहीं याबद्दल दिलगिरी वाटते. याविषयीं अधिक माहिती थिऑसफिस्ट मासिकाच्या खालील अंकांत वाचकांस सांपडेल:—

मार्च १९२७ चा अंक पृ. ६९३, एप्रिल १९२७ चा अंक पृ. १ ते २, व जुलै १९२७ चा अंक पृ. ३८८ या शेवटल्या अंकांत पुढील विधान केलें आहे.

Now the American Anthropologists have put it beyond doubt and the Californian School Teachers have carried out many experiments and are classifying for seperate teaching the children of the new type.

ब्रिटिश असोसिएशनसमोर कॅप्टन पेप यांनीं या वंशाचें वर्णन एका व्याख्यानांत मांडलें होतें. तें लेडबीटरकृत The Masters & The Path या पुस्तकांत पृ. ३६९ वर सांपडेल.

मुलें विशी उलटल्यावर विलायतेस अभ्यासासाठीं पाठविलीं आहेत. त्यांतलीं कांहीं आय्. सी. एस्. सारखी परीक्षा उतरली, कांहीं हात हालवीत परत आलीं, व कित्येक तर मडमा घेऊन अथवा बाटलाबाईचे भक्त बनून माघारीं फिरलीं असा अनुभव आहे. कृष्णमूर्तीस बाईंनीं निवडलें तेव्हां ते मंदबुद्धीचे होते व बावळट दिसत. त्यांचें वय अवघें तेरा वर्षांचें होतें. इतक्या लहानपणीं निवडलेला मुलगा आज कशा प्रकारचा झाला आहे तें पहाण्यासारखें आहे. कृष्णमूर्ति आज छत्तीससदतीस वर्षांचे आहेत. ब्रह्मचारी राहिले आहेत. पंचवीसतिशीच्या दरम्यान असल्यासारखे डोळ्यांस दिसतात. लेखक व व्याख्याते आहेत. सर्व जगभर उपदेश करीत फिरत असतात. सर्व जगास त्यांचें नांव माहीत होण्याइतके जगप्रसिद्ध झाले आहेत. त्यांच्यामध्यें एक अलौकिक मोहनी आहे असा शेंकडों लोकांस अनुभव आला आहे. त्यांच्या विचारांत कांहीं एक चमक आहे असें जग ओळखूं लागलें आहे. ईश्वर, जग, मनुष्य, या तात्त्विक प्रश्नांकडे तसेंच जगांतल्या सध्यांच्या नाना भानगडींकडे पहाण्याची त्यांची एक विशेष दृष्टि आहे, हें किती तरी लोकांस आज जाणवूं लागत आहे. माझ्या अंतरंगांत मला एक विशेष अनुभव मिळालेला आहे, त्या अनुभवानें जगांतलीं सारीं कोडीं सुटतात, मी त्या अनुभवाची वाट पाहिजे त्यास दाखविण्यास तयार आहें, असें ते वारंवार बोलतात. नाना देशांतल्या बुद्धिवान् व निष्ठावान् अशा सुमारें एक लाख उत्तमोत्तम अनुयायांची संस्था त्यांच्या पाठीशीं होती. पण संस्थेच्या बाह्य अवडंबरांत गुंतून राहून लोक सत्यशोधनाच्या कामीं ढिलाई करतात, म्हणून त्यांनीं निरपेक्षपणानें आपली संस्था एका फटकाऱ्यासारखी मोडून टाकिली आहे. हॉलंडमधल्या एका दानशूर उमरावानें एक मोठा किल्ला व समारें पांच हजार एकरांची जमीन त्यांस देणगीदाखल दिलेली असतां लौकिकाचा बडिवार नको

म्हणून त्यांनीं ती बहुतेक सारी इस्टेट त्या दात्यास परत केली आहे. वाचकहो, ह्या साऱ्या गोष्टींचा विचार केल्यास कोणत्या तरी तेरा वर्षांच्या बावळट मुलास विलायतेस पाठवून त्यास इतका होतकरू बनवितां येईल असें तुम्हास वाटतें का? कृष्णमूर्तींना अजून अनेक वर्षें जगणें आहे. कृष्णमूर्ति पुढें किती मोठे होतील, जगास ते कितपत मार्ग दाखवूं शकतील, हा भविष्यकालचा प्रश्न आहे; त्याचा निकाल सध्यां जरी आपणांस सांगतां न आला तरी सामान्य माणसापेक्षां ते आज निस्संशय पुष्कळ अधिक योग्यतेचे झाले आहेत हें स्पष्ट आहे. तेव्हां या मुद्द्यासंबंधाचा बाईंचा कयास थोडासा तरी खरा झालेला दिसतो; निदान तो खोटा आहे असें म्हणण्यास बिलकूल जागा नाहीं, व तो पूर्णपणें खरा होण्यास कदाचित् अद्यापि वाव सांपडेलहि असें आज म्हणावें लागेल. एकंदरींत तीन असंभाव्य गोष्टींपैकीं दोन खऱ्या झाल्या, व तिसरी कदाचित् खरी होईल अशी स्थिति आहे. तेव्हां बाईंना नांव ठेवण्याची घाई न करितां ती तिसरी गोष्ट कितपत खरी ठरते याची वाट पहाण्यांत शहाणपणा आहे, असें वाचकहो, नाहीं का आपल्याला वाटत? 'अवतारकृत्याचा पोरखेळ' म्हणून बाईंना ज्यांनीं त्या वेळीं इतकीं नांवें ठेविलीं त्यांना बाईंचे कयास भविष्यकाळीं इतके तरी खरे ठरतील याची कल्पना झाली असेल का?

---

# प्रकरण आठवें

## सामाजिक सुधारणा व शिक्षणाचें कार्य

रात्र थोडी व सोंगें फार अशी प्रस्तुत लेखकाची अवस्था झाली आहे. डॉ. बेझंट यांच्या चरित्राचा कितीहि संक्षेप केला तरी प्रकाशकांनीं घालून दिलेल्या १२५–१३० पानांच्या मर्यादेंत तें सर्व संपवणें अशक्यप्राय आहे. टाइपरायटरच्या घंटेप्रमाणें प्रकाशकहि इशारा देऊं लागले आहेत कीं आतां लिहिणें आटोपतें घ्या; आणि बाईच्या चरित्रांतले किती तरी प्रसंग तर अद्याप चित्रित करावयाचे आहेत! तथापि प्रकाशकांचा इशारा धाब्यावर बसवितां येण्यासारखा नाहीं. म्हणून प्रस्तुत चरित्रांतल्या बऱ्याच गोष्टी गाळणें व अनेकांचा संक्षेप करणें प्राप्त आहे. तेव्हां सामाजिक सुधारणा व शिक्षण या दोन्ही क्षेत्रांतील बाईचें कार्य प्रस्तुत प्रकरणांत झटपट संपविण्याशिवाय लेखकाला गत्यंतर नाहीं.

हिंदुस्थानांत आल्यावर जडवादास आळा घालणें, धर्माची जागृति करणें व तद्द्वारा लोकांचा स्वाभिमान जागृत करणें हा उद्योग बाईंनीं प्रथम हातांत घेतला हें आपण पूर्वी पाहिलें. पुढें त्यांनीं शिक्षणाचें क्षेत्र हातांत घेऊन त्यांत पुष्कळ उद्योग केला. हिंदुधर्माचा समावेश शिक्षणांत झाला पाहिजे, या मुद्दयावर त्यांचा विशेष जोर असे. शिक्षणक्रमांत धर्मशिक्षण आणणें अशक्य आहे असें त्या वेळीं सर्व पुढाऱ्यांना वाटे. हिंदुस्थानांत अनेक धर्मांचे अनुयायी वसत आहेत, त्या धर्मांमध्यें आत्यंतिक विरोध आहेत; तेव्हां सर्व धर्मांचें शिक्षण शाळा-कॉलेजांत देणें अशक्य होय, ही व्यावहारिक अडचण त्या वेळीं सर्व पुढारी लोकांच्या

डोळ्यांसमोर दत्त म्हणून उभी असे. नुसत्या हिंदुधर्मासंबंधानेंहि त्यांना अशाच प्रकारची अडचण भासे. हिंदुधर्मांत नाना पंथ व नाना मतें; प्रान्तवार चालीरीति वेगळ्या, उपास्यदैवतेंहि वेगळीं, निरनिराळ्या पंथांमध्यें भांडणें;—तऱ्हां असल्या हिंदुधर्माला गवसणी घालून त्याचा शिक्षणक्रमांत प्रवेश करविणें पुढाऱ्यांना अशक्य वाटे. ज्यांस धर्मशिक्षण इष्ट वाटत होतें त्यांना ही अडचण दुर्लंघ्य वाटत होती. पण तत्त्वतः धर्मशिक्षण नको असें म्हणणारे सुशिक्षित लोकहि पुष्कळ होते. पुष्कळांची स्वतःची धर्मावर श्रद्धा नव्हती, पुष्कळ जडवादी होते, धर्मशिक्षण देणें म्हणजे लोकांस आंधळे व खुळे बनविणें होय असें त्या वेळीं पुष्कळ बुद्धिमान् लोकांचें मत होतें. त्यांचा अर्थातच धर्मशिक्षणाला विरोध होता. महाराष्ट्रांत १८८० सालीं पुण्याचें न्यू स्कूल व १८८५ सालीं फर्ग्युसन कॉलेज ह्या दोन संस्था काढण्यांत आल्या. त्या काढणारीं माणसें त्या वेळेस बुद्धिमत्तेमध्यें समाजांत अग्रेसर होतीं. पण या संस्थांत धर्मशिक्षणाचा मागमूसहि नव्हता. या एकाच गोष्टीवरून धर्मशिक्षणासंबंधानें त्या वेळीं लोकांस काय वाटे याचें निश्चित अनुमान निघूं शकेल. महाराष्ट्रांत मध्यंतरीं ( १९०५ च्या सुमारास ) समर्थ विद्यालयासारख्या संस्था चालू झाल्या, व अगदीं अलीकडेहि ( १९२५ च्या सुमारास ) कांहीं नवीन शिक्षण-संस्थांनीं कार्य सुरू केलें. त्या शिक्षणसंस्थांनीं धर्माचा अव्हेर केलेला नाहीं हें खरें; पण या साऱ्या संस्थांचे प्रवर्तक मुख्यतः राजकारणाच्या दृष्टीनेंच सर्व प्रश्नांकडे व शिक्षणाकडे पहात. 'सरकारी धोरणानें आम्ही दरीद्री झालों, याचें शिक्षण आम्ही राष्ट्रीय शाळेंत देणार.' 'देश ओळखण्यास शिकणें याला राष्ट्रीय शिक्षण म्हणावयाचें'* असे उद्गार

* हे उद्गार लो. टिळकांचे आहेत. पहा केळकरकृत 'टिळक चरित्र' खंड २ भाग ५ पृ. १७ व १९.

या शिक्षणाच्या प्रवर्तकांच्या जिभेवर असत. त्यांतले शब्द जरा जास्त जहाल असले तरी शिक्षणासंबंधाची प्रवर्तकांची दृष्टि कोणती होती तें दाखविण्यास ते समर्पक आहेत. असल्या संस्थांतले विद्यार्थी धंदेशिक्षणांत पडावे, सरकारी नोकरी, वकिली वगैरेखेरीज अन्य धंदे करून त्यांना चरितार्थ चालवितां यावा अशी त्यांच्या प्रवर्तकांची इच्छा असे. डॉ. बेझंट यांची शिक्षणाकडे पहाण्याची दृष्टि थोडीशी या-सारखी होती व थोडीशी वेगळी होती. धर्मास त्या फार महत्त्व देत. धर्म ही मूलभूत गोष्ट आहे, धर्म हा सर्व ध्येयांचा, पराक्रमाचा, स्वार्थ-त्यागाचा जनक आहे अशी त्यांची भावना आहे. ह्या मुळाला पाणी घातलें म्हणजे इतर सर्व शाखांबरोबर देशभक्तीची शाखाहि टवटवीत होईल असें त्यांना वाटतें. धर्म म्हणजे वेदान्ताचे शुष्क वाद किंवा सामाजिक चालीरीति नव्हत. धर्म म्हणजे ध्येयांच्या सागराकडे धांव घेणारा हृदयांतला जिवंत झरा होय. या दृष्टीनें बाई धर्माकडे पहातात, आणि तो धर्म शिक्षणांत अवश्य असला पाहिजे असें म्हणतात. तो नीटपणें आला म्हणजे त्याच्या पोटीं इतर सर्व चांगल्या गोष्टी आपो-आप येतील याची त्यांना खात्री वाटते. नुसतें बौद्धिक शिक्षण माण-साला तरतरीत करील, वावदूक करील, तसेंच तें त्याला स्वार्थी व जडवादीहि करील. माणसामध्यें जर आत्मसमर्पण करण्याची हौस उत्पन्न करावयाची असेल तर बौद्धिक शिक्षणाला धर्मशिक्षणाची जोड पाहिजे, असें बाईंच्या अध्यात्मदृष्टीला दिसतें. शिष्य हा जीव आहे, तो कोरा नाहीं, पूर्वजन्मसंस्कारामुळें त्याची मनोरचना विशिष्ट वळणाची असते, तो जीव आंतून फुढं पहात असतो—एका विशिष्ट रीतीनें फुढं पहात असतो, त्याच्यांत कांहीं विशिष्ट गुणदोष असतात. त्यांपैकीं दोष निर्मूल करून गुण विकसित करावे आणि ज्या विशिष्ट तऱ्हेनें जीवाची वाढ होत असेल त्या तऱ्हेनें ती वाढ सुलभ करून देण्या-

साठीं त्याला शिक्षण द्यावें असें बाईंना वाटतें. किंबहुना शिक्षण म्हणजे जीवाच्या आंतून होणाऱ्या विकासास लोकांनीं केलेली मदत होय, अशी त्यांची शिक्षणाची व्याख्या आहे.

या बुद्धीनें बाईंनीं १८९८ सालीं काशीस सेंट्रल हिंदु कॉलेज काढलें. त्यांत धर्मशिक्षणास वाव असावा, पाश्चात्य वळणाची जोड असावी, पण पाश्चात्य ध्येयाचा वरचष्मा होऊन हिंदी संस्कृति चुरडली जाऊं नये असें कॉलेजचें धोरण होतें. हें कॉलेज उत्तर हिंदुस्थानांत एक सुप्रसिद्ध कॉलेज होऊन बसलें. कॉलेजकरतां शिक्षणकार्यास वाहिलेलीं व ध्येयवादी माणसें जमविणें आणि पैसे मिळविणें या गोष्टींत बाईंना प्रारंभीं विशेष लक्ष घालावें लागे. शिक्षणकार्यांत त्यांना डॉ. ॲरुंडेल यांची विशेष मदत झाली. पुष्कळ महाराष्ट्रीय मंडळींनींहि बाईंच्या छत्राखाली या कामास वाहून घेतलेलें आहे. त्यांत प्रो. चिंतामणराव त्रिलोकेकर, कै. प्रो. पंढरीनाथपंत तेलंग, रा. माधवराव कानिटकर वगैरे अनेक मंडळी नांव घेण्यासारखी होती व आहेत. कॉलेजखेरीज संस्कृत पाठशाळा, हायस्कूल वगैरे आणखीहि संस्था बाईंनीं काशीस काढल्या, व हिंदुस्थानांत इतरत्र म्हणजे कानपूर, सिंध-हैदराबाद, अड्यार, मदनपल्ली वगैरे अनेक ठिकाणीं त्यांनीं शाळा व कॉलेजें काढलीं. तसेंच कालगत्या काशीस एक मुलींची शाळा व स्त्रियांचें कॉलेज अशीं काढलीं. त्यांचें हें शिक्षणकार्य चालू आहे. त्या लोकप्रिय असतांना जनतेची आर्थिक मदत त्यांना जास्त होत असे, पण पुढें लोकांचा विरोध झाल्यावर पैशाच्या अभावीं कांहीं ठिकाणच्या शिक्षण-संस्था त्यांना बंद करणें भाग पडलें. पण अद्यापि अनेक शिक्षण-संस्था त्यांच्या छत्राखालीं उत्तम कार्य करीत आहेत. या साऱ्या शिक्षण-संस्था थिऑसफिकल एज्युकेशन ट्रस्ट नामक संघटनेंत त्यांनीं १९१३ सालीं ओंवून टाकल्या व त्यांना चिरस्थायी

करण्याचा उद्योग केला. पुढें लोकांची सहानुभूति जास्त प्रमाणांत मिळवावी, व सर्व हिंदुस्थानभर आपणांला शिक्षणसंस्थांचें जाळें पसरतां यावें म्हणून त्यांनीं हा ट्रस्ट राष्ट्रीय-शिक्षण-सोसायटी ( Society for the Promotion of National Education ) नांवाची संघटना स्थापून त्यांत समाविष्ट केला. या सोसायटींत हिंदुस्थानांतले अनेक पुढारी त्यांनीं घेतले होते, महाराष्ट्रांतील लोकमान्य टिळकहि त्यांत होते. पण बाईंच्या अपेक्षेप्रमाणें त्या सोसायटीच्या अमदानींत शिक्षणकार्य जास्त मोठ्या प्रमाणावर होऊं शकलें नाहीं. तत्रापि डॉ. बेझंट यांच्या वळणानें चालणाऱ्या अनेक शिक्षण-संस्था सध्यां उत्कृष्ट कार्य करीत आहेत.

काशीच्या कॉलेजला बाईंनीं Central Hindu College मध्यवर्ती हिंदु कॉलेज असें जें नांव दिलें होतें त्यांत ‘ मध्यवर्ती ’ असें विशेषण मुद्दाम घातलेलें होतें. दुसऱ्या अनेक संस्था या कॉलेजच्या सभोंवतीं निर्माण व्हाव्या व त्यांची एक युनिव्हर्सिटी बनावी असा बाईंचा मूळपासूनच हेतु होता. पंडित मदनमोहन मालवीय यांनाहि एक हिंदु विश्वविद्यालय स्थापण्याची इच्छा होती, व ती त्यांनीं १९०५ च्या डिसेंबरांत काशी येथें भरलेल्या राष्ट्रीय सभेनंतर लोकांसमोर प्रकटाहि केली होती. पण सहासात वर्षे मालवीयजींची ही कल्पना मनांतल्या मनांत राहिली. पुढें पंडितजींनीं कांहीं वर्षें अश्रान्त परिश्रम करून युनिव्हर्सिटीकरितां सुमारें एक कोट रुपये जमविले. मध्यंतरीं मुसलमानांनीं अलिगड येथें आपली एक युनिव्हर्सिटी काढली होती, तेव्हां हिंदूंनींहि आपलें शैथिल्य टाकून आपले उद्योग नेटानें सुरू ठेविले. बाईंचाहि युनिव्हर्सिटी काढण्याचा प्रयत्न स्वतंत्रपणें सुरू होता. पण हे परस्परांस विरोधी दोन प्रयत्न चालू ठेवल्यानें दोघांच्याहि उद्योगांची हानि होण्याचा संभव होता. तेव्हां दोघांनीं परस्परांस साहाय्य करून एकच

युनिव्हर्सिटी स्थापावयाची असें दोघांनीं शहाणपणानें शेवटीं ठरविलें, व बाईनीं मोठ्या मनानें १९१६ सालीं आपलें सेंट्रल हिंदु कॉलेज ( व त्याचे पैसे, मालमत्ता वगैरे ) नवीन युनिव्हर्सिटीचें पहिलें कॉलेज म्हणून त्या युनिव्हर्सिटीला दिलें. या युनिव्हर्सिटीसाठीं सरकारला नवा कायदा करावा लागला. तिच्या व्यवस्थापक-मंडळांत फक्त हिंदु लोक असावे असा जरि निर्बंध होता तरी बाई विद्यमान असेपर्यंत त्यांचा त्यांत समावेश व्हावा असा विशेष नियम कायद्यांत घालण्यांत आला. बाईंच्या मतांप्रमाणेंच जर सर्व गोष्टी होण्यासारख्या असत्या तर त्यांनीं हिंदु युनिव्हर्सिटी न काढतां सर्व धर्मांची युनिव्हर्सिटी काढली असती. जगांतील सर्व धर्मांत फार साम्य आहे, त्यांमधले विरोध वरवरचे व आगान्तुक आहेत असें बाईंचें मत आहे; आणि त्या मतानुसार सर्व धर्मांना गुण्यागोविंदानें एका युनिव्हर्सिटींत नांदवून व सर्व धर्मांचें शिक्षण त्या संस्थेंत चालू ठेऊन सर्व धर्मांना एकमेकां-जवळ ओढण्याचा एक पायरी पुढचा प्रयत्न त्यांच्या मनांत करावयाचा होता. पण असल्या प्रयत्नास आपणास लोकमताचें फारसें पाठबळ मिळणार नाहीं, लोक या कल्पनेच्या फार मागें आहेत हें त्यांनीं पाहिलें. तेव्हां त्यांनीं आपल्या कल्पनेचा आग्रह सोडला व आपलें काशीचें कॉलेज पंडितजींच्या स्वाधीन केलें.* पण बाईंच्या हाताखालीं अद्याप ज्या इतर अनेक शिक्षणसंस्था चालू आहेत त्यांचें धोरण त्यांनीं सर्व धर्मांस एकमेकांजवळ आणण्याकडेच ठेविलें आहे.

महाराष्ट्रांत धर्मशिक्षणाचे अनेक कैवारी असूनहि बाईंच्या शिक्षण-कार्याला महाराष्ट्रांत नुसतें बरें म्हणणारीं फारशीं माणसें मिळालीं नाहींत. हिंदुधर्मांतील कोणत्याहि एका पंथाचा विद्यार्थ्यानें अभिमान बाळगूं नये, अखिल हिंदुधर्माचा अभिमान बाळगावा हें बाईंचें धोरण

* त्या हिंदु विश्वविद्यालयानेंच बाईंना १९२१ सालीं डॉक्टर ही पदवी दिली.

होतें, व संकुचित वृत्तीच्या अनेक महाराष्ट्रीयांस तें आवडत नव्हतें. हिंदुधर्माचें पद्धतशीर शिक्षण देण्याकरितां सेंट्रल हिंदु कॉलेजच्या विद्यामानें अनेक पुस्तकें प्रसिद्ध झालीं होतीं, व त्या पुस्तकांपैकीं Sanatan Dharma,—An Advanced Text Book हें तर इतकें उत्कृष्ट आहे कीं, कोणत्याहि हिंदु तरुणानें तें वाचल्याशिवाय राहूं नये असें आमचें मत आहे. पण या पुस्तकांवरहि महाराष्ट्रांत विरोधी टीका झाली. या दोन्ही वादांत लो. टिळक यांनीं बाईंची बाजू धरली होती.* आपल्या शिक्षणकार्यांत बाईंनीं सरकारची एक कपर्दिकाहि घेतली नसल्यामुळें त्यांनीं स्वतःला शिक्षणाबाबत स्वतंत्र ठेविलें होतें. ही गोष्ट गोऱ्या सरकारी अधिकाऱ्यांना पसंत नव्हती, आणि धर्माच्या पांघरुणाखालीं बाई हिंदी तरुणांना राजकीय जहालपणा शिकवीत असतात असा त्यांच्यावर सर जॉन ह्यूएट, सर अँटनी,§ मॅकडोनेलसारख्या अनेक अधिकाऱ्यांचा उघड आरोप असे. लॉर्ड मिंटो हे व्हाइसरॉय असतांना त्यांनीं बाईंशीं सलोख्याचें धोरण ठेवून गोऱ्या अंमलदारांचा हा विरोध कमी केलेला होता.† बाई थिऑसफिस्ट, त्यांच्या हाताखालचीं शिक्षणकार्यास वाहिलेलीं माणसेंहि बहुतेक थिऑसफिस्ट

* ता. ५-४-०४ च्या केसरींतील स्फुट, व टिळक यांचे समग्र लेख भाग ४ पृ. ३५३ (हिंदुधर्मावरील कांहीं अलीकडचीं पुस्तकें, केसरी ३-११-०३) व पृ. ३८३ (थिऑसफी व हिंदुधर्म, केसरी २९-३-०४) हीं पहा.

§ हे दोघे संयुक्त प्रान्ताचे ले. गव्हर्नर होते.

† इ. स. १९१० सालीं बाईंवर सरकारनें राजद्रोहाचा खटला करण्याचा घाट घातला होता. त्याच्या मुळाशीं संयुक्त प्रान्ताचे लेफ्टेनंट गव्हर्नर सर जॉन ह्यूएट होते. बाईंनीं त्या सुमारास एक लेख लिहिला होता व हिंदी लोकांशीं उर्मटपणानें वागण्याबद्दल इंग्रजांच्या डोळ्यांत अंजन घातलें होतें. सेंट्रल हिंदु कॉलेजमधील हिंदी विद्यार्थ्यांशीं एक इंग्रज आगगाडीमध्यें अत्यंत उर्मटपणानें वागला, व तसेंच दुसरें एक उदाहरण त्या सुमारास घडलें होतें. बाईंनीं आपल्या लेखांत म्हटलें होतें

आणि सर्व निष्ठावान्. अर्थात् हिंदी तरुणांवर त्या निष्ठेचा अप्रत्यक्ष परिणाम होणें सहाजिकच होतें. ध्येयवादी शिक्षकाच्या वर्तनाचा विद्यार्थ्यांच्या शीलावर न बोलतां परिणाम होणें हें नेहमींच इष्ट असतें. पण ही शिक्षकमंडळी थिऑसफिस्ट असल्यामुळें लोकांस तो परिणाम अनिष्ट वाटे. बाईंच्या कांहीं अनुयायांची निष्ठा एका प्रसंगीं फार जाज्वल्य झाली होती; व विद्यार्थी स्वभावतःच अनुकरण-शील असल्यामुळें त्यांचेवर त्याचा परिणाम त्या वेळीं बराच झाला होता. आणि त्यामुळें कॉलेजच्या चालकांत वैमनस्य येऊन कांहींजणांचे राजीनामेहि एकदां सादर झाले होते.*

जसें बाईनीं शिक्षणकार्य अंगावर घेतलें आहे तसें समाज-सुधारणेचेंहि कार्य अंगावर घेतलें आहे. त्याचा ओझरता उल्लेख करून हें प्रकरण संपवूं. महाराष्ट्रांत आगरकर व रानडे हे दोन

कीं असला उर्मटपणा साम्राज्यास अहितकारक आहे, त्यानें हिंदी तरुण निराश होऊन अत्याचारी बनतात, व्हाइसरॉयांनीं हुकूम काढून असले प्रकार बंद करणें अवश्य आहे. त्याशिवाय हिंदी व इंग्रज यांमध्यें बरेपणाची भावना येणार नाहीं. हा लेख सर जॉन ह्यूएट यांना फार झोंबला. त्यांनीं आंतून चक्रें फिरवून बाईंच्या कॉलेजला बनारसच्या महाराजांकडून जी मदत मिळे ती बंद करण्याची खटपट केली, आणि बाईंच्या पत्राबद्दल व्हाइसरॉय लॉर्ड मिंटो यांचेकडे तक्रार केली. बाईवर राजद्रोहाचा खटला करण्याची त्यांची कारवाई होती असें म्हणतात. नाम-दार गोखले यांनीं या वेळीं बाईस फार मदत केली, व सरकारी अधिकाऱ्यांच्या कलकत्त्यास भेटी घेतल्या. बाईंचा लेख त्यांस उपयुक्त वाटला होता. हें प्रकरण लॉर्ड मिंटो यांनीं विझविलें. यासंबंधींची हकीकत व नामदार गोखले यांचीं पत्रें १९३२ च्या थिऑसफीच्या ऑक्टोबरच्या अंकांत आलीं आहेत.

* या प्रसंगाची तिखटमीठ लावून विकृत केलेली हकीकत केसरीच्या ६-५-१३ च्या अंकांत आली होती. ती 'केळकरांचे लेख, खंड १' या पुस्तकांत 'बनारस कॉलेजांतील फूट' या मथळ्याखालीं वाचकांस सांपडेल.

सुधारणेचे अग्रणी होऊन गेले. पैकीं आगरकर हे धर्मास झूट मानणारे होते व रानडे त्यावर विश्वास ठेवणारे होते. अर्थात् बाईंची वृत्ति आगरकरांसारखी नसून रानड्यांसारखी होती हें मुद्दाम सांगण्याचें कारण नाहीं. या बाबतींत स्वामी दयानंद यांच्याशींहि त्यांचें साम्य आढळेल. प्रथम धर्माभिमान व धर्मनिष्ठा लोकांत उत्पन्न करावयाची व मग धार्मिक आणि सामाजिक सुधारणेस हात घालावयाचा असें बाईंचें प्रारंभापासून धोरण होतें. धर्माचा अभिमान जनतेंत जागृत न करतां सुधारणा केली तर धर्माविषयीं समाजांत अवहेलनाबुद्धि येते हें बाई ओळखून होत्या. समाजसुधारक व बाई यांमध्यें मुख्य फरक होता तो हा होता. बाई प्रारंभीं धर्मजागृतीकडेच विशेष लक्ष देत, व त्या वेळीं बाई समाजसुधारणेस प्रतिकूल आहेत अशी गैरसमजूत सुधारक-पक्षांत प्रारंभीं बळावलेली होती. अलीकडे ती नाहींशी झालेली आहे. महा-राष्ट्रांत सुधारणा-विरोधी म्हणून जो पक्ष होता त्याचें पुढारीपण न्यायत: म्हणा अन्यायत: म्हणा लो. टिळकांकडे बरींच वर्षें होतें. 'टिळक मनानें सुधारणाप्रिय असले तरी ते सुधारक नव्हते, किंबहुना सुधा-रणेवर टीका करणारे आणि जुन्या धर्माचे व परंपरेचे अभिमानी होते.' असें रा. केळकर यांनीं त्यांचें वर्णन केलें आहे.‡ सुधारकांचे दोष नेहमीं चवाठ्यावर आणावयाचे आणि त्यांनीं केलेल्या बऱ्या गोष्टीं-विषयीं होतां होईल तों मुग्ध बसावयाचें हें त्यांचें धोरण असे. डॉ. बेझंट यांच्या मनांत धर्माच्या तत्त्वांबद्दल अभिमान असला तरी जुन्या परंपरेंतील पुष्कळ रूढी घातुक असून त्या सुधारल्या पाहिजेत असें त्या स्पष्ट म्हणत. यावरून त्यांच्या व लो. टिळकांच्या मनोरचनेंत पुष्कळच फरक होता हें उघड होईल. हिंदु धर्मांतल्या व समाजांतल्या सुधारणा हिंदूंनींच पुढाकार घेऊन केल्या पाहिजेत, आपण गौरकाय

‡ पहा: केळकरकृत लो. टिळक यांचें चरित्र, खंड २ भाग १ पृ. ४१.

असल्यामुळें आपण पुढें होऊन तें कार्य नेटानें चालविलें तर ज्या हिंदुधर्माच्या उज्ज्वलतेसाठीं आपण झटत आहों त्याच हिंदुधर्मावर आघात करण्याचा आरोप आपणांवर लोक लादतील व आपल्या धर्म-कार्यास अडथळा होईल हें त्या ओळखून होत्या व आहेत. पण ती अडचण सोसूनहि त्यांनीं धर्मसुधारणा व समाजसुधारणा या दोन्ही क्षेत्रांत बराच उद्योग केला आहे.

स्त्रीशिक्षणासंबंधाच्या त्यांच्या प्रयत्नाचा किंचित् उल्लेख वर आलाच आहे. स्त्रियांस शिक्षणाबाबत पूर्ण मुभा असावी, पण बहुतेक स्त्रिया संसारांत पडत असल्यामुळें त्यांच्या शिक्षणांत उत्तम पत्नी व माता तयार होतील अशा प्रकारचा कांहीं विशेष भाग असावा असें त्यांचें मत आहे. अस्पृश्यांची स्थिति सुधारली पाहिजे असेंहि त्यांचें मत असून थिऑसफिकल सोसायटीच्या छत्राखालीं असलेल्या अस्पृश्यांच्या शाळा त्या बरेच दिवस चालवीत आहेत.* उत्तर हिंदुस्थानांतल्या कांहीं जातींत पडद्याची चाल प्रचलित असून बालविवाहहि जास्त प्रचलित आहे. बाईंच्या शिक्षणसंस्थांत पडद्याची चाल मोडलेली आहे. बालविवाहास प्रतिकार करण्यासाठीं बाईंनीं नियम केला होता कीं, आपल्या काशीच्या शिक्षण-संस्थांतील कांहीं यत्तांत विवाहित मुलें घ्यावयाचीं नाहींत व कांहीं यत्तांत त्यांचेकडून दुप्पट फी घ्यावयाची. जातिभेद व वर्णभेदा-संबंधानें बाईंचें मत सुधारणेस अनुकूल आहे, जुन्या काळीं जातिभेद व वर्णभेद जरी समाजास पोषक असले तरी आज आपापल्या जातीचीं व वर्णाचीं कर्तव्यें आम्ही करूं असें म्हणण्यास कोणतीच जात तयार नाहीं, फक्त संकुचित अभिमान व अन्याय हे हल्लीं समजांत वर्णभेदानें

---

* या शाळा थिऑसफिकल सोसायटीचे माजी अध्यक्ष कर्नल ऑल्कॉट यांनीं स्थापलेल्या आहेत.

उत्पन्न होत असतात, तेव्हां हा भेद हळूहळू मोडला पाहिजे असें त्यांचें म्हणणें आहे.§

समाजसुधारणेंत पुढाकार घेण्यासाठीं त्यांनीं १९१३ सालीं एक संघ काढला होता. त्यांतील अटी मी पाळीन असें सभासदांना लिहून द्यावें लागतें. ज्यांस सर्व अटी मान्य नसतील त्यांनीं मान्य नसलेल्या अटी खोडून सही करावी अशी मुभा असे. असल्या निवडक लोकांचा संघ स्वत:भोंवतीं निर्माण करून बोलघेवडे सुधारक उत्पन्न न करतां ठराविक गोष्टी करणारीं माणसें गोळा करून त्यांनीं प्रत्यक्ष रीतीनें सुधारणा अमलांत आणण्यास बरीच मदत केली आहे. त्या अटी खालीं दिल्या आहेत. त्यावरून बाईंचीं समाजसुधारणाविषयक मतें काय आहेत तें वाचकांस समजून येईल:—

मी वचन देतों कीं मी

१ सर्व जातिनिर्बंधांकडे दुर्लक्ष करीन.

२ माझे मुलगे अज्ञानदशेंत असतांना व माझ्या मुलींना सतरावें वर्ष लागण्याच्या अगोदर मी त्यांचीं लग्नें करणार नाहीं.

३ माझी पत्नी व मुली यांस शिक्षण देईन. कुटुंबांतल्या इतर स्त्रियांस मान्य असेल त्या मानानें त्यांनाहि शिक्षण देईन; आणि स्त्रियांना पडद्यांत ठेवण्याच्या चालीस विरोध करीन.

४ शक्य तोंवर जनतेच्या शिक्षणास मदत करीन.

५ सामाजिक व राजकीय क्षेत्रांत माणसाच्या अंगाच्या रंगाचा विचार मनांत आणणार नाहीं, व सर्व देशांत गोऱ्यांच्या बरोबरीनें इतर रंगाच्या माणसांस प्रवेश मिळावा याविषयीं यावत्शक्य खटपट करीन.

§ बाईंचे समाजसुधारणाविषयक विचार Wake Up India या पुस्तकांत सांपडतील.

६ पुनर्विवाहित विधवांच्या सामाजिक बहिष्काराला प्रत्यक्ष विरोध करण्याची खटपट करीन.

७ आध्यात्मिक, शैक्षणिक, सामाजिक व राजकीय क्षेत्रांतील सर्व कार्यकारी माणसांमध्यें एकोपा यावा यासाठीं राष्ट्रीय सभेच्या छत्राखालीं उद्योग करीन.

या अटींवरून सामाजिक सुधारणेची बाईंची दृष्टि किती विशाल आहे याची आमच्या वाचकांना कल्पना येईल.

---

# प्रकरण नववें

—+++*+++—

## स्वराज्याचा लढा

राजकारण हा डॉ. बेझंट यांच्या आवडीचा विषय असून विलायतेंत असतांना त्या राजकारणांत पडत असत. त्या वेळीं त्यांची हिंदुस्थानच्या आकांक्षांविषयीं पुष्कळ सहानुभूति असे; व त्यासंबंधानें त्या तेथें वारंवार लिहीत व बोलत हें आमच्या वाचकांस आम्हीं पूर्वीं सांगितलेंच आहे. हिंदुस्थानांत आल्यानंतर त्या बरींच वर्षें राजकारणांत पडलेल्या नव्हत्या. प्रथम त्यांनीं धर्मजागृतीचें काम हिंदुस्थानांत सुरू केलें; पुढें १८९८ च्या सुमारास तें काम तसेंच चालू ठेवून शिक्षणाच्या क्षेत्रांत प्रवेश केला; नंतर तीं कामें संभाळून समाजसुधारणेस हात घातला;व धर्मजागृति, शिक्षण व समाजसुधारणा याविषयींच्या आपल्या उद्योगाचा पाया राजकारणास उपयोगी पडेल अशी स्थिति आलीशी वाटल्यावर त्यांनीं १९१३–१४ सालच्या सुमारास हिंदुस्थानच्या राजकारणांत उडी टाकली. त्यापूर्वीं त्यांनीं राजकारण अगदीं वर्ज मानलें होतें असें मुळींच नाहीं; त्या कधींमधीं आपल्या लेखांत व भाषणांत हिंदी लोकांच्या राजकीय आकांक्षांना उचलून धरीत;‡ पण प्रायः हें त्या विलायतेंत करीत असत. इ. स. १९०६–०८ च्या सुमारास त्यांनीं भरतपुत्र व भरतकन्या या नांवाचीं मंडळें काढण्याचा प्रयत्न केला होता. जाज्वल्य देशभक्तीचे तरुण विद्यार्थी अत्याचारी बनून कैदेंत पडतात वा फांशीं

‡ केळकरकृत टिळक चरित्र खंड ३ भाग ५ वा पृष्ठ ७५ वर पुढील मजकूर आहेः बाई दर एकदोन वर्षांनीं विलायतेस जात व त्यांच्या प्रत्येक सफरींत त्यांच्या मताप्रमाणें व पद्धतीनें हिंदुस्थानाला अधिक राजकीय हक्क मिळण्याबद्दल चळवळ होत असे.

जातात, त्यांच्या देशभक्तीला योग्य तो वाव देऊन नीट वळण लाविलें जात नाहीं हें बाईंनीं पाहून सर्वच तरुणांना देशभक्तीचा नीट मार्ग दाखवावा यासाठीं हा त्यांचा प्रयत्न होता. बाई गोऱ्या कातडीच्या आहेत, तेव्हां त्या खरी देशभक्ति तरुणांस शिकविणार नाहींत, असें राष्ट्रीय वृत्तीच्या लोकांत त्यांच्यासंबंधीं वाटे. सरकारी अधिकाऱ्यांस बाई फारशा प्रिय नव्हत्या; आणि तरुणांना देशभक्ति शिकवणें हें त्यांना रुचण्यासारखें नव्हतें. तेव्हां सरकारी अधिकारी आणि राष्ट्रीय वृत्तीचे लोक यांचें त्यांस सहाय्य मिळालें नाहीं, आणि म्हणून तीं मंडळें यशस्वी झालीं नाहींत.

महाराष्ट्रांत सामान्यत: बाईंच्या विरुद्धच वातावरण असे. त्या हिंदी राजकारणांत व्यवस्थेशीर रीतीनें पूर्वी पडत नसल्यामुळें, त्या लोकांच्या राजकीय आकांक्षांच्या विरुद्ध आहेत असेंच अनुमान महाराष्ट्रांतील जनता त्यांच्या जातीवरून काढी. कांहीं थोड्या नेमस्तांखेरीज बाकीचीं महाराष्ट्रीय माणसें त्यांच्या राजकीय मतांकडे सदा संशयी वृत्तीनेंच पहात असत. एकंदर सर्व हिंदुस्थानांतील स्थितिहि जवळ जवळ अशीच होती; फक्त दगडापेक्षां वीट मऊ इतका फरक होता. थिऑसाफिकल सोसायटीमधील लोकांना बाईंची सहानुभूति पूर्णपणें हिंदुस्थानच्या बाजूची आहे हें माहीत होतें. पण असल्या मूठभर माणसांच्या मताचा परिणाम सामान्य जनतेवर फारसा होण्यासारखा नव्हता. सरकारी अंमलदारांच्या मनांत उलटी शंका असून बाई अप्रत्यक्ष रीतीनें राजकारणांत हिंदी लोकांना उत्तेजन देतात, आणि प्रत्यक्ष रीतीनें धर्म व शिक्षण यांत पडून त्यांना स्वाभिमानी करतात असें वाटल्यामुळें त्यांचा सदा आंतून विरोध असे. त्यामुळें हिंदुस्थानांत कार्य करणें बाईंना नेहमींच कठीण जात असे. नाहीं म्हणायला बाई कातडीनें गोऱ्या असल्यामुळें खालच्या प्रतीच्या सरकारी अंमलदारांकडून जसा हिंदी पुढाऱ्यांना

विरोध होत असतो तसा मात्र त्यांना होत नसे. १९१३–१४ सालीं जेव्हां बाई राजकारणांत एकदम पडल्या तेव्हां जनतेला असें वाटलें, कीं कृष्णमूर्ति-प्रकरणांत त्यांचेविरुद्ध लोकमत खवळलें असल्यामुळें तें बाईंच्या मानी स्वभावाला सहन होत नाहीं, व म्हणून लोकप्रियता संपादन करण्याकरितां त्या राजकारणाच्या आखाड्यांत उतरल्या आहेत ! त्यामुळें त्या राजकारणांत आल्या तेव्हां सर्वांनीं जरी त्यांची वरवर स्तुति केली असली तरी मनांतून त्यांचें करणें आरंभीं फारसें कोणाला बरें वाटलें नाहीं. गोऱ्या बाईनें हिंदी राजकारणांत आपल्या जातभाईंची बाजू सोडून विरुद्ध पक्षास मिळावें हें इंग्रज लोकांना अर्थातच रुचण्यासारखें नव्हतें.† थिऑसफिकल सोसायटीमध्येंहि कित्येक युरोपियन त्यांचेवर त्या वेळीं नाराज झाले. राष्ट्रीय सभा त्या वेळीं नेमस्त पक्षाच्या हातीं होती, व त्या पक्षाच्या पुढाऱ्यांच्या अंगीं धडाडी, आवेश वगैरे गुण यथातथाच होते. ही बाई राजकारणांत आपल्या धडाडीनें वादळ उत्पन्न करील, धैर्यादि गुणांनीं लोकमत आपणाकडे ओढून घेईल, आणि राष्ट्रीयसभेंतील आपल्या धिम्या व आस्ते कदम राजकारणाला कोणी विचारणार नाहीं अशीं स्वप्नें नेमस्त पक्षाच्या लोकांना पडूं लागलीं. राष्ट्रीय पक्ष त्या वेळीं कॉंग्रेसच्या बाहेर होता. तेव्हां कॉंग्रेसचें राजकारण फिकें पडलें तरी राष्ट्रीय पक्षाच्या लोकांना त्यांत वैषम्य वाटण्याजोगें नव्हतें. राष्ट्रीय पक्षाच्या लोकांमध्यें धैर्य, स्वार्थत्याग,

---

† नोकरशाहीला बाई इतक्या अप्रिय होत्या व अद्यापीहि आहेत, कीं १९३० सालच्या पहिल्या गोलमेज परिषदेकरतां त्यांचें नांव विलायतसरकारनें सुचविलें असतांहि तें हिंदुस्थानसरकारनें मुद्दाम काढून टाकलें ! त्या वेळीं 'आमच्या गोलमेज परिषदेला या ' अशी विनंति सरकार सर्वांना हात जोडून करीत होतें ! आणि खोगीरभरती होण्याची मुष्कील वाटत होती ! !

धडाडी व क्लेश सोसण्याची तयारी हे गुण नेमस्तांच्यापेक्षां जास्त असले तरी मनाचा आकुंचितपणा हा दोष त्यांच्यामध्यें अधिक प्रमाणांत होता. गोऱ्या कातडीची बाई राजकारणांत हिंदी लोकांची कड घेईल, हें त्यांस शक्यच वाटत नव्हतें; आणि म्हणून राजकारणांत पडण्यांत डॉ. बेझंट यांचा कांहीं धूर्तपणाचा डाव असेल असें वाटल्यामुळें बाईनीं राजकारणांत यावें हें त्यांनाहि प्रथम फारसें बरें वाटलें नाहीं. महाराष्ट्रांत नामदार गोखले व लोकमान्य टिळक या दोघांना मात्र त्यांच्या ह्या करण्यानें मनापासून आनंद झाला.

पण बाईनीं लोकांच्या शंका-कुशंकांची परवा केली नाहीं. त्यांनीं राजकारणांत उडी टाकून लवकरच त्या क्षेत्रांत पुढाकार घेतला; आणि राजकीय उद्योगांत दोनतीन तपें मुरलेल्या पुढाऱ्यांच्याइतकी तरी निदान योग्यता आपल्या अंगांत आहे हें त्यांनीं दोनतीन वर्षांत सबंध हिंदुस्थानला सिद्ध करून दाखविलें. त्यांनीं राजकारणांत पडण्याची उत्कृष्ट वेळ शोधून काढली होती. बरोबर नेमक्या वेळीं बाई राजकारणांत पडल्या हें पाहून त्यांना कांहीं अंतर्ज्ञान असेल असेंहि कांहीं लोकांच्या मनांत आल्याशिवाय राहिलें नाहीं. ज्या ' न्यू इंडिया ' नांवाच्या नव्या दैनिक पत्राच्या जोरावर बाईनीं आपली सर्व चळवळ पुढें चालविली तें पत्र त्यांनीं केव्हां काढलें तें मुद्दाम पहाण्यासारखें आहे. १९१४ सालच्या मे-जून महिन्यांत बाई लंडनमध्यें असून हिंदी स्वराज्यास पाठिंबा देणारे पार्लमेंटचे सभासद एकत्र जमवून त्यांची एक पार्टी स्थापण्याच्या उद्योगांत होत्या. पुढें त्या जुलैमध्यें हिंदुस्थानांत आल्या. येण्याच्या अगोदर त्यांनीं आपल्या मित्रांस तारेनें कळविलें कीं, ताबडतोब मद्रास येथें एक छापखाना विकत घ्या. त्याप्रमाणें त्यांनीं तो विकत घेण्याची घिसाडघाई केल्यामुळें त्यांस पैसेहि अधिक पडले. पुढें जुलैच्या १४ तारखेला त्यांनीं आपलें नवें

दैनिक * सुरू केलें; व सुमारें एक पंधरवडा जातो न जातो तोंच युरोपांत लढाईचा वणवा पेटला, सर्विया व ऑस्ट्रिया यांचेमध्यें २८ जुलै रोजीं लढाई सुरू झाली आणि ४ ऑगस्ट रोजीं इंग्लंड त्यांत पडलें. हें महायुद्ध चालू असल्यामुळेंच बाईंच्या राजकीय चळवळीच्या तें पथ्यावर पडलें हें पुढें दिसून येईलच. वरीलप्रमाणें त्यांनीं नेमकी वेळ साधून घेतली !

इ. स. १९१३ सालीं कृष्णमूर्तीची केस मद्रासेस चालू असून हायकोर्टानें त्या सालीं दोनदां बाईंच्याविरुद्ध निकाल दिला होता. पण त्यानें बिलकूल नाउमेद न होतां, त्यांनीं त्याच सालीं स्वराज्याच्या चळवळीसाठीं राजकारणांत शिरण्याचें ठरवून, १९१४ सालच्या जानेवारीच्या प्रारंभीं 'कॉमनवील' नांवाचें साप्ताहिक सुरू केलें. लोकमान्य टिळक मंडालेहून सहा वर्षांची शिक्षा भोगून १७ जूनला म्हणजे कॉमनवील पत्र काढल्यानंतर सुमारें सहा महिन्यांनीं सुटले. या गोष्टीचा विचार केला म्हणजे स्वराज्याची चळवळ करण्याचा बाईंचा विचार टिळकांच्या योजनेच्या अगोदरचा, किंबहुना ते तुरुंगांत असल्या वेळचा होता हें वाचकांच्या लक्षांत येईल. त्या वर्षाच्या मे महिन्यांत बाई लंडनला गेल्या होत्या, तेथें पार्लमेंटचे सभासद एकत्र आणून त्यांनीं हिंदी राजकारणाच्या सहाय्यार्थ त्यांचें एक मंडळ काढण्याचा उद्योग केला व स्वराज्य किंवा होमरूल ह्या चळवळी-साठीं एक लीग स्थापिली; आणि लॉर्ड वुइलिंगडन यांचे श्वशुर लॉर्ड ब्रासी यांचे अध्यक्षतेखालीं एक व्याख्यान देऊन त्यांत त्यांनीं The price of India's loyalty is India's freedom, म्हणजे हिंदुस्थानला स्वराज्याचा मोबदला दिल्याशिवाय हिंदुस्थान

* प्रथम कांहीं दिवस त्या दैनिकाचें नांव 'मद्रास स्टँडर्ड' होतें; पुढें त्याला 'न्यू इंडिया' असें त्यांनीं नांव दिलें.

आपली राजनिष्ठा तुम्हाला देणार नाहीं, असें तेथील जनतेला बजा-विलें. पुढें त्यांनीं हिंदुथानांत येऊन 'न्यू इंडिया' नांवाचें एक दैनिक सुरू केलें. काँग्रेसला जोरदार करण्याचा व तिच्या छत्राखालीं स्वराज्य-संघ काढून स्वराज्याची चळवळ सर्व हिंदुस्थानभर पसर-विण्याचा त्यांचा संकल्प होता. पण लो. टिळकांच्या नेतृत्वाखालचा राष्ट्रीय पक्ष १९०७ सालीं काँग्रेसमधून बाहेर गेला होता, तो पुनः काँग्रेसमध्यें आल्याशिवाय राजकीय चळवळीला जोर येणार नाहीं, हें त्यांनीं पाहिलें; आणि लोकमान्य टिळक नुकतेच सुटले होते त्यांचा व काँग्रेसचा समेट करण्यासाठीं त्या आपण होऊन टिळकांशीं विचार-विनिमय करण्याच्या हेतूनें पुण्यास गायकवाडवाड्यांत आल्या. बाईस महाराष्ट्रीय लोक अभिमानी म्हणतात; पण ज्या पुढाऱ्याचीं व आपलीं मतें अनेक बाबतींत दक्षिणोत्तर ध्रुवाइतकीं विरुद्ध आहेत, ज्यानें आपणास पुष्कळदां कसून विरोध केलेला आहे, ज्याला जवळ ओढण्यास नेमस्त-पक्षहि त्या वेळीं फारसा उत्सुक नव्हता, त्याच्या घरीं त्या आपण होऊन आल्या या गोष्टीची आम्हीं महाराष्ट्रीयांस आठवण देतों. टिळकांच्या पक्षास मानखंडना न वाटतां काँग्रेसचा दरवाजा खुला होण्यास नियमांत दुरुस्ती करणें अवश्य होतें. असल्या समेटास प्रारंभीं नामदार गोखले चांगलेच अनुकूल होते, व नियम-दुरुस्तीचा मसुदाहि त्यांनींच डॉ. बेझंट यांस करून दिला होता. टिळकांशीं बाईंचा विचारविनिमय डिसेंबरच्या प्रारंभीं झाला व बाईंनीं १९१४ सालच्या मद्रासच्या काँग्रेस-समोर समेटाची सूचना मांडून ती पास करून घ्यावी असें ठरलें होतें; आणि तसें होण्याची पुष्कळांना जवळ जवळ खात्री वाटत होती; पण नामदार गोखले यांनीं आयत्या वेळीं मत बदलून ती सूचना काँग्रेस-समोर मांडूं नका, अशी बाईंना विनंति केली. टिळकांस आपण ही गोष्ट कबूल केलेली आहे, तेव्हां ती मागें घेणें प्रामाणिकपणाचें होणार

नाहीं, असें वाटून बाईनीं गोखले यांचें न ऐकतां समेटाचा प्रश्न कॉँग्रेस-समोर ठेविला; पण नामदार गोखले यांचें मत विरुद्ध असल्यानें व विशेषत: नेमस्त पक्षांतील मुंबईचे पुढारी खरोखरी समेटास अनुकूल नसल्यानें समेट झाला नाहीं; मात्र समेटाचा विचार करण्यासाठीं मद्रास-कॉँग्रेसनें एक कमिटी नेमली. खरोखरी कॉँग्रेसमधील नेमस्त पक्षाच्या कित्येक पुढाऱ्यांना समेट आवडत नव्हता. त्यामुळें त्या कमिटीनें फक्त कालहरण केलें, व मुंबईच्या १९१५ सालच्या कॉँग्रेसच्या वेळींहि समेटाची सर्वसंमत अशी योजना ठरली नाहीं. पण बाईनीं समेटाचा पिच्छा सोडला नाहीं. त्यांच्या प्रयत्नानें सरतेशेवटीं समेट एकदांचा सिद्ध झाला आणि नेमस्त पक्ष, राष्ट्रीय पक्ष व मुसलमान यांनीं सहकार्य करावयाचें ठरवून सर्व पुढारी १९१६ च्या लखनौच्या कॉँग्रेसमध्यें प्रेमानें एकत्र झाले!

या ठिकाणीं बाई व राजकारणांतील इतर, विशेषत: महाराष्ट्रीय पुढारी, यांच्या मनोरचनेची तुलना केली तर बाईंचें राजकीय धोरण स्पष्ट होण्यास मदत होईल. महाराष्ट्रांत त्या वेळीं राजकारणाच्या क्षेत्रांत दोन पुढारी होते, व दोघेहि आपापल्या पक्षाला ललामभूत असेच होते. ते नामदार गोखले व लोकमान्य टिळक हे होत, हें न सांगतांच कोणालाहि समजण्यासारखें आहे. गोखले व डॉ. बेझंट यांचे परस्परां-विषयींचे पूर्वीचे ग्रह चांगल्यापैकीं होते. पण गोखले यांची राजकारणां-तील मनोवृत्ति नेमस्त असे. बाईंची मनोरचना नेमस्त नव्हती व नाहीं, हें त्यांच्या पूर्वचरित्रावरून उघड दिसण्यासारखें आहे. उलट त्यांची मनोवृत्ति टिळकांसारखीच उत्कट असे. पण १९१३–१४ च्या अगोदर टिळक व डॉ. बेझंट यांच्या ग्रहांनीं त्यांना कधींहि व्यक्तिश: एकत्र आण-लेलें नव्हतें; व मतैक्यापेक्षां मतभेदाचेच प्रसंग टिळकांच्या केसरीला जास्त आल्यामुळें आपल्याला बाईशीं सहकार्य करण्याचा कधींकाळीं

योगायोग येईल असें पूर्वी टिळकांच्या स्वप्नांतहि आलेलें नसेल. पण उत्कटपणा, धडाडी, आपल्या कार्यांत कांहींहि झालें तरी मागें घ्यावयाचें नाहीं हें धैर्य, आणि वेळीं सर्वस्वावर पाणी ओतण्याची तयारी या गुणांत बाई व लोकमान्य यांमध्यें फारच साम्य होतें. गोखल्यांचा नेमस्तपक्ष हा आस्ते कदम जाणारा असल्यामुळें, बाईंना व्यक्तिशः गोखल्यांविषयीं कितीहि आदर असला तरी, तो त्यांच्या उत्कट मनोवृत्तीला जुळणारा नव्हता. तथापि टिळक व डॉ. बेझंट यांच्या दृष्टीमध्येंहि बराच फरक होता. टिळकांचें मुख्य लक्ष हिंदुस्थानच्या हिताकडे असे, व इतर साऱ्या गोष्टींचीं सूत्रें हिंदुस्थानच्या हिताच्या दृष्टीनें हालविलीं पाहिजेत असें त्यांना वाटे. बाईंना हिंदुस्थानचा प्रश्न कितीहि जिव्हाळ्याचा वाटला तरी सर्व जगाच्या दृष्टीनें त्या त्याकडे पहात. हिंदुस्थानच्या झाडाला उत्कृष्ट पालवी फुटून त्याला पुष्प-फळांचा उत्कृष्ट बहार यावा या गोष्टीचें टिळकांना जास्त अगत्य असे. उलटपक्षीं अखिल जगाच्या बागेंत हिंदुस्थानचें झाड कोठें लावावें, म्हणजे तें झाड सुंदर दिसून सर्व बाग खुलावयास लागेल, सगळ्या बागेंतल्या फुलांची माळ करून जर ती काशीविश्वेश्वराला घालावयाची असली तर कोणत्या देशाच्या झाडानें कोणत्या प्रकारचें फूल त्या माळेसाठीं देणें अवश्य आहे, तीं फुलें कशीं ओवलीं म्हणजे माळ जास्ती शोभिवंत होईल, या दृष्टीनें बाई हिंदुस्थानाकडे व साऱ्या जगाकडे पहात व अद्यापिहि पहातात. सबंध पटाकडे पाहून प्यादें पुढें टाकण्याचा विचार बाईंचा असे, तर आपल्या आवडीच्या प्याद्याला चोहोंकडून जोर मिळवून कसा द्यावा याची विवंचना टिळक करीत. या दोन दृष्टींमध्यें तत्त्वाचा मोठा फरक आहे; पण रोजच्या राजकारणांत तो फारसा येत नसल्यामुळें बाईंचें व टिळकांचें सहकार्य कांहीं काळ उत्कृष्टपणें चाललें.

राजकारणाकडे पहाण्याची बाईंची जी दृष्टि आहे तिला 'आध्यात्म-दृष्टि' असें म्हणतां येईल. तिचा कांहीं जास्त खुलासा येथें करणें इष्ट आहे. एखाद्या झाडाला पान फुटून तें मोठें होऊं लागलें म्हणजे तें एका विशिष्ट रीतीनें वाढतें, त्याच्या शिरा विशिष्ट स्थळीं उत्पन्न होतात, व विशिष्ट प्रकारचा बांक घेऊन त्या त्या पानाच्या टोंकापाशीं येतात, आणि त्या पानाची कडाहि विशिष्ट नमुन्याबरहुकूम वाढत असते. लहान पान मोठें होत असतांना त्या पानांत उत्पन्न होणाऱ्या नव्या पेशी विशिष्ट रीतीनें रचल्या जाऊन पुढें तें एका विशिष्ट झाडाचें पान आहे असें आपणाला ओळखतां येतें. बाईंच्या मतें इतिहासाची वाढ अशा प्रकारची असते. पान जसें एका ठरीव क्रमानुसार वाढतें तद्वत् जगांतील नानादेशाच्या घडामोडी सर्व जगाला एका विशिष्ट नमुन्याबरहुकूम रंगरूप देत असतात. पानाचे निरनिराळे कपटे हवे तसे चिकटवून आपणाला नवीन पान जसें करतां येणार नाहीं, तद्वत् जगांत हव्या त्या चळवळी करून आपणाला जग वाटेल त्या नमुन्याबरहुकूम बनवितां येणार नाहीं. जगाचा भावी नमुना ईश्वरानें ठरविलेला असतो, आणि जगांतील सर्व देशांचें हिताहित पाहूनच तो मुक्रर केलेला असतो. त्या नमुन्याकडे लक्ष देऊन त्या दिशेनें राजकीय चळवळ करणें यांतच शहाणपणा असतो. तात्कालिक जयापजय कोणालाहि आला तरी अंतीं हीच चळवळ यशस्वी होते व विरुद्ध दिशेची लयाला जाते, असें डॉ. बेझंट यांच्या आध्यात्मदृष्टीला वाटतें. 'सामर्थ्य आहे चळवळेचें। जो जो करील त्याचें। परंतु तेथें भगवंताचें। अधिष्ठान पाहिजे ॥' हीच त्यांची आध्यात्मदृष्टि होय. इंग्लंडचा राजा लंडनला रहातो, पण त्याचे हात सर्व जगभर पसरण्याइतके लांब झाले असून त्याची सत्ता कॅनडा, दक्षिण आफ्रिका, ऑस्ट्रेलिया, आयर्लंड, न्यूझीलंड, हिंदुस्थान वगैरे दूरदूरच्या देशांवर

चालते. पान जसें एका विशिष्ट नमुन्यानुसार वाढतें तशी ही ब्रिटिश साम्राज्याची वाढ कांहीं योजनेस धरून झाली आहे, तसेंच हिंदुस्थान देशांत आज जे जगांतील सर्व धर्मांचे लोक एका छत्राखालीं हळूहळू एकत्र आणलेले दिसतात त्याच्या मुळाशींहि कांहीं योजना आहे असें बाईंस वाटतें. ही योजना जर पुढें परिपूर्ण करावयाची असेल तर हिंदुस्थानला ब्रिटिश साम्राज्यान्तर्गत संपूर्ण स्वराज्य मिळालें पाहिजे, आणि सर्व धर्मांना व जातींना सारख्याच प्रकारें वागविण्याची राज्यव्यवस्था हिंदुस्थानांत झाली पाहिजे; व अशा रीतीनें जगांत परस्परांजवळ आलेले देश राजकारणाच्या धाग्यानें एकवटून सर्व जगाची त्या नमुन्याबरहुकूम सुधारणा झाली पाहिजे हें बाईंचें राजकीय ध्येय आहे. जो ह्या ध्येयाच्या उलट जाईल, तो आंतल्या रेषांच्या विरुद्ध दिशेनें केळीचें पान फाडण्याचा प्रयत्न करीत आहे, अर्थात् तो प्रयत्न अंतीं सफळ व्हावयाचा नाहीं असें त्यांना वाटतें. टिळकांची दृष्टि व बाईंची दृष्टि यांमध्यें असा हा फरक आहे. ब्रिटिश साम्राज्यांतून हिंदुस्थानाला बाहेर नेणें म्हणजे त्या योजनेला उघड विरोध करणें होय असें बाईंचें मत असे व अद्यापिहि आहे. त्या मताची उपपत्ति वरील विवेचनावरून वाचकांना लावितां येईल, आणि हिंदी राजकारणाच्या धांवत्या चित्रपटांत त्यांनीं सतत कोणतें धोरण कां ठेविलें आहे याचा थोडाफार उलगडाहि होईल. असो.

टिळक व बेझंट यांनीं परस्परांस सहाय्य करून होमरूलची चळवळ काढण्याचें ठरविलें, व परस्परांवर पूर्ण विश्वास टाकून दोघांनीं ती चळवळ इतक्या नेटानें चालविली, कीं सर्व हिंदुस्थानदेश दुमदुमून गेला. चळवळीच्या सोयीकरतां दोघांनीं दोन स्वराज्यसंघ काढावे, टिळकांनीं आपली चळवळ विशेषत: महाराष्ट्र व वऱ्हाड यांत करावी व बाईंनीं इतरत्र सर्व हिंदुस्थानभर करावी अशी दोघांनीं कामाची वांटणी

केली होती. बाईंनीं आपल्या संघाच्या स्थापनेची अगोदर तयारी केली, दादाभाई नौरोजी व सर सुब्रह्मण्यम् ऐयर या कॉंग्रेसच्या दोन माजी अध्यक्षांकडून त्या भावी संघाला पाठिंबा मिळविला. पण नेमस्त पक्षाचे पुढारी कॉंग्रेसमध्यें होते, त्यांना धास्ती वाटली कीं बाईंनीं हा संघ काढला तर त्या आपल्या संघाकडे लोकमत ओढून घेतील व त्यामुळें कॉंग्रेसचें वजन कमी होईल. त्यानीं १९१५ च्या डिसें-बरांत मुंबईच्या एका खासगी सभेमध्यें बाईंना सांगितलें, कीं तुम्ही निराळा संघ काढूं नका, त्या संघाची आवश्यकता नाहीं, आम्ही स्वत: कॉंग्रेसच्या छत्राखालींच स्वराज्याची चळवळ कर-ण्याचें ठरविलें आहे. तेव्हां बाईंनीं त्यांना आश्वासन दिलें कीं, ही चळवळ कॉंग्रेस स्वत:च्या विद्यमानें करण्यास तयार असेल तर मी स्वराज्य-संघ काढणार नाहीं; पण जर तें काम कॉंग्रेसनें हातीं घेतलें नाहीं तर मी आठ महिने वाट बघून मग माझा संघ स्थापीन. लो. टिळक त्या वेळीं कॉंग्रेसमध्यें नव्हते; अर्थात् नेमस्त पक्षाला त्यांना कांहीं सांगतां येण्याजोगें नव्हतें, व सांगितलें असतें तरी टिळक तें कितपत ऐकते हाहि प्रश्नच होता. तेव्हां टिळकांनीं आपला स्वराज्य-संघ अगोदर काढला; व बाईंनीं आठ महिने वाट पाहून आणि कॉंग्रेसनें आपलें वचन खरें केलें नाहीं याचें माप नेमस्त पक्षाच्या पदरांत घालून नंतर काढला. दोघांनीं चळवळ अगोदरच सुरू केली होती. त्या वेळीं ‘ स्वराज्य ’ हा शब्द उच्चारून चळवळ करणें किती धोक्याचें होतें याची कल्पना आजच्या तरुण वाचकांना होण्यासारखी नाहीं. १९०६ सालीं कलकत्त्याच्या कॉंग्रेसमध्यें दादाभाई नौरोजी यांनीं ‘ स्वराज्य हें हिंदु-स्थानचें ध्येय आहे ’ असे स्पष्ट उद्गार अध्यक्षपदावरून काढले होते खरे, तथापि बारिकसारिक सुधारणांवरच कॉंग्रेस भर देत असे. स्वराज्य पाहिजे ही मूलभूत मागणी करण्याचा बूट टिळक-बेझंट या दोघांनीं

प्रथम काढला. १९१५ सालच्या मुंबईच्या राष्ट्रीय सभेमध्यें डॉ. बेझंट यांनीं उपसूचना आणिली होती कीं हिंदुस्थानला स्वराज्य देण्याची व तदनुसार योजना आंखण्याची आतां वेळ आली आहे. पण ही उपसूचना अध्यक्ष सर सत्येंद्रप्रसाद यांनीं नियमबाह्य ठरविली. तसेंच टिळकांनीं जो स्वराज्य-संघ काढला होता त्याला दोन दिवसांच्या अवधींत पंधरांवर सभासद मिळूं शकले नाहींत.* या दोन गमकांवरून ‘ स्वराज्य ’ शब्दाबद्दल किती धास्ती त्या वेळीं पुढाऱ्यांना व अनुयायांना वाटत होती, आणि बारीकसारीक सुधारणा दृष्टिआड करून स्वराज्याच्या मुख्य मागणीस हात घालण्याची गोष्ट त्या वेळीं किती कठीण होती याची वाचकांना कल्पना येईल. पण टिळक-बेझंट यांनीं पुढाकार घेतल्यावर चळवळ लौकरच जोरानें फैलावूं लागली. सरकारनें या दोघांना लगेच पायबंद घालण्याचा उद्योग केला. युरोपांत महायुद्ध सुरू नसतें तर सरकारनें त्या दोघांचें चंदन उडवून एका घावासरशीं साऱ्या चळवळीचीं अनेक शकलें करून टाकिलीं असतीं. पण इंग्लंडला त्या वेळीं लढाईंत यश पाहिजे होतें, व त्या यशासाठीं हिंदुस्थानची सहानुभूति हवी होती. तेव्हां दडपशाहीचा वरवंटा सरकारला हवा तसा फिरविणें कठीण जाऊं लागलें. १९१६ च्या मे महिन्यांत बाई पुण्यास आल्या होत्या; व लो. टिळकांच्या अध्यक्षतेखालीं त्यांचें झणझणीत व्याख्यान झालें. त्यांत त्या म्हणाल्या कीं, लोखंड तापलें असतां वेळींच त्यावर घण मारला तर त्याचा जास्त उपयोग होत असतो. हें व्याख्यान सरकारला इतकें झोंबलें, कीं बाईनीं मुंबई इलाख्यांत येऊं नये असा मनाईहुकूम मुंबईचे इलाखाधिपति लॉर्ड वुइलिंगडन यांनीं त्यांचेवर बजावला, व त्याच सुमारास मद्रासेस मद्राससरकारकडून त्यांच्या

* पहाः केळकर कृत टिळक चरित्र खंड ३ भाग १ पृ. ३६ व भाग २ पृ. ४८.

न्यूइंडिया पत्राबद्दल प्रेस-ॲक्टान्वयें दोन हजारांचा जामीन मागण्यांत आला. लोकमान्य टिळकांची त्या मे महिन्यांत बेळगांव व अहमद-नगर येथें जीं व्याख्यानें झालीं होतीं त्यांबद्दल सरकारनें त्यांचेवर खटला भरला व त्यांचेकडून एक वर्षभर चांगली वर्तणूक ठेवण्या-बद्दल चाळीस हजारांचा जामीन मागण्यांत आला. पण टिळकांनीं तें प्रकरण मुंबई-हायकोर्टाकडे नेलें व हायकोर्टानें त्यांस निर्दोषी म्हणून सोडून दिलें. तेव्हां त्यांनीं जास्त जोरानें चळवळ सुरू केली. इकडे जामीन द्यावा लागला तरी बाईंनीं न्यू इंडियाचें धोरण तसेंच ठेवलें होतें. तेव्हां ऑगस्ट महिन्याच्या अखेरीस सरकारनें जामिनकीची रक्कम सरकारजमा करून नवा दहा हजारांचा जामीन त्यांचेकडून मागितला, आणि त्यांच्या कॉमनवील या साप्ताहिकाबद्दल दुसरा पांच हजारांचा जामीन मागि-तला. पुढें बाईंनीं हें प्रकरण मद्रास-हायकोर्टांत नेलें. तेथें त्यांच्या विरुद्ध निकाल झाला. तेव्हां बाईंनीं प्रीव्ही कौन्सिलकडे अपील केलें. सरकारच्या मनांत त्यांचें पत्र बंद पाडावयाचें होतें, पण कायद्या-प्रमाणें सरकारला प्रीव्ही कौन्सिलच्या निकालाच्या अगोदर दुसरी जामीन-कीची रक्कम जप्त करून छापखाना खालसा करितां येईना. अपीला-मुळें बाईंना वेळ मिळाला, व त्यांचें वर्तमानपत्र त्यांना सुरू ठेवतां आलें. त्यांनीं सरकारच्या दटावणीस भीक न घालतां आपली चळ-वळ जास्त जोरानें चालू ठेवली. स्वराज्याची चळवळ लोकप्रिय होण्याकडे या सर्व गोष्टींचा मोठा उपयोग झाला. चळवळीची लाट आतां भली मोठी झाली होती; व टिळक—बेझंट यांच्या नेतृत्वाखालीं हिंदी जनतेनें ती सर्व देशभर इतक्या नेटानें पसरविली, कीं बेझंटबाईंनीं होमरूलचा मंत्र हिंदुस्थानांतल्या प्रत्येक झोपडीपर्यंत पोहोंचविला आहे, असें महात्मा गांधींना त्यांच्या कामगिरीचें पुढें वर्णन करावें लागलें. चळवळ जोरावर असतांना लखनौ येथें १९१६ ची राष्ट्रीय सभा

भरली. त्या सभेंत प्रथम सर्व पक्षांची चढाओढ दिसत होती. पण मुसलमानांसकट सर्व पक्षांची दिलसफाई आणि एकी त्या अधिवेशनांत होऊन स्वराज्यसंघ व स्वराज्याची चळवळ या दोहोंवर कॉंग्रेसच्या पसंतीचें शिक्कामोर्तब करण्यांत आलें.

लखनौ-कॉंग्रेसनंतर स्वराज्याची चळवळ जशी जास्त जोरानें सुरू झाली तसा सरकारच्या दडपशाहीलाहि भर आला. १९१७ सालीं बाईस मध्यप्रान्तांत जाण्यास सरकारनें बंदी केली, व मद्रासच्या गव्हर्नरांनीं आपल्या कायदेकौन्सिलला सांगितलें कीं, होमरूलची कल्पना लोकांनीं आपल्या डोक्यांतून काढून टाकणें अवश्य आहे. पुढें जून महिन्यांत मद्रास सरकारनें बाई व त्यांचे दोन हस्तक डॉ. ॲरुंडेल व मि. वाडिया यांस उटकमंड येथें अटकेंत ठेविलें.‡ अटक

‡ अटकेच्या वेळीं बाईंचीं वर्तमानपत्रें बंद पडलीं नाहींत. लागल्यास मदत करण्यासाठीं त्या वेळीं बाईंकडे रा. नरसोपंत केळकर व मि. हॉर्निमन हे गेले होते; पण त्यांची जरूरी लागली नाहीं. न्यायमूर्ति तेलंग यांचे चिरंजीव प्रो. पंढरीनाथपंत तेलंग हे एक बाईंचे अनुयायी होते. त्यांनीं न्यू इंडिया वर्तमानपत्र चालविलें. तारीख १५ जूनच्या सुमारास सरकारनें बाईंना अटक करण्याचा हुकूम काढला होता. लगेच १८ जूनला त्यांनीं न्यू इंडिया बंद केला. त्यावर सरकारनें १०००० ची जामिनकी बसविली होती, ती प्रेस बंद केल्यामुळें त्यांना परत मिळाली; व त्यांनीं लगेच तो छापखाना प्रो. तेलंगांना विकला आणि त्यांनीं २१ जूनला पुनः न्यू इंडिया सुरू केला. त्यांना २००० जामिनकी द्यावी लागली. त्यांचे दुसरे दोन छापखाने होते तेहि त्यांनीं असेच मित्रांना विकले, त्यांची जामिनकी सरकारकडून घेतली व त्या मित्रांनीं पुनः त्यांचे उद्योग आपल्या नांवाखालीं सुरू केले. तीन्ही छापखान्यांवर एकंदर जामिनकीची रक्कम १७००० होती, ती त्यांस अशा युक्तीनें परत मिळाली; व ते छापखाने नवीन छापखाने म्हणून लगेच पुनः सुरू झाले तेव्हां प्रत्येकासाठीं २००० रुपये म्हणजे एकंदर ६००० रुपये जामिनकी त्यांना भरावी लागली. पुढें तेलंगांची रु. २००० जामिनकी जप्त होऊन त्यांचेवर सरकारनें नवी १००००ची

करण्याच्या अगोदर गव्हर्नर लॉर्ड पेटलंड यांनीं बाईंना बोलावून नेलें,व तुम्ही चळवळ सोडा आणि विलायतेस जा, असा उपदेश केला. बाईंनीं त्याला इनकार देऊन, माझा अपराध काय तो सांगा असा त्यांना उलट सवाल टाकला. तेव्हां, मी तुमच्याशीं वाद करूं इच्छित नाहीं असें पेटलंडसाहेबांनीं सांगून बाईंना निरोप दिला. बाईंना अटक केल्यावर स्वराज्याची चळवळ वाढली व सरकारचा सर्वत्र निषेध होऊं लागला. * सर सुब्रह्मण्यम् ऐयर हे मद्रास इलाख्यांतील एक मोठे पुढारी होते, व एके वेळीं ते मद्रास हायकोर्टाचे सरन्यायाधीश होते. त्यांनीं पुढें होऊन सरकारला बजावलें, कीं ही चळवळ तुम्ही बेकायदेशीर ठरविलीत तरी मीं तिचा पुरस्कार करण्याचें ठरविलें आहे. बाईंचा व सर सुब्रह्मण्यम् यांचा जिव्हाळ्याचा स्नेह होता. त्यांना अटक झाली ती आपल्या कुटुंबांतील माणसालाच झाली आहे असें त्यांना वाटून ती गोष्ट त्यांच्या मनाला लागली होती. तेव्हां त्यांनीं अमेरिकेचे प्रेसिडेंट विल्सन

---

जामिनकी बसविली. तीन महिन्यांनीं बाई सुटल्यावर तेलंगांनीं तो छापखाना रंगा रेड्डी नांवाच्या बाईंच्या एका मित्राला बक्षीस करून दिला व त्यानें २००० रुपये जामिनकी भरून न्यू इंडिया चालू ठेवला. अशा रीतीनें बाईंचीं वर्तमानपत्रें चालू राहिलीं. न्यू इंडिया हें दैनिक एका वेळीं फार लोकप्रिय होतें. पुढें बाईंच्या विरुद्ध लोकमत झाल्यावर त्यांत फार तोटा येऊं लागला. तेव्हां १९२८ सालीं बाईंनीं एक वर्षभर दैनिक बंद केलें व पुनः सुरू केलें. पुढें १९२९ सालीं त्यांनीं तें कायमचें बंद केलें. साप्ताहिक मात्र आजवर चालू आहे.

* आपणास अटक होणार हें समजल्यावर बाईंनीं न्यू इंडियांत एक अत्यंत हृदयस्पर्शी लेख लिहून देशाला तो संदेश म्हणून दिला. त्यांत 'I am old, but I believe I shall see India Win Home Rule before I die.' ( माझें आतां वय झालें आहे, तथापि मरण्यापूर्वीं मी हिंदुस्थानला होमरूल मिळालेला पाहीन अशी माझी श्रद्धा आहे.) हें एक स्फूर्तिदायक वाक्य होतें. ह्या शब्दांचा सर्व देशभर जयजयकार करण्यांत आला.

यांजकडे पत्रें पाठवून इंग्रज सरकारच्या अन्यायी धोरणाची त्यांचेकडे कागाळी केली. इंग्लंडला त्या वेळीं महायुद्धांत अमेरिकेची मदत हवी होती, ती अमेरिका देत होती व त्याच्या संबंधानें वाटाघाट करण्यासाठीं इंग्लंडनें आपले दूत त्या वेळीं अमेरिकेकडे पाठविले होते.* त्या दूतांचे प्रे. विल्सन यांनीं कान उपटले, व बाई अराजक नाहींत, त्यांना तुम्ही अटक कां केलीत असा प्रश्न टाकला. त्या दूतांनीं ही हकीकत विलायतेस कळविली, व हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी मि. मॉंटेग्यू यानीं हिंदुस्थानसरकारला बाईंना सोडण्याचा हुकूम केला असें ऐकतों. बाईंच्या सुटकेसाठीं हिंदुस्थानांतहि मोठी चळवळ झाली. डॉ. बेझंट§ ही जगप्रसिद्ध व्यक्ति असल्यामुळें जगांतील नाना देशाच्या सुप्रसिद्ध लोकांकडून इंग्रज सरकारकडे निषेधाचीं पत्रें आलीं. अष्टौप्रहर नेटानें उद्योग करणाऱ्या माणसाचा एकदम सारा उद्योग बंद करणें म्हणजे मेलगाडी मध्येंच एकदम खडी करण्यासारखें होय. तसें झाल्यामुळें बाई अटकेंत असतांना काम नाहीं म्हणून फार आजारी झाल्या! इकडे सरकारचा

* सर सुब्रह्मण्यम् ऐयर यांनीं प्रेसिडेन्ट विल्सन यांचेकडे कागाळ्या केल्या ही गोष्ट त्या वेळचे व्हाइसरॉय लॉर्ड चेम्सफर्ड यांना फार लागली होती. मि. मॉंटेग्यू यांचेबरोबर ते जेव्हां मद्रासला नंतर दौऱ्यावर असतांना आले, तेव्हां सर सुब्रह्मण्यम् यांना त्यांनीं सन्माननीय पाहुणे म्हणून बोलाविलें होतें. त्या भेटींत लाट साहेबांनीं त्यांच्यासमोर प्रे. विल्सन यांना पाठविलेल्या पत्राची नक्कल ठेविली व हें काय आहे असें रागानें त्यांना विचारलें. उलट सर सुब्रह्मण्यम्हि लाटसाहेबांवर रागावले, व तुमच्या अन्यायाबद्दल मी कागाळी केली ती बरोबर केली, असा त्यांनीं व्हाइसरॉयांना झणझणीत जबाब दिला. व्हाइसरॉय व सर सुब्रह्मण्यम् ह्या दोघांचें त्या वेळीं भान सुटून दोघे एकमेकांवर संतापल्यानें फार मोठ्यानें बोलत होते. बाहेरचे शिपाई हें काय भांडण चाललें आहे तें दारांतून डोकावून पाहूं लागले; आणि मॉंटेग्यू यांनीं त्या दोघांच्या पाठीवर थाप मारून दोघांसहि शान्त केलें, असें मद्रासेकडील मंडळी सांगतात.

§ पहा: केळकर-कृत टिळकचरित्र खंड ३ भाग ३ पृ. ५०.

निषेध म्हणून जनतेनें त्यांना कॉँग्रेसच्या अध्यक्ष नेमिलें व जर सरकारनें त्यांना कॉँग्रेस भरण्याच्या अगोदर सोडलें नाहीं तर सर सुब्रह्मण्यम् यांनीं बाईंचे एजंट म्हणून अध्यक्षाच्या जागीं बसावें अशाहि सूचना येऊं लागल्या. पण उपरोक्त सर्व कारणांस्तव सप्टेंबरच्या १७ व्या तारखेस म्हणजे सुमारें तीन महिन्यांत बाईंस सरकारला सोडून द्यावें लागलें; व त्यापूर्वी सरकारनें जाहीरहि केलें कीं, जबाबदारीचें स्वराज्य देणें हें ब्रिटिश राज्यपद्धतीचें ध्येय असून त्या दिशेनें सरकार लवकरच पाऊल टाकणार आहे, आणि त्या संबंधानें लोकमताशीं विचार-विनिमय करण्यासाठीं स्टेट सेक्रेटरी लवकरच हिंदुस्थानांत येणार आहेत.

अशा प्रकारें लोकमताचा पूर्ण विजय झाला; व डॉ. बेझंट या अत्यंत लोकप्रिय होऊन १९१७ च्या कॉँग्रेसच्या कलकत्ता येथील अधिवेशनाच्या अध्यक्ष झाल्या. पुढें मॉंटेग्यू व चेम्सफर्ड यांनीं काय सुधारणा देणार त्याचा रिपोर्ट १९१८ च्या एप्रिल महिन्यांत प्रसिद्ध केला. त्याचा विचार त्याच सालच्या ऑगस्ट महिन्यांत मुंबईच्या जादा कॉँग्रेसनें केला. या कॉँग्रेसमध्यें राष्ट्रीय पक्ष फाजील जहाल होईल अशा भीतीनें नेमस्त पक्षांतील कांहीं पुढारी त्या कॉँग्रेसला गेले नाहींत. अध्यक्ष मि. हसन इमाम व डॉ. बेझंट यांच्या विशेष परिश्रमानें या कॉँग्रेसमध्यें सुधारणांविषयीं राष्ट्रीय व नेमस्त यांचें एकमत झालें, व जे नेमस्त कॉँग्रेसच्या बाहेर राहिले होते त्यांना बाहेर रहाण्याचें कारण नाहीं असें दिसून आलें! येथपर्यंत बाई अत्यंत लोकप्रिय होत्या. पुढची वार्षिक कॉँग्रेस त्याच डिसेंबरांत दिल्लीस भरली व बाहेर राहिलेले नेमस्त आंत आले. लो. टिळक चिरोल-केसकरितां विलायतेस गेले असल्यानें ते त्या अधिवेशनास हजर नव्हते. या कॉँग्रेसमध्यें नेमस्त व राष्ट्रीय या पक्षांचा मुंबईस ठरलेला समेट राष्ट्रीय पक्षांतल्या टिळकांच्या अनुयायांनीं मोडला, आणि प्रान्तिक स्वायत्ततेचा

ठराव नेमस्तांचा विरोध असतांनाच त्यांनीं बहुमताच्या जोरावर पास करून घेतला. आपण नेमस्तांना वचन दिलें आहे व तें मोडणें लबाडीचें आहे, असें स्पष्ट सांगून बाईंनीं या वेळीं राष्ट्रीय पक्षास विरोध केला व त्यामुळें बाईंची लोकप्रियता थोडथोडी ओहोटूं लागली. पुढें बाई विलायतेस गेल्या. टिळकहि तेथें होते. त्यांचें व टिळकांचें धोरण तेथें एकच होतें, पण टिळकांचे अनुयायी व बाई यांच्यांत मात्र फूट* पडत होती. ही फूट पुढें वाढली. याच सुमारास सुधारणांचा नवा कायदा पास झाला. सुधारणा अपुऱ्या व असमाधानकारक असल्या तरी त्या पदरांत पाडून घ्याव्या व जास्त सुधारणा मिळविण्याची आणखी खटपट करावी, असें टिळक व बेझंट यांचें म्हणणें होतें. पण सुधारणांवर बहिष्कार घालावा असें म्हणणारा एक नवा पक्ष डोकें वर काढीत होता.† प्रथम महात्मा गांधी त्या पक्षांत नव्हते. उलट त्यांचा ह्या पक्षाबद्दल विरोध होता. पण लवकरच गांधी त्या पक्षाला

---

* केळकर-कृत टिळकचरित्र खंड ३ पहा. त्यांत भाग ५ पृ. २४ वर रा. केळकर यांनीं लो. टिळकांस विलायतेंत कळविलें आहे कीं, 'आपण जसे बेझंटबाईंशीं जमवून घेतां तसे इतर लोक घेत नाहींत.' पृ. ५४ वर 'बाई आपल्यांतील वाद पुढें आणीत नाहींत.' पृ. ६४ वर 'बाईंनीं टिळकांच्या-बद्दल फार चांगलें लिहिलें;' पृ. ६६ वर 'बाई समंजस आहेत;' पृ. ९० वर 'टिळक यांना आपला मार्ग या दोन डोंगरांमधून काढावा लागला, व बेझंटबाईहि तेंच धोरण नेहमीं ठेवीत होत्या;' पृ. ९१ वर 'टिळकांच्याच प्रभावळींतील कांहीं लोकांनीं टिळकांना जवळ जवळ मवाळांत काढलें;' पृ. ८७ वर 'टिळक व बेझंटबाई यांचें मजूरपक्षाशीं धोरण एक होतें' अशीं विधानें आहेत. त्यावरून ह्या काळीं टिळक व बेझंट यांचीं मतें व धोरण एक असलें तरी इतर राष्ट्रीय पक्षांतल्या लोकांनीं डॉ. बेझंट यांस विरोध केला ही गोष्ट उघड होते.

† केळकर-कृत टिळक चरित्र खंड ३ भाग ५ पृ. ६० पहा. त्यांत टिळकांनीं राष्ट्रीय पक्षांतल्या कांहीं मंडळींस विरोध करून सुधारणांस बहिष्कार घालूं नये असें सांगितल्याचा उल्लेख आहे.

मिळाले. पुढें गांधींनीं मुसलमानांच्या खिलाफत-चळवळीचाहि पुरस्कार करून व मुसलमानांची सहानुभूति मिळवून १९२० सालीं असहकारिता सुरू केली. बाईंनीं महात्माजींना उघड विरोध केल्यामुळें त्यांचे-विरुद्ध लवकरच लोकमत खवळलें. टिळक यांनीं उघड विरोध केला नाहीं व वादास पुरेसें तोंड लागण्यापूर्वीच ते दिवंगत झाले. नंतर हळूहळू गांधींचें देशामध्यें व कॉंग्रेसमध्यें वजन वाढलें व बाईंचें कमी झालें.

महात्मा गांधी व बाई यांच्या मनोरचनेंत कांहीं साम्य व कांहीं फरक आहे. बाई व गांधीजी यांचीं कांहीं ठरलेलीं तत्त्वें आहेत; व सरकारचा कितीहि रोष झाला, वा केवढाहि लोकक्षोभ झाला तरी तीं सोडावयाचीं नाहींत अशी दोघांची मनोरचना आहे. पण पार्लमेंट, कौन्सिलें, कायदे-मंडळें यांत झगडे करून लोकसत्ता वाढवावयाची असते असें बाईंना वाटतें; टिळकांसहि तसेंच वाटत असे. पण सनदशीर चळवळीच्या या रणभूमीला गांधी महत्त्व देत नाहींत. आपल्या वैयक्तिक महत्त्वाकांक्षा तृप्त करण्यास माणूस त्या ठिकाणीं जातो व मग शत्रूला फितूर होतो असें गांधींना वाटतें. इतिहासाच्या पाठीमागें एक जिवंत योजना असते असें बाईंच्या आध्यात्मदृष्टीस दिसतें; गांधींच्या दृष्टीस तसें दिसत नाहीं. ब्रिटिश साम्राज्यांतल्या सर्व देशांस स्वराज्य मिळावें, व त्या सर्वांनीं एका छत्राखालीं राहून जगांतील मोठमोठे प्रश्न सोडविण्यासाठीं जगड्व्याळ प्रयत्न करावे, निरनिराळ्या देशांनीं आपले विशिष्ट गुण वाढवून त्यांचा फायदा सर्वांना द्यावा अशी ईश्वरी योजना भावी इतिहासाच्या पडद्यामागें आंखलेली आहे असें बाईंच्या आध्यात्मदृष्टीस वाटतें; महात्मा गांधींना असली आध्यात्मदृष्टि मान्य नाहीं. उलट त्यांच्या अनुयायांस तर आपण ब्रिटिश साम्राज्यांतून बाहेर निघाल्यास आपला अधिक फायदा होईल असें वाटत आहे. यामुळें गांधीपक्ष व डॉ. बेझंट यांमध्यें तत्त्वाचा विरोध आला व बाईंनीं आपल्या लोकप्रियतेची एकदम

होळी करून गांधींना प्रतिरोध केला. महात्मा गांधी यांनीं १९२० मध्यें असहकारितेची चळवळ प्रथम काढली; पुढें शाळा ओस पाडाव्या, कोर्टें ओस पाडावीं, सरकारी पदव्यांचा लोकांनीं त्याग करावा, कौन्सिलें ओस पाडावीं, खादी वापरावी वगैरे गोष्टींचा त्यांनीं जोरानें पुरस्कार केला; व माझ्या धोरणानें तुम्ही चालाल तर एकाच वर्षांत म्हणजे यंदाच्या ३१ डिसेंबर (सन १९२१) पूर्वी मी हिंदुस्थानला स्वराज्य नक्की मिळवून देतों असा पुकारा केला. बाईंना हीं मतें मान्य नव्हतीं. त्यांनीं गप्प न बसतां गांधींना उघड विरोध केला, व राजकारणांत कांहीं दिवस त्या अगदीं निर्माल्यवत् होऊन बसल्या.

इ. स. १९२१ पासून १९२५ पर्यंत जरी बाईंच्या विरुद्ध लोकमत फार उसळलेलें होतें तरी त्या स्वस्थ बसल्या नाहींत. त्यांनीं या अवधींत सारखी खटपट करून एक स्वराज्याचें बिल तयार केलें. त्यांनीं त्या सालीं सर्व राजकीय पक्षांकडे सहाय्याचें मागणें केलें. नामदार शास्त्री, सर तेजबहादूर सप्रू वगैरे नेमस्त पुढारी त्यांना मिळाले. महाराष्ट्रांतील रा. केळकरांचा प्रतिसहकार पक्षहि त्यांना मिळाला; मात्र त्या पक्षाकडून त्यांना साक्षात् असें सहाय्य मिळालें नाहीं. कॉंग्रेसमधील गांधी यांचा पक्ष तर त्यांना बिलकूल मिळाला नाहीं. पण मिळतील तितकीं माणसें त्यांनीं आपल्याबरोबर घेतलीं व १९२३ सालीं दिल्ली येथें, १९२४सालीं दिल्ली, अलाहाबाद व मुंबई या तीन ठिकाणीं व १९२५ सालीं कानपूर येथें पुढाऱ्यांच्या कन्व्हेन्शन्स भरवून हिंदी स्वराज्याची योजना त्यांनीं परिपूर्ण केली. नंतर पार्लमेंटरी बिलाचें त्याला स्वरूप देऊन १९२५ सालीं तें त्यांनीं विलायतेस नेलें, पार्लमेंटच्या एका सभासदाच्या सहाय्यानें तें पार्लमेंटसमोर ठेविलें, व तेथें त्याचें पहिलें औपचारिक वाचन त्या सालच्या डिसेंबर महिन्यांत झालें. त्या बिलाला Commonwealth of India Bill असें म्हणतात. तें अद्याप तेथें

त्यांनीं मुद्दाम लयावस्थेंत ठेविलें आहे, व जरूर पडल्यास जागृत स्थितींत त्यास केव्हांहि आणतां येईल. रचनात्मक राजकारणाचा हा अत्यंत मोठा प्रयत्न होय.

१९२४ पासून पुढें कांहीं काळ देशांत राजकीय दृष्टया अत्यंत विस्कळितपणा आला होता; महात्मा गांधींची असहकारितेची चळवळ अपेशी झाल्यानें आणि हिंदु-मुसलमानांमधील व सर्व राजकीय पक्षोपपक्षांतील भांडणें विकोपास गेल्यामुळें सर्व देशभर निराशेची छाया पसरलेली होती आणि कोणाचाहि पायपोस कोणाच्या पायांत नव्हता. हिंदुस्थानांतलीं आपापसांतलीं भांडणें अशींच यावच्चंद्रदिवाकरौ चालणार, नोकरशाही त्यांचा फायदा घेऊन सर्वांच्या डोक्यावर सारखींच मिरीं वाटणार व हिंदुस्थानचें स्वराज्य सदा दूरच रहाणार, अशी नितान्त नैराश्याची भाषा पुष्कळांच्या बोलण्यांत येऊं लागली. पण हा निराशेचा काळ फार वर्षें टिकला नाहीं. सन १९२७ सालीं इंग्रज-सरकारला हिंदुस्थानांत सायमन-कमिशन पाठविण्याची बुद्धि झाली व त्यावर मुद्दाम कोणीहि हिंदी गृहस्थ नेमण्यांत आला नाहीं. तेव्हां कॉंग्रेस पक्ष, नेमस्त पक्ष, प्रतिसहकार पक्ष वगैरे सर्व पक्ष आपापलीं भांडणें विसरून एकवटले, व बाईंनीं पुन: राजकारणांत पुढाकार घेऊन इतर पुढाऱ्यांबरोबर सायमन-कमिशनवर बहिष्कार घालण्याचा उद्योग सुरू करून तो यशस्वी करून दाखविला. त्या वेळीं देशांतील सर्व पक्षांनीं एक व्हावें, स्वराज्याची सर्वसंमत अशी योजना आंखावी, आणि ती सायमन कमिशनला लोकांचें प्रत्युत्तर म्हणून सर्व हिंदुस्थाननें पार्लमेंटच्या तोंडावर टाकावी असें सर्वानुमतें ठरलें. त्याहि कार्यांत बाईंनीं पुढाकार घेतला होता. दूरदृष्टीनें बाईंनीं अगोदरच अशी योजना आंखली होती हें आपण नुकतेंच पाहिलें आहे. त्या योजनेचा या वेळीं सर्व पक्षांना फार उपयोग झाला, आणि

१९२८ च्या ऑगस्ट महिन्यांत सर्व पक्षांची अशी 'नेहरू' योजना तयार झाली.* ज्या सर्वपक्षीय परिषदेच्या ( All Parties Conference ) चालनेनें ही योजना तयार झाली तींत बाई प्रमुख होत्या.

इ. स. १९३० सालीं महात्मा गांधींनीं जी कायदेभंगाची चळवळ सुरू केली तिला बाईंनीं पूर्वीइतका विरोध केला नाहीं; पण ती त्यांना पसंत नव्हती. सरकारचें धोरणहि त्यांस पसंत नव्हतें, आणि म्हणून त्यांनीं महात्मा गांधींस तादृश विरोध केला नाहीं. सार्वत्रिक कायदेभंग लोकांस शिकवणें चांगलें नाहीं असें बाईंचें मत आहे. ध्येयवादी व सुशिक्षित लोकांचा प्रश्न वेगळा. त्यांना तत्त्वदृष्टि असते व ते स्वार्थाला विसरूं शकतात. पण सामान्य प्रतीच्या माणसांचीच संख्या बहुजनसमाजांत फार असते. असल्या लोकांना कायदे मोडण्याची क्रिया आपण मोठ्या प्रमाणावर शिकविली तर नुसतें वाईट सरकारच कोसळेल असें नाहीं, तर चांगलें व न्यायी सरकारहि असल्या उपायांनीं नामशेष होऊं शकेल; आणि सरकारच्या योग्य मागण्यांचा धिक्कार करण्याची भावना समाजांत बळावेल, अशी धास्ती त्यांना वाटते. अर्थातच त्या सार्वत्रिक कायदेभंगास पाठिंबा देत

* ही योजना कित्येक महत्त्वाच्या बाबतींत बाईंच्या कॉमवेल्थ ऑफ् इंडिया बिलाच्या मानानें सदोष आहे. लोकशाही अधिक उपयुक्त होऊन तींतील दोष कमी व्हावे म्हणून बाईंच्या योजनेंत मतदारांच्यापेक्षां उमेदवारांची लायकी सर्वच अधिक असली पाहिजे याची सोय करण्यांत आली होती, जितकें जितकें कौन्सिल जास्त वरचें तितकें तितकें त्याचे मतदार व उमेदवार दोन्ही जास्त लायकीचे असले पाहिजेत या धोरणानें त्यांनीं नियम ठरविले होते, खेडेगांवांपासून प्रारंभ करून त्या पायावर स्वराज्याची इमारत उठविलेली असल्यामुळें खेड्यांतील गरीब शेतकऱ्यांची सुधारणा लवकर होण्याची सोय त्यांच्या योजनेंत होती. पण नेहरू-योजनेंतून या अत्यंत उपयोगाच्या गोष्टी वगळल्या गेल्या आहेत.

नाहींत. पण सरकारहि हिंदुस्थानाशीं न्यायानें वागत नाहीं, असेंहि त्यांस वाटतें. हिंदुस्थानाला स्वराज्य देण्याच्या बाबतींत तें सारखे अडथळे आणीत आहे, आणि ते आणणें म्हणजे त्यांच्या आध्यात्मिक दृष्टीला जी ऐतिहासिक योजना दिसत आहे ती फिसकटण्याचा उद्योग करणें होय. अर्थातच त्यांना हल्लीचें सरकारी धोरणहि अत्यंत निषेधार्ह वाटतें.

हिंदुस्थानच्या राजकीय चळवळींत बाईंनीं अनेक उद्योग केलेले आहेत. त्या साऱ्यांची हकीकत सांगण्यास या छोट्या पुस्तकांत स्थळ नाहीं. अर्थात् पुष्कळच गोष्टी वगळून टाकणें प्रस्तुत लेखकाला अपरिहार्य झालें असून जो वृत्तान्त त्याला या प्रकरणांत समाविष्ट करतां आला आहे त्यासहि त्याला अतिसांक्षिप्त रूप द्यावें लागलें आहे. हें अतिसंक्षिप्त रूप नुसतें या प्रकरणालाच द्यावें लागलें आहे असें नाहीं, तर सर्व पुस्तकांतहि तसें करणें अवश्य झालें आहे. हें चरित्र वाचतांना आमच्या वाचकांनीं ही गोष्ट दृष्टिआड करूं नये अशी विनंति आहे.

---

# प्रकरण दहावें

## उपसंहार

डॉ. बेझंट यांच्या चरित्राचा आढावा घेतांना पुढील गोष्टी विचारांत घेण्याजोग्या आहेत.

हें पुस्तक प्रसिद्ध होण्याच्या जरा अगोदर म्हणजे १ ऑक्टोबर १९३२ रोजीं बाईंना ८६ वें वर्ष लगलें. त्यापूर्वीं सुमारें दीड वर्ष त्या दगडी जिन्यावरून खालीं पडल्याचें निमित्त होऊन फार आजारी झाल्या आहेत. त्याच्या अगोदर म्हणजे सुमारें ८४ वर्षें वयास होईपर्यंत अनेक तरुणांसहि झेंपणार नाहींत इतके उद्योग त्या सारखे करीत. त्यांच्या सार्वजनिक आयुष्यक्रमास ५० वर्षें झाल्याचे उत्सव जगांत अनेक ठिकाणीं करण्यांत आले. त्या उत्सवांनाहि आज सातआठ वर्षें होऊन गेलीं आहेत!

डॉ. बेझंट यांनीं एकंदर ३२६ पुस्तकें लिहिलीं आहेत असा त्यांच्या एका चरित्रकारानें आढावा काढला आहे.*

बाईंनीं स्वत:च्या अंतर्यामांत कित्येक नवीन सिद्धि फुलविल्या असून त्याच्या अनुभवाच्या जोरावर सर्व जगांतील धर्मांची त्यांनीं कांहींशी नवीन मांडणी केली आहे. ह्या शतकांत असा उद्योग करणारीं माणसें किती आहेत?

---

* गुइल्यम्स नांवाच्या एका स्त्रीनें बाईंचें पावणेचारशें पानांचें चरित्र लिहिलें आहे. त्यांत पृ. ३५१ वर लिहिलें आहे कीं १९२४ सालापर्यंत बाईंनीं लिहिलेल्या लहानमोठ्या सर्व पुस्तकांची संख्या ३२६ भरते. या पुस्तकांत भाषान्तरित पुस्तकें, मासिकें, नियतकालिकें, दुसऱ्या ग्रंथकारासमवेत जोडीनें लिहिलेली पुस्तकें धरलेलीं नाहींत. तीं धरलीं तर संख्या ३७९ होईल! या पुस्तकांपैकीं कांहीं महत्त्वाच्या पुस्तकांची यादी त्या चरित्रांत दिलेली आहे.

धर्मांच्या क्षेत्रांत पुढाकार घेतला असूनहि शिक्षण, समाजसुधारणा, राजकारण वगैरे अनेक उद्योगांत प्रवृत्तिपर भावनेनें त्यांनीं मोठी कामगिरी केली आहे. ह्या शतकांत धर्माच्या क्षेत्रांतील किती माणसांनीं इतके खटाटोप केलेले आढळतात? एकाच धर्माचा नव्हे, तर बाईंनीं सर्व धर्मांचा लोकसंग्रहार्थ सर्वत्र पुरस्कार केलेला आहे. सर्व धर्मांचा जिव्हाळ्यानें अभ्यास करून त्यांचा पुरस्कार करणारीं माणसें आज जगांत किती आहेत? बाईंचा उद्योग सर्व जगभर पसरलेला आहे. त्यांच्या विचारांत अशा कांहीं गोष्टी आहेत, कीं ज्यांचें अगत्य सर्व देशांतील व सर्व धर्मांच्या लोकांना वाटावें. हिंदुस्थानांत आज अनेक पुढारी आहेत. धर्मांच्या क्षेत्रांतहि अनेक पुढारी आपणांस हिंदुस्थानांत दिसतात. त्यांच्यापैकीं कितीकांच्या विचारांत असें कांहीं आहे कीं ज्याविषयीं न्यूझीलंड व कानडा यांसारख्या दूरच्या लोकांसहि अगत्य वाटेल? लहान घरकुलांत सदा रहाणाऱ्या आमच्या संकुचित धर्माभिमानी बंधूंनीं ह्या प्रश्नाचा स्वतःशीं विचार करावा.

वाचकहो! हिंदुस्थान ही डॉ. बेझंट यांची जन्मभूमि नाहीं. पैसे मिळविण्यास हिंदुस्थानांत इंग्रज जसे येतात तशा त्या आलेल्या नाहींत. त्यांनीं हिंदुस्थानाकरितां स्वतःचा पैसा घालविला आहे; कपर्दिकाहि मिळविलेली नाहीं. जे लोक आपले कोणी नाहींत व आपण ज्यांचे कोणी नाहीं, असे हिंदी लोक आपल्या हेतूंविषयीं पुनः पुनः शंका घेत असतांहि बाईंनीं स्वतःच्या जातभाईंस विरोध करून हिंदी लोकांचें चाळीस वर्षांवर हित पाहिलें आहे. किती हिंदी पुढारी असल्या स्थितींत असते तर स्वतःच्या जातभाईंचा तीव्र रोष सोसून सत्य आणि न्याय यासाठीं, आणि कोणतीहि सबब पुढें न करतां, असल्या कार्यास उद्युक्त झाले असते असें तुम्हांस वाटतें?

---

# आमचें चरित्र-वाङ्मय

| | | |
|---|---|---|
| १ | आगरकर-चरित्र<br>श्री. वि. स. खांडेकर | ०—८—० |
| २ | बेझंट-चरित्र<br>श्री. रा. स. भागवत, M. A. | ०—८—० |
| ३ | एकनाथ-चरित्र<br>श्री. ल. रा. पांगारकर, B. A. | ०–१२—० |
| ४ | मुलींची द्रौपदी<br>श्री. कृ. गो. किनरे | १—८—० |
| ५ | वीर वैरागी<br>श्री. ग. दा. सावरकर | १—०—० |
| ६ | महात्मा गांधी<br>श्री. सीताकान्त | २—४—० |
| ७ | जोसेफ मॅझिनी<br>श्री. स. आ. जोगळेकर, M. A. LL. B. | २—०—० |
| ८ | निकोलाय लेनिन<br>श्री. रा. गो. भिडे | ०–१२—० |